


नोंदणी क्र. एफ.१६०१४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

## महाराष्ट्र राज्य विशेषांक

मे–जून १९८४

### या अंकातील विषय

- संयुक्त महाराष्ट्राची उद्दिष्टे.
- राजकीय पक्ष व प्रवृत्ती
- औद्योगिक क्षेत्रात मराठी तरुण
- बदलता दलित तरुण
- कृषि-औद्योगिक विकास
- विज्ञान-विनियोग कार्य
- जातीय हिंसाचार
- मत्स्योद्योग
- संस्थात्मक जीवन

### आणि लेखक

भास्कर लक्ष्मण भोळे ✦
देवदत्त दाभोलकर ✦
पन्नालाल सुराणा ✦
भा. र. साबडे ✦
अर्जुन डांगळे ✦
श्री. अ. दाभोलकर ✦
अनुराधा चौधरी ✦
रामचंद्र द. हणबर ✦
बाळ द. टिळक ✦
सुनिल शंकरराव आडगांवकर ✦
चं. वि. कुळकर्णी ✦
अनन्त जोशी ✦

अनुक्रमणिका

# मराठी विश्वकोश

"वैज्ञानिक व तांत्रिक" तसेच "समाजशास्त्रे व मानव्यविद्या" या विषयांतील मानवी ज्ञान मराठी भाषेत उपलब्ध करून देण्याचा महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाचा अभिनव लक्षणीय उपक्रम.

**प्रत्येकी सुमारे ११०० पृष्ठांचे २० खंड.**

**१ ते ११ खंड विक्रीस तयार, खंड १२ लवकरच विक्रीस उपलब्ध होत आहे.**

**उर्वरित खंड प्रकाशनाच्या मार्गावर.**

**किंमत : एक खंड रु. १००/– व २० खंडांचा संच रु. २०००/–**

(अ) रु. २००/– आगाऊ अनामत भरणाऱ्यास प्रत्येक खंड रु. ८०/– ला व २० खंडांचा संच रु. १६००/– ला पडेल.

(ब) सरकारमान्य शिक्षण संस्था, ग्रंथालये, संशोधन संस्था यांना प्रत्येक खंडास सवलतीची किंमत रु. ७०/– आणि २० खंडांच्या संचास रु. १४००/–.

**(क) महाराष्ट्र शासनाच्या प्रकाशनाचे अधिकृत विक्रेते तसेच पाठ्यपुस्तक मंडळाच्या अधिकृत विक्रेत्यांना ३७ टक्के सूट.**

**विश्वकोश खरेदीसंबंधी चौकशी :**

सचिव,

महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ,
एल्सा हटमेंट, "डी" ब्लॉक, आझाद मैदान, मुंबई – ४०० ००१.

**खंड विक्रीसाठी खालील विक्रीकेंद्रांवर उपलब्ध –**

व्यवस्थापक, पाठ्यपुस्तक भांडार व वितरण केंद्र –

(१) "बालभारती", १० उद्योगनगर,
स्वामी विवेकानंद मार्ग,
गोरेगाव, मुंबई– ४०० ०६२.
( दूरध्वनी क्र. ६९४०७१ )

(२) "बालभारती", सेनापती बापट मार्ग,
पुणे– ४११ ००४

(३) "बालभारती", रवींद्रनाथ टागोर
सायन्स कॉलेजसमोर, महाराजाबाग
रोड, नागपूर – ४४० ०१२.

(४) एम. आय. डी. सी. रोड नं. २ व ३,
रेल्वे स्टेशनजवळ,
औरंगाबाद – ४३१ ००१.
( दूरध्वनी क्र. ४११० ).

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

## महाराष्ट्र राज्य विशेषांक

वर्ष ३७ । अंक ८–९ । मे–जून १९८४
किंमत १० रुपये । वार्षिक वर्गणी ३० रुपये



अध्यक्ष व विश्वस्त
तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

संपादक
मे. पुं. रेगे

संपादकीय पत्रव्यवहार :
मे. पुं. रेगे,
संपादक, 'नवभारत' मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई–४१२ ८०३ (जि. सातारा)

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
श्री. ग. दीक्षित,
व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
द्वारा : दी प्राज्ञ प्रेस, वाई–४१२ ८०३
(जि. सातारा)

या नियतकालिकाच्या प्रकाशनार्थ महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाकडून अनुदान मिळाले आहे.

अनुक्रमणिका







# नवभारत

मे–जून १९८४

अ नु क्र म



टीप : लेखक-परिचय पृ. ८६ वर दिला आहे.

अनुक्रमणिका








## संपादकीय

हा महाराष्ट्र राज्य विशेषांक वाचकांच्या हाती देताना आम्हाला आनंद होत आहे.

संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेनंतर उलटून गेलेल्या काळात जीवनाच्या विविध क्षेत्रांत ज्या घडामोडी झाल्या व जी प्रगती साधली गेली किंवा पीछेहाट भोगावी लागली, तिचा सर्वांगीण आढावा घेणे हे ह्या विशेषांकाचे उद्दिष्ट नव्हे. हा उपक्रम करायचा झाल्यास तो खूपच पद्धतशीरपणे करावा लागेल. पण काही ठळक क्षेत्रांत जे घडले आणि साधले गेले, किंवा अपयश हाती आले त्यांचा परामर्ष घेण्याचा हा मर्यादित प्रयत्न आहे. या विशेषांकासाठी आमंत्रित केलेले काही लेख हाती यावयाचे राहिले आहेत. ते यथावकाश 'नवभारता'त प्रसिद्ध करण्याचा मनोदय आहे.

केंद्रसरकार आणि राज्यसरकारे यांचे परस्परसंबंध काय असावेत हा राज्यव्यवहारातील प्रश्न आज राष्ट्रीय चर्चेचा विषय बनला आहे. पण या सरकारी संबंधापलीकडे असलेला असा भारत आणि त्याचे भिन्न प्रदेश यांच्यामधील संबंध आहे आणि हा संबंध राष्ट्रीय जीवनाला पायाभूत आहे. गुजरात, कर्नाटक, महाराष्ट्र या प्रदेशांची स्वतःची अशी विशिष्ट अस्मिता आहे. प्रादेशिक भाषा हा या अस्मितेचा आधार आहे आणि मर्यादित प्रमाणात का होईना, पण स्वायत्त असलेल्या सांस्कृतिक परंपरेकडून तिचे पोषण झालेले आहे. अस्सल भारतीय शक्तीची अस्मिता एकाच वेळी भारतीय आणि प्रादेशिक असते हे जो नीट जाणून घेणार नाही, त्याचा भारतीय जीवनाच्या अंतरंगात प्रवेश होऊ शकणार नाही. हे परकीयांनी जसे समजून घेतले पाहिजे, तसेच आधुनिक राष्ट्रवादी भारतीयांनीही समजून घेतले पाहिजे.

विज्ञान आणि तंत्रज्ञान यांच्यावर आधारलेल्या एका समान संस्कृतीचा जगभर प्रसार होत आहे. अर्थात तो भारतातही होत आहे. शहरे आणि औद्योगिक केंद्रांचे परिसर यांच्यात ही संस्कृती प्रामुख्याने आढळून येत असली, तरी ती सर्वगामी ठरणार आहे. पण लोकजीवन जर सर्व क्षेत्रांत निरोगी आणि पुष्ट व्हायचे असेल, तर लोक स्वायत्त बनले पाहिजेत आणि ही स्वायत्तता भारतात भारतीय संस्कृतीची शाखा असलेल्या प्रादेशिक संस्कृतीवरच आधारता येईल. कारण ही संस्कृती म्हणजे भारतीय अस्मितेचा गाभाच होय; पण ही अस्मिता सम्यकपणे जोपासायची तर त्या, त्या प्रदेशातील विचारवंतांनी अंतर्मुख होऊन प्रादेशिक जीवनाच्या सर्व क्षेत्रांची चिकित्सा केली पाहिजे आणि त्या, त्या क्षेत्रात चालू असलेल्या व्यवहाराचे मूल्यमापन करून त्यांना जाणीवपूर्वक योग्य ते वळण देण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

या विशेषांकामुळे अशा उपक्रमांना चालना मिळेल अशी आशा आहे.

या अंकासाठी आमच्या विनंतीला मान देऊन ज्यांनी लेखनसाहाय्य केले त्या सर्वांचे आम्ही आभारी आहोत. तसेच या विशेषांकासाठी आपुलकीने ज्या व्यक्तींनी व संस्थांनी जाहिराती देऊन आर्थिक साहाय्य केले, त्या सर्वांचेही आम्ही आभारी आहोत.



अनुक्रमणिका

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# संयुक्त महाराष्ट्र झाला ! संयुक्त महाराष्ट्र कधी होणार ?

भास्कर लक्ष्मण भोळे

बहुजनसमाजाच्या लोकसत्तेशी संबंधित असलेल्या संयुक्त महाराष्ट्र चळवळीचा आत्मा मूलत: क्रांतिवादी व मूलगामी असल्याचे श्री. दि. के. बेडेकर यांनी १९४६ साली लिहिले होते. आक्रमक राष्ट्रवादाच्या दडपणामुळे भांडवलदारांच्या महत्त्वाकांक्षेला बळी पडणारा शेतकरीवर्गच नव्या सहकारी राष्ट्रवादाच्या शिकवणुकीतून लोकसत्तेचाही निर्माता होऊ शकेल, नव्या सामाजिक ध्येयांकडे वळू शकेल अशी त्यांना खात्री होती. मात्र त्यासाठी चळवळीची सुरुवात केवळ शहरी लोकांच्या व पांढरपेशा वरिष्ठवर्गांच्या आकांक्षांपासून न करता शेतकरीवर्गाच्या जीवनापासून केली पाहिजे असे त्यांनी आवर्जून सांगितले होते. हेतू असा, की असे करण्यातून शेतकरीवर्गाची जातीय, प्रादेशिक व धार्मिक भावनांच्या आधारे दिशाभूल करण्याचे व अंतर्गत यादवी लावण्याचे वरिष्ठवर्गीयांचे प्रयत्न विफल करणे शक्य होईल.

सुस्त–क्षीण स्वरूपात दीर्घकाळ रेंगाळत राहिलेली संयुक्त महाराष्ट्राची चळवळ शेतकऱ्यांच्या जीवनपातळीपासून बांधण्याचा प्रयत्न कुणीच केला नाही. पुढे दशकभरानंतर भाषावार राज्य पुनर्रचना मंडळाचा अहवाल बाहेर आल्यानंतर या चळवळीला चालना मिळाली. ती एवढी आकस्मिक व जोरदार होती, की चळवळीची नीट आखणी करण्याइतपत उसंतच कुणाला मिळाली नाही. पुरोगामी भाषेत तिची मांडणी करणारे अनेक भाष्यकार निघाले; परंतु पुरोगामी दिशेने तिला नेण्याची धमक असलेले नेतृत्व मात्र अभावानेच पुढे आले. संयुक्त महाराष्ट्र हा आपल्याला 'समाजवादाचा पहिला प्रयोग (पायलट प्लान्ट) करण्यासाठी हवा' असल्याचे न. वि. गाडगीळ म्हणाले. तर 'संयुक्त महाराष्ट्राची चळवळ भांडवलदार, कंत्राटदार किंवा मध्यमवर्गीय विद्वान यांच्या हातून होणार नाही... या चळवळीचे नेतृत्व शेतकरी-कामकऱ्यांकडेच गेले पाहिजे. समाजवादी चळवळीनेच संयुक्त महाराष्ट्र मिळेल' असे पां. वा. गाडगिळांनीही ठणकावले. नुसताच संयुक्त महाराष्ट्र नव्हे तर समाजवादी महाराष्ट्र हे आपल्या चळवळीचे साध्य असल्याची भाषा एसेम, अत्रे, मोरे, डांगे प्रभृती नेत्यांनी वेळोवेळी केली होती.

पण हे नेमके कसे घडवून आणायचे याविषयी मात्र त्यांच्यात काडीमात्रही एकवाक्यता नव्हती. परिणामी शेतकरी-कामगारांना प्रादेशिक-धार्मिक प्रचारापासून सुरक्षित ठेवण्यासाठी ज्या प्रकारे ही चळवळ चालवली जाणे अगत्याचे होते, त्याच्या नेमक्या उलटया दिशेने ती सुरू राहिली होती.

संयुक्त महाराष्ट्र चळवळ कोणत्याच अर्थाने शेतकऱ्यांची–कामकऱ्यांची चळवळ होऊ शकली नाही. प्रजा समाजवादी पक्ष, साम्यवादी पक्ष, शेतकरी कामगार पक्ष, शेड्यूल्ड कास्ट फेडरेशन, जनसंघ, हिंदूमहासभा, क्रांतिकारी साम्यवादी, बोल्शेविक, लाल–निशाण, मजदूर–किसान आणि संयुक्त महाराष्ट्रवादी कॉंग्रेसजन असे जे अकरा डावे–उजवे पक्ष संयुक्त महाराष्ट्र समितीत एकत्र आले होते, त्यांच्यापैकी ज्याला खऱ्या अर्थाने श्रमिकांचा म्हणता येईल असा एकही पक्ष नव्हता. नेतृत्व तर सर्वांचेच एकजात शहरी मध्यमवर्गीय होते. त्यामुळे भावनिक आधारांवर प्रचंड जनमत प्रवाहित करण्यास यशस्वी ठरलेल्या या चळवळीला टिकाऊ स्वरूपाचे कोणतेच यश पदरात पाडून घेता आले नाही.

राज्यकर्त्यांना संयुक्त महाराष्ट्र देण्यास चळवळीने भाग पाडले; परंतु चळवळीच्या क्रमात ज्या अनेक अपेक्षा जनमानसात निर्माण झाल्या होत्या, त्यांपैकी एकही पूर्ण करणे तिला शक्य झाले नाही. थोडक्यात या अपेक्षा अशा सांगता येतील : चळवळीतून कॉंग्रेसला पर्यायी असा पक्ष या राज्यात उभा राहू शकेल, महाराष्ट्राचे सामाजिक जीवन






दीर्घकाल विषाक्त करून टाकणाऱ्या जातीयवादास मूठमाती मिळेल, मुंबईवर असलेली भांडवलदारांची मगरमिठी शिथिल होऊन मुंबई खऱ्या अर्थाने महाराष्ट्राची होईल, संकुचित प्रादेशिकतेचे नव्हे तर व्यापक समाजवादी निष्ठेचे स्वप्न साकार करण्याच्या वाटा खुल्या होतील, मराठवाडा, विदर्भ व कोकण या नव्याने महाराष्ट्रात आलेल्या मागास विभागांचा झपाट्याने आर्थिक विकास केला जाऊन उर्वरित महाराष्ट्राशी त्यांचे मनोमिलन सहज साध्य होईल वगैरे. ही कोणतीच अपेक्षा आजतागायत फलद्रूप झालेली नाही.

## पर्यायी पक्ष

संयुक्त महाराष्ट्र समिती समर्थ पर्यायी पक्ष म्हणून टिकेल आणि काँग्रेसला शह देऊ शकेल असे १९५७ च्या सार्वत्रिक निवडणुकीचे निकाल पाहून अनेकांना वाटले होते. समिती त्या वेळी लोकप्रियतेच्या सर्वोच्च शिखरावर होती. काँग्रेसचा सर्वत्र पराभव झाला होता. महाराष्ट्रातून संसदेच्या तेवीसपैकी दोन व विधानसभेच्या १३३ पैकी एकतीस जागा फक्त काँग्रेसला मिळाल्या होत्या. न. वि. गाडगिळांनी म्हटल्याप्रमाणे जिल्ह्याचे जिल्हे बेचिराख—बेकाँग्रेस झाले होते.

या यशाने आत्मविश्वस्त झालेल्या समितीने एकजिनसी पक्ष होण्याच्या हेतूने आपली एक घटना बनवली. पण ती अमलात मात्र आली नाही. किंबहुना यशाच्या अत्युच्च क्षणीच समितीच्या ऐक्याला तडे जात असल्याचे स्पष्ट होऊ लागले. एक संयुक्त महाराष्ट्र वगळता बाकी सर्वच बाबतीत घटकपक्षांत मतभेद उद्भवले. डाव्या पक्षांशी न जुळल्याने फेब्रुवारी १९५८ मध्ये जनसंघ समितीबाहेर पडला. बापट-कोठारी-अत्रे यांच्या समितीचे सांधेजोडप्रयत्न अपेशी ठरले. विधिमंडळात प्राप्त झालेला मुख्य विरोधी पक्षाचा दर्जा टिकवायचा तर स्वतंत्र घटना, सदस्यत्व, राजकीय व आर्थिक कार्यक्रम असलेला एकसंध पक्ष असे समितीचे स्वरूप राहिले पाहिजे, समाजवादी महाराष्ट्राचे साध्य पूर्ण होईपर्यंत ती अभंग राहिली पाहिजे ही भूमिकाच शेकापला नामंजूर होती. प्रत्यक्ष जनचळवळींच्या क्रमातून एकजिनसी पक्ष निर्माण होतो, पक्ष मोडून नवा पक्ष घडवल्यास तो गटबाजीने आतून फुटलेलाच राहतो अशी या पक्षाची भूमिका होती.

'द्विभाषिकाविरुद्ध प्रचंड लढा की सर्वशक्तिनिशी सीमालढा?' याही प्रश्नांच्या खडकावर समितीचे तारू आपटून फुटू लागले होते. डांगे द्विभाषिकाविरुद्ध लढण्याच्या बाजूचे, शेकाप सीमालढा जोमदारपणे चालवावा या मताचा, तर दोहोंचा उचित समन्वय ठेवावा ही एसेमची भूमिका होती. परिणाम असा झाला, की एकीकडे संयुक्त महाराष्ट्राच्या रूपाने समितीचे स्वप्न साकार होत असतानाच तिच्या युतीला फुटीचे ग्रहण लागले; आणि महाराष्ट्राचा मंगलकलश आणण्याचा मान काँग्रेसला आयताच मिळाला.

१ मे १९६० रोजी समितीचे अवतारकार्य संपले, आता "राष्ट्रद्रोही" कम्युनिस्टांशी आणि जातीय पक्षांशी जोडून राहण्याऐवजी राष्ट्रवाद आणि लोकशाही समाजवाद यांच्याशी परिबद्ध असलेल्या पक्षाशी सहकार्य करण्याच्या इराद्याने प्रसप समितीतून बाहेर पडला. हिंदुमहासभा, शेकाप, कम्युनिस्ट आणि रिपब्लिकन पक्षाचा एक गट यांनी कसेबसे समितीचे अस्तित्व टिकवून ठेवले. १९६२ च्या निवडणुकीत अपेक्षित प्रतिसाद मात्र ते मतदारांकडून मिळवू शकले नाहीत. चीनच्या आक्रमणाचा फटका साम्यवाद्यांबरोबर शेकापलाही बसला. १९६७ साली संपूर्ण महाराष्ट्र समितीच्या नव्या रूपात उभ्या राहिलेल्या समितीलाही प्रभाव पाडता आला नाही.

वैचारिक बैठक आणि संघटनात्मक बांधणी यांविषयी एकवाक्यतेचा अभाव, तद्वतच कार्यक्रमांचे प्रासंगिक स्वरूप या वैगुण्यांपोटी समितीच्या एकजुटीचे आधार प्रासंगिक व मर्यादित राहणे अपरिहार्य ठरले. काँग्रेसच्या मुरब्बी नेत्यांनी या वस्तुस्थितीचा पुरेपूर लाभ उठवून या राज्याच्या राजकारणावरची आपली सुटत चाललेली पकड पक्की बसवली. नंतरच्या काळात झालेला पुलोदचा प्रयोग म्हणजे समितीच्या इतिहासाचीच छोटी पुनरावृत्ती ठरली. काँग्रेसचे इथले बस्तान आजपर्यंत तरी टिकून आहे. त्यात सहकारी चळवळ किंवा विकेंद्रीकरण यांचा वाटा आहेच; पण विरोधी पक्षांचा कच्चेपणा व भाऊबंदकी यांचा वाटा मोठा आहे.

## जातीयवाद

संयुक्त महाराष्ट्र समितीने महाराष्ट्रातला ब्राह्मण-ब्राह्मणेतरवाद गाडून टाकला असाही ग्नार






१९५७ च्या निवडणुकीनंतर इथे बराच काळ सुरू होता. तोही पोकळ असल्याचे लवकरच अनेक परींनी सिद्ध झाले.

संयुक्त महाराष्ट्राचे अनेक विरोधक जातीय कारणांनी त्या मागणीस प्रतिकूल होते. संयुक्त महाराष्ट्र झाला तर ब्राह्मणेतरांचे राज्य होईल, जातीयता वाढेल अशी भीती अनेकांनी व्यक्त केली होती. भाऊ भोपटकर न. वि. गाडगीळ यांना म्हणाले होते, की ' बाबा, आम्हा ब्राह्मणांना मुंबई तरी आश्रयाला राहू द्या. महाराष्ट्रात आम्हाला जिवंतसुद्धा राहणे कठीण होईल. ' लोकनायक अणे यांनाही महाराष्ट्र याच कारणासाठी नको होता. इथे ' सारे कुणब्यांचे राज्य होईल ' अशी भीती कन्नमवारांनीही व्यक्त केली होती. मोठे महाराष्ट्र राज्य झाल्यास मराठे वरचढ होतील आणि वरचे ब्राह्मण व खालचे हरिजन यांच्यावर अन्याय होईल अशा आशयाचे भाषण डॉ आंबेडकरांनीही राज्यसभेत केले होते.

आपली प्रतिमा जात्यतीत ठेवण्याचा प्रयत्न समितीचे नेते कसोशीने करीत होते. परंतु समितीच्या नेत्यांपैकी निवडून फक्त ब्राह्मणांचीच नावे पुढे फेकून समितीला ब्राह्मणी ठरविण्यात तिच्या विरोधकांना यश मिळाले. टिळक जन्मशताब्दीच्या वेळी नेहरू आले असताना निदर्शने न करणाऱ्या समितीने पुढे प्रतापगडावर शिवाजीच्या पुतळ्याच्या अनावरणासाठी आलेल्या नेहरूंसमोर उग्र निदर्शने करण्याचा निर्णय घेतला, तेव्हा यातून समितीचे टिळकप्रेम आणि शिवद्रोह प्रगट होत असल्याची खोडसाळ आणि आगलावी टीका काँग्रेसवाल्यांनी केली आणि आपले नाणे उजवून घेतले. पश्चिम महाराष्ट्रात ब्राह्मण-ब्राह्मणेतरवादाचे कुरण ठरलेला जातीय तणावांचा वणवा पुन्हा भडकला. जेधे–मोरे या वेळपावेतो पुन्हा काँग्रेसमध्ये आले होते त्यांनी जुने मद्य पुन्हा नव्या बाटल्यांमध्ये भरून वाटले. छत्रपती आणि एकूण मराठा समाज यांच्याशी आपलं इमान शाबीत करण्यासाठी काँग्रेसला हा प्रचार उपकारक ठरला. बहुजनसमाजाची ताकद काँग्रेसच्या झेंड्याखाली परत आणून 'मराठी' नसले, तरी 'मराठा' राज्याची पायाभरणी या राज्यात काँग्रेस करू शकली. मराठी समाजजीवनावर मात्र त्याचे दीर्घकालीन दुष्परिणाम घडून आले.

१९५७ च्या निवडणुकीत समितीचे अनेक उमेदवार निवडून आले असले, तरी त्यांचे पक्ष आपापल्या सीमित अस्तित्वांना चिकटून असल्यामुळे त्या त्या पक्षांच्या जातीय अस्मितांमधून त्यांची सुटका होऊ शकली नाही. समितीचे काही घटकपक्ष तर उघडच कर्मठ जातीयवादी होते. त्यामुळे जात्यतीत होण्याची काही नेत्यांची आकांक्षा समितीच्या राजकारणातून पूर्ण होणे केवळ अशक्य होते. आजही मराठी समाज जातीय तेढींनी पोखरलेला आहे. अलीकडच्या काळात मिरज-सांगलीकडे फोफावत असलेले हिंदू एकता आंदोलन, पुणे-शहादे भागांत बोकाळलेली पतितपावन संघटना किंवा दिवसेंदिवस उद्दाम होत चाललेला मराठा महासंघ ही सारी समितीच्या 'जात्यतीत' राजकारणाचीच अनौरस संतती मानता येईल. शिवसेनानामक प्रतिगामी विकृतीचे जनकत्वही समितीच्याच पदरात घालावे लागेल.

## समाजवादी महाराष्ट्र

समितीने ज्या विविध कार्यक्रमांमधून आपली चळवळ चालवली, त्यांत ठोस आर्थिक भूमिकेची एकूण वानवाच होती. संयुक्त महाराष्ट्र व्हावा या एका मागणीखेरीज समितीतल्या पक्षांचे कशाविषयीच एकमत नव्हते. समाजवादाचा उद्‌घोष अनेकांनी वेळोवेळी केला असला तरी त्याचा आशय आणि मार्ग यांबाबत डाव्या घटकपक्षांच्याही धारणा एकसारख्या नव्हत्या. त्यामुळे संयुक्त महाराष्ट्र झाला आणि समितीचे जणू अस्तित्वकारणच संपले. तिचा समाजवाद घोषणेपुरताच राहिला. मुंबई महाराष्ट्राला मिळाली; पण खऱ्या अर्थाने ती महाराष्ट्राची कधीच झाली नाही. भांडवलदारांच्या मगरमिठीतून तिची सुटका आजपर्यंत कोणत्याच सरकारला करता आलेली नाही. समितीने चळवळीच्या क्रमात भांडवलशाहीविरुद्ध एकदिलाने, चिवट आणि शिस्तबद्ध लढा देण्याचे धोरण ठरवून राबवले असते, तर आजच्यापेक्षा निराळे चित्र दिसू शकले असते. पण तसे करण्याऐवजी मराठी अस्मिता, मराठी अस्मितेच्या ऐतिहासिक परंपरा आणि सांस्कृतिक आगळेपणा यांच्या संकीर्तनाचा प्रचंड उपद्व्याप करणे किंवा भावनिक प्रश्नांवर जनमने भडकावणे यांवरच समितीने आपली मुख्य भिस्त ठेवली.

परिणामी समितीला समाजवादाच्या दिशेने ठोस पावले उचलणे स्वाभाविकच अशक्य ठरले. पुढे तर तिचा निर्वंशच झाला. समाजवादी वाटांनी जाणे सरकारला भाग पाडतील अशा संघटित शक्तीच इथे उभ्या राहू शकल्या नाहीत. उलट, अतीत-गौरवी जीर्णोद्धारकरी शक्तींचाच सर्वत्र सुळसुळाट झाला. शिवसेनेसकट सर्व प्रतिगामी विकृतींना खतपाणी घालून जोपासण्याचे कार्य कॉंग्रेसी राज्यकर्त्यांनी इमानेइतबारे केले. समाजवादी समाजरचनेच्या वल्गना एकीकडे करीत करीतच भांडवलदारांच्या जोडीने साखर संस्थानिकांच्या व ग्रामीण नवश्रीमंतांच्या हवाली संयुक्त महाराष्ट्राची सारी सूत्रे या राज्यकर्त्यांनी केली.

## खरा संयुक्त महाराष्ट्र कधी होणार ?

विदर्भ, मराठवाडा व कोकण या विभागांच्या संयुक्त महाराष्ट्राकडून काही अपेक्षा होत्या. मराठी भाषिकांचे एक राज्य होणे हे संयुक्त महाराष्ट्र चळवळीचे स्वयमेव साध्य कधीच नव्हते. एकभाषीय कारभारातून सांस्कृतिक आणि आर्थिक विकास घडवण्याचे एक साधन म्हणून संयुक्त महाराष्ट्र चळवळकर्त्यांना हवा होता. विशेषतः अनेक शतकां-पासून उपेक्षित राहिलेल्या उपरोक्त विभागांना असे वाटले होते, की संयुक्त महाराष्ट्र झाल्यावर लवकरच आपले नष्टचर्य संपेल. प्रत्यक्षात सारे विपरीत घडल्याचेच त्यांच्या प्रत्ययास आले.

आर्थिक विकासाबाबत प्रादेशिक असमतोल आणि त्यातून अनिवार्यतः ठायी ठायी निर्माण झालेली अनुशेष–( बॅकलॉग )पूर्ती मागणारी आंदो-लने हे आजचे महाराष्ट्राचे चिंताजनक वास्तव आहे. विदर्भातील मारवाडी भांडवलदार आणि त्यांचे मुंबईतले गुजराती हितचिंतक यांच्या विरोधाला न जुमानता विदर्भविभाग संयुक्त महाराष्ट्रात आला. आज चोवीस वर्षांनंतर पुन्हा स्वतंत्र विदर्भ आंदोलन छेडावे लागते की काय, अशी मनःस्थिती इथे जोर धरीत आहे. या परि-स्थितीला महाराष्ट्र शासनाचे चुकीचे आर्थिक नियोजनच कारणीभूत ठरले आहे. अतुलनीय खनिज संपत्ती व वनौपज क्षमता लाभलेल्या विदर्भाच्या विकासाचे गाडे सरकारी नाकर्तेपणामुळे अडले आहे. इथे शेती आणि उद्योग या दोन्ही क्षेत्रांत महाराष्ट्र-राज्यनिर्मितीपूर्वीचा मागासलेपणा आजही तसाच आहे. पश्चिम महाराष्ट्राच्या तुलनेत विदर्भ, मराठवाडा व कोकण या प्रदेशांत पक्के रस्ते, जलसिंचन प्रकल्प, नैसर्गिक साधनसंपदेचा विनियोग, शैक्षणिक विकास, उद्योगधंदे, सहकाराचे प्रयोग वगैरे प्रत्येक बाबतीत प्रचंड तफावत असल्याचे आढळते. सविस्तर जिल्हावार आकडे-वाऱ्यांसह या प्रदेशांनी आपापल्या मागासलेपणाचे आलेख गेल्या वर्षभरात वेशीवर टांगले आहेत. इथे उदाहरणार्थ केवळ उद्योगधंद्यांपुरतेच बघायचे झाल्यास पुढील चित्र दिसते : महाराष्ट्रातील एकूण पंजीकृत संघटित कारखान्यांपैकी ४८·९० टक्के कारखाने एकटया मुंबई शहरात आहेत. ठाणे व पुणे जिल्ह्यांत अनुक्रमे १०·६१ व ९·३९ टक्के आहेत. म्हणजे राज्याची २५ टक्के लोकसंख्या असलेल्या या तीन जिल्ह्यांतच ६८·९० टक्के संघटित कार-खाने आहेत. याउलट, विदर्भाचे आठ जिल्हे मिळून ८·७८ टक्के ( म्हणजे एकटया पुणे जिल्ह्याहूनही कमीच ) व मराठवाड्याच्या संपूर्ण पाच जिल्ह्यांत मिळून ३·२५ टक्के संघटित उद्योग आहेत. कोकणात हे प्रमाण यापेक्षाही कमी आहे. आणि जे उद्योग-धंद्यांबाबत तेच विकासाच्या सर्व बाजूंबद्दल खरे आहे.

'संयुक्त महाराष्ट्र झालाच पाहिजे' म्हणून पंचवीस वर्षांपूर्वी बेभान घोषणा देत लाठ्या-गोळ्यांची पर्वा न करणाऱ्या मराठी माणसाला १ मे १९६० रोजी जेव्हा गाजावाजापूर्वक संयुक्त महाराष्ट्र झाल्याचे सांगितले गेले, तेव्हा तो कृतकृत्य झाला होता. नंतरच्या काळात मराठी राजभाषा झाली, प्रशासनाची भाषा झाली, विधिमंडळाचे कामकाज बव्हंशी मातृभाषेत चालू लागले, मराठा जातीच्या वर्चस्वाला शह देत खालच्या जातींचे नेतृत्व पुढे सरसावत गेले– ही सारी वाटचाल स्वागतार्हच होती. पण जे व्हायचे राहून गेले तेच अधिक मौलिक होते. तीन कोटी मराठी जनतेची अंतःकरणे जोडली गेली नाहीत. समाजवादी ध्येये अडगळीतच पडून आहेत प्रतिगामित्व दिसामाशी वाढत आहे. संभ्रमित मराठी माणूस 'खरा संयुक्त महाराष्ट्र कधी होणार ?' हा प्रश्न हलक्या आवाजात विचारू लागला आहे. अर्थात अजून त्यात 'झालाच पाहिजे'चा जोम नाही– पण उद्या तो येणारच नाही असेही कुणी समजायचे कारण नाही.





अनुक्रमणिका

# मुद्रा भद्राय राजते—

देवदत्त दाभोलकर

## संयुक्त महाराष्ट्राची उद्दिष्टे : काय साधले ? काय राहिले ? का राहिले ?

'महाराष्ट्र राज्याची मार्गदर्शक तत्त्वें' या महाराष्ट्र शासनाच्या प्रकाशनात खालील निर्देश आहे :

'संयुक्त महाराष्ट्र हे केवळ साध्य नाही तर सामाजिक एकता व समानता गाठण्याचे ते साधन आहे. महाराष्ट्राच्या सर्व समस्यांचा विचार भारताच्या समस्यांच्या संदर्भातच करण्यात आला पाहिजे, आणि भारताचा अविभाज्य भाग म्हणूनच या राज्याचा विकास करण्यात आला पाहिजे.

'राष्ट्र आणि महाराष्ट्र यांच्या प्रवृत्ती परस्पर-विरोधी नाहीत. आमची राष्ट्रनिष्ठा आणि महा-राष्ट्रनिष्ठा ही एकमेकांच्या हातात हात घालून चालणारी असली पाहिजे.'

गेल्या पंचवीस वर्षांचा इतिहास पाहिला तर भारत राष्ट्र आणि महाराष्ट्र यांच्यामधील पर-स्परसंबंधाविषयीचे हे आश्वासन आपण पूर्णपणे पाळले आहे असा निर्वाळा महाराष्ट्र देऊ शकेल व भारतही तो मोकळ्या मनाने मान्य करील असे वाटते.

परंतु राष्ट्रीय अनुसंधान सतत राखण्याचे हे आद्य अवधान ठेवण्याखेरीज अन्य कोणती उद्दिष्टे महाराष्ट्र राज्याने आपल्या समोर ठेवली होती ? या प्रश्नाचे पुरेसे स्पष्ट आणि तपशीलवार उत्तर संयुक्त महाराष्ट्राचे आद्य मुख्यमंत्री श्री. यशवंतराव चव्हाण यांनी या अगदी प्रारंभीच्या कालखंडात वेळोवेळी केलेल्या भाषणांतून मिळते. खालील सर्व उतारे, 'सह्याद्रीचे वारे –मुख्यमंत्री श्री. यशवंतराव चव्हाण यांच्या निवडक भाषणांचा संग्रह' या महाराष्ट्र शासनाच्या प्रसिद्धी विभागाने २६ जानेवारी १९६२ रोजी प्रकाशित केलेल्या ग्रंथातून घेतले आहेत. त्यांचे विचार त्यांच्याच शब्दांत सांगण्याने त्यात नेमके-पणा येईल म्हणून त्यांचे शब्दच जसेच्या तसे उद्धृत करण्यात आले आहेत.

श्री. यशवंतराव चव्हाण यांच्या भाषणांतील या संदर्भातील महत्त्वाचे विचार असे :

(१) महाराष्ट्राच्या निमित्ताने निर्माण होणारे राज्य हे मराठा राज्य आहे की मराठी राज्य आहे ? असले प्रश्न उभे करणे हे भंगलेले मन सांधण्याची प्रक्रिया नाही. परंतु अशा तऱ्हेचा प्रश्न उभा करून जातीय आणि संशयाचे वातावरण निर्माण करण्याचा कुणी प्रयत्न केला तर मला त्यांना जरूर सांगावयाचे आहे की, हे मराठा राज्य मुळीच होणार नाही. जोपर्यंत माझ्या हातात सत्तेची सूत्रे असतील तोपर्यंत निदान, मी हे राज्य एका जातीचे, मराठ्यांचे किंवा आणखी एखाद्या जातीचे होऊ देणार नाही. ते तसे होत आहे असे वाटले, तर महाराष्ट्राच्या कल्याणाकरिता, मराठा जातीत जन्माला आलो आहे म्हणून मला कदाचित् एका बाजूला हटावे लागले तरी मी हटण्याचा प्रयत्न करीन, पण ही गोष्ट मी होऊ देणार नाही. (पृ. १०)

(२) या भंगलेल्या मनाचा दुसरा एक परिणाम महाराष्ट्राच्या जीवनावर झालेला आहे, तो म्हणजे नवबौद्धांचा प्रश्न होय. त्याला महार समाजाचा प्रश्न म्हणून आपण सामान्यतः म्हणतो. परंतु निव्वळ महार जातीचा तो प्रश्न आहे या दृष्टि-कोनातून मी त्याकडे पहात नाही. डॉ. आंबेडकरांनी त्या समाजात नवी जागृती निर्माण केली व अनेक बुद्धिमान, विचार करणाऱ्या कर्तृत्ववान तरुणांचा

एक नवा वर्ग त्यांनी त्या समाजातून निर्माण केला. एवढ्या मोठ्या संख्येने तुमच्या आमच्या बरोबर जो समाज महाराष्ट्रात वावरला आणि ज्याला आपण अस्पृश्य म्हणून बाजूला फेकून दिले त्या समाजाचा स्वाभिमान आज जागृत झाला आहे. ह्या समाजात जे कर्तृत्ववान आणि बुद्धिमान लोक आहेत त्यांना आपण आता जवळ केले पाहिजे, आपलेसे केले पाहिजे. आम्हाला कुणाची सहानुभूती नको आहे, आमचा जो हक्क आहे तो आम्हाला मिळाला पाहिजे आणि आम्ही तो मिळविणार आहोत, या जिद्दीने काम करण्याची कुवत त्यांच्यात निर्माण झाली आहे. तिचे आम्ही स्वागत केले पाहिजे. ( पृ. ११–१२ )

(३) राज्यात बदल झाला तरी मुंबईचे काहीही नुकसान होणार नाही. आम्ही प्रेमाने, जिव्हाळ्याने मुंबई शहरातील मंडळींना वागविणार आहोत. गुजराथी, मारवाडी, पारशी, सिंधी, पंजाबी जे जे कोणी असतील ते ते सर्व आमचे भाऊ आहेत. ... ... या सगळ्या भावांनी आमच्या येथे राहावे, आपण सुखी व्हावे आणि मुंबईला समृद्ध करावे म्हणजे महाराष्ट्र आपोआप समृद्ध होईल. अशीच आमची त्यांना विनंती राहील आणि अशीच आमची वर्तणूकही राहील. ( पृ. १६–१७ )

( ४ ) आजपर्यंत आम्ही जे शिक्षण घेतले ते शिक्षण चांगले असेल, योग्यही असेल; परंतु त्यामुळे आमच्यात नोकरीपेशाची मनोवृत्ती निर्माण झाली आहे. आम्हाला असे सांगण्यात येते की, आमची बुद्धीच–आमचा पिंडच–नोकरीपेशाचा आहे. मला ही गोष्ट मंजूर नाही. ... आम्ही आमच्यामध्ये किर्लोस्करांसारख्या व्यक्ती निर्माण केल्या. आजही आमच्या येथे मोठ्या पल्लेदार बुद्धीने विचार करणारे कारखानदार निर्माण होत आहेत, ते काय आमच्यात उद्योगधंद्याची दृष्टी नसण्याचे लक्षण आहे मी म्हणतो, खऱ्या अर्थाने आमच्यामध्येही ही दृष्टी आहे. फक्त आम्हाला तांत्रिक शिक्षण, वेगवेगळ्या शास्त्रांचे शिक्षण घेतले पाहिजे. अशा तऱ्हेच्या शिक्षणाला आपण प्राधान्य दिले पाहिजे. याशिवाय ज्याला आपण निव्वळ ह्युमॅनिटीजचे शिक्षण म्हणतो अशा तऱ्हेच्या शिक्षणाचेही अर्थात् महत्त्व आहेच. ते मूलभूत शिक्षण आम्हाला मंजूर आहे आणि या शिक्षणाच्या बाबतीत, शिक्षणाची सारी दारे सताड उघडी करून ते खालच्या थरापर्यंत पोहोचविण्याचे आमचे ध्येय असले पाहिजे. मी तर असे म्हणेन की, या तऱ्हेच्या शिक्षणाचे प्रकाशझोत अगदी शेवटच्या थरापर्यंत जर आम्ही नेऊ शकलो, तर महाराष्ट्राची शक्ती इतकी जबरदस्त वाढेल, की त्याला कोणाच्याही मेहेरबानीवर अवलंबून राहण्याचे कारण राहणार नाही. तो स्वतःचे रक्षण करील व राष्ट्राचेही रक्षण करील.

(५) मी असे मानतो की, स्वातंत्र्यप्राप्तीनंतर आणि भाषिक राज्यांच्या निर्मितीनंतर, वैचारिक व सांस्कृतिक पुनरुज्जीवन घडवून आणणारा एक शक्तिशाली नवा प्रवाह भारतीय जीवनात निर्माण झाला असून आपण आता एका समृद्ध अशा कालखंडात प्रवेश करीत आहोत. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर लोकजीवन समृद्ध करण्याची जी प्रतिज्ञा आपल्या देशाने केली तिचाच हे पुनरुज्जीवन एक भाग असून भाषिक राज्यांच्या निर्मितीमुळे या पुनरुज्जीवनाच्या कार्यासाठी आम्हाला एक नवे साधन प्राप्त झाले आहे. यापुढे आता एक निश्चित कालखंड सुरू होत असून या क्षेत्रात घेतलेल्या जबाबदाऱ्या आपण पूर्ण केल्या पाहिजेत... या दृष्टीने साहित्य-संस्कृती मंडळ स्थापन करण्यात आले आहे.

या मंडळाच्या निर्मितीसंबंधी जो सरकारी आदेश प्रसिद्ध झाला आहे, त्यात या मंडळाच्या कार्याची व्याप्ती स्थूलमानाने दर्शविण्यात आली आहे परंतु या मंडळाने कोठल्या प्रकारचे काम करावे, ते कोणत्या पद्धतीने करावे यासंबंधी कुठलेही बंधन, कुठल्याही मर्यादा शासन या मंडळावर घालू इच्छित नाही. सरकारी आदेशातील यासंबंधीचा उल्लेख केवळ नाममात्र आहे ... हे मंडळ महाराष्ट्राचे जीवन व्यापक, विस्तृत व क्रियाशील करणारे माध्यम बनावे अशी माझी त्याबद्दलची कल्पना आहे ... साहित्यिकांच्या महान् यात्रेत, संस्कृतीचा आणि स्वाधीन साहित्याचा जरीपटका खांद्यावर घेऊन ही संस्था यशःश्रीच्या सतत आघाडीवर राहो अशी सदिच्छा व्यक्त करून मी या मंडळाचे उद्घाटन झाले असे जाहीर करतो. (पृ. २९६–३०२)

(६) मराठी भाषा ही राज्यभाषा करण्याचे तत्त्व आम्ही स्वीकारले आहे. त्यामुळे आम्ही काही जबाबदाऱ्या स्वीकारल्या आहेत. मराठी भाषेवर लोकशाहीचा कारभार करण्याची आता जबाबदारी आली असून तो तिने अशा रीतीने केला पाहिजे की, लोकांचे जीवन संपन्न होण्यास, समृद्ध होण्यास तिचे साहाय्य होईल. (पृ. २९९)

राज्यकारभार इंग्रजीच्या ऐवजी आता मराठीत चालविणे कसे इष्ट व निकडीचे आहे याची सरकारला पूर्ण जाणीव आहे. हा बदल कारभारातील कार्यक्षमतेस बाध न येऊ देता करावयाचा आहे. या कार्यास चालना मिळावी म्हणून सरकार 'डायरेक्टोरेट ऑफ् लँग्वेजेस्' या नावाचे एक खाते तांबडतोब सुरू करीत आहे. (पृ. ५६–५७)

(७) समाजवादी पद्धतीचे नियोजन करण्यास आज आपण बद्धपरिकर आहोत. (पृ. ५५) सर्वांना समान संधी मिळाली पाहिजे. उत्पन्नात जो फार मोठा फरक आहे तो कमी झाला पाहिजे. आणि प्रत्येक व्यक्तीचे जे व्यक्तिमत्त्व असते त्याचा विकास करण्याची संधी त्या व्यक्तीला मिळाली पाहिजे. आमची समाजवादाची व्याख्या ही अशी आहे. (पृ. २४०) भांडवलशाही राष्ट्रे आणि कम्युनिस्ट राष्ट्रे यांच्यासमोर नियोजनाच्या द्वारा आर्थिक विकास करताना निर्माण झाली नाही अशी एक वेगळीच समस्या भारतासमोर आज निर्माण झाली आहे. ... नियोजनाच्या मदतीने आर्थिक विकासाची जबाबदारी या देशाने घेतली आहे. ती जबाबदारी लोकशाही मूल्यांची जपणूक करून पार पाडण्याचा प्रयत्न आपण करीत आहोत. ... आपणाला असेच नियोजन करावयाचे आहे की, जे व्यवहारात बसू शकते. आणि हाच प्रश्न फार महत्त्वाचा आहे. (पृ. १०९)

(८) विदर्भ, मराठवाडा, कोकण व दुष्काळी भाग यांच्या विकासाकडे विशेष लक्ष पुरविण्यात येईल व महाराष्ट्र राज्याचे सरकार त्यांचे हितसंबंध डोळ्यात तेल घालून जपेल. (पृ. ५६)

या एकूण प्रश्नाविषयीची आपली भावना श्री. यशवंतराव चव्हाण एके ठिकाणी प्रकट करतात :

'महाराष्ट्राच्या भवितव्याची ही मोठीच मोठी, लांबच लांब सफर आहे. त्या सफरीतील आम्ही प्रवासी आहोत ही भावना नम्रतेने आपले प्रत्येक पाऊल टाकताना आपण आपल्या मनाशी ठेवली पाहिजे ...... ती लांबची सफर आहे, कष्टाची सफर आहे, उद्योगाची सफर आहे. पण ती पुरी केलीच पाहिजे. कारण त्यामध्ये जनतेचे कल्याण आहे.' (पृ. २३)

आज पंचवीस वर्षांच्या कालखंडानंतर या उद्दिष्टांकडे मागे वळून पाहिले आणि या दीर्घ सफरीचा आपण किती भाग पूर्ण केला याचा विचार केला तर काही गोष्टी ठळकपणे नजरेत भरतात :

(१) ज्या दिशेने आपण प्रवास करावयाचे योजले होते त्याच दिशेने सामान्यतः हा प्रवास सुरू आहे व प्रत्येक उद्दिष्टांच्या दिशेने आपण काही ना काही प्रगती केलेली आहे. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचे समर्थ नेतृत्व साहित्य संस्कृती मंडळाला दीर्घकाल अखंड २० वर्षे मिळाल्यामुळे त्या मंडळाने आपल्या उद्दिष्टांच्या दिशेने केलेली वाटचाल ही विशेष लक्षणीय अशी होऊ शकली. अन्य उद्दिष्टांच्या दिशेने करावयाच्या वाटचालीसाठी असे दीर्घकाल सलग समर्थ नेतृत्व लाभले नाही व त्या उद्दिष्टांच्या दिशेने करावयाच्या मार्गक्रमणात असणाऱ्या समस्याही अधिक बिकट स्वरूपाच्या होत्या.

(२) महाराष्ट्र राज्य हे मराठा राज्य होणार नाही, मराठी राज्य होईल हे आश्वासन कार्यकारी झाले आहे. मुंबईविषयी अन्य भाषिकांना व अन्य राज्यांतील लोकांना दिलेला दिलासाही प्रत्यक्षात लाभल्याचा प्रत्यय त्यांना आलेला आहे.

(३) महाराष्ट्रातील दलितांच्या संदर्भात दलित पँथर्सचा उदय व समर्थ दलित साहित्याचा आविष्कार या केवळ महाराष्ट्रातच नव्हे तर भारतातही लक्षणीय वाटाव्यात अशा घटना या कालखंडात घडल्या व दलितांच्या समस्येकडे समाजाचे लक्ष वेधून घेण्याचे प्रभावी कार्य त्यांनी केले. महाराष्ट्र राज्याने यासाठी काही विशेष केले नसले तरी महाराष्ट्र राज्याची गुजरातपासून वेगळे होऊन झालेली निर्मिती या दोन्ही घटनांना हितावहच ठरली. मराठवाडा विद्यापीठाच्या नामांतरास प्रथम आमदारांकडून मिळालेला एकमुखी पाठिंबा

हे एका प्रगत भावनेचे निदर्शक होते, परंतु त्याच बरोबर या प्रश्नावर मराठवाड्यात दलितांविरुद्ध झालेले उद्रेक व शासनाने त्या वातावरणापुढे घेतलेली माघार यांनी बोलघेवड्या भावना व कणखर कृती यांमध्ये असलेल्या अंतराचा प्रत्यय आणून दिला. श्री. शंकरराव खरात यांची महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या अधिवेशनाचे अध्यक्ष म्हणून, अटीतटीच्या सामन्यानंतर झालेली निवड व त्यांचे महाराष्ट्राच्या सर्व स्तरांतून झालेले उत्स्फूर्त स्वागत ही मात्र या वर्षी एका अत्यंत दिलासा देणारी घटना घडली.

(४) वेगवेगळे सामाजिक गट, वेगवेगळे प्रदेश यांच्या अंतर्गत विषम विकासाचे प्रश्न सोडवत असताना काळ, काम, वेगाचे प्रश्न साहजिकपणेच पुढे येतात व भावना व व्यवहार यांची सांगडही घालावी लागते अशा परिस्थितीत गती व दिशा यांचे व्यावहारिक निर्णय घेताना काही ताण निर्माण होणेही अटळ असते. परंतु शासनाच्या मूलभूत आग्रहाविषयी विश्वास असला तर या ताणातूनही समजुतीने मार्ग काढता येतो. दलितांच्या समस्या, त्याचप्रमाणे मराठवाडा, विदर्भ यांच्या तुलनात्मक प्रादेशिक मागासलेपणाच्या समस्या यांच्याबाबत आपल्या कणखर आग्रहाच्या आश्वासनाची भावना महाराष्ट्र शासन निर्माण करू शकले नाही ही दुर्दैवी परिस्थिती आहे. यापुढच्या काळात अशी भावना निर्माण करावयाची असल्यास पश्चिम महाराष्ट्रातील नेतृत्वाला त्यासाठी विशेष प्रयत्न करावे लागतील. विषमतेचे आजचे मोजमाप कसे होते ( प्रा. वि. म. दांडेकर यांची समिती प्रादेशिक विषमतेबद्दल आपले निष्कर्ष काढतच आहे ), यापेक्षाही या प्रश्नाकडे पाहण्याची प्रामाणिक वृत्ती कोणती आहे ही गोष्ट अशा संदर्भात महत्त्वाची ठरते.

(५) कर्तृत्वाचा, कणखरपणाचा अभाव याच्याखेरीज दुसरे कोणतेही कारण ज्या आघाडीवरील प्रगती अतिशय मर्यादित का राहिली या प्रश्नाचे उत्तर देताना देता येत नाही ती आघाडी म्हणजे शिक्षणात व शासकीय व्यवहारात मराठी भाषेच्या वापराविषयीची होय. आंतरराष्ट्रीय ज्ञानार्जनाची भाषा म्हणून इंग्रजी व भारतातील संपर्कभाषा म्हणून हिंदी असे या भाषांचे महत्त्व निर्विवाद आहे. परंतु इंग्रजी आपण सर्व विद्यार्थ्यांवर लादतो व हिंदीचे महत्त्व संपर्कभाषेच्याही पलीकडे नेतो या गोष्टी केवळ अज्ञानाने, गैरसमजुतीने व दुबळेपणाने घडत आहेत. याविषयीचे प्रस्तुत लेखकाचे विचार त्याने अन्यत्र मांडले आहेत व या लेखाच्या मर्यादेत या विषयाचे विवेचन करणे शक्यही नाही. खरे तर ते या लेखात आवश्यकही नाही. कारण त्या दोन्ही भाषा मराठीला मारक होतील अशा पद्धतीने पुढे याव्यात अशी महाराष्ट्र राज्याची मूलभूत भूमिकाच असू शकत नाही.

(६) शिक्षणाच्या क्षेत्रात संख्यात्मक विस्ताराच्या दृष्टीने खूपच प्रगती या कालखंडात दिसून येते. परंतु हे केवळ महाराष्ट्र राज्याचेच वैशिष्ट्य होते असे नव्हे. भारतात सर्वत्रच शिक्षणाचा संख्यात्मक विस्तार या कालखंडात झपाट्याने झाला असे आढळून येते. परंतु शिक्षणाच्या विस्ताराबरोबरच शिक्षणाची गुणवत्ता कायम राखणे, समाजातील वंचित स्तरापर्यंत शिक्षणाचे प्रवाह प्रभावीपणे पोहोचविणे व पदवीपर्यंतच्या शिक्षणक्रमात मराठी माध्यमातून सकस ज्ञान पोचविण्याची तरतूद करणे ही आपली उद्दिष्टे पार पाडण्यात आपण फार अपुरे पडलो. यात काही दोष शासनाचा आहे; परंतु प्रामुख्याने याची जबाबदारी शिक्षणक्षेत्रात काम करणाऱ्या आम्हा लोकांचीच आहे. आम्ही यासाठी शिक्षणक्षेत्रात आवश्यक अशी रचना करू शकलो नाही व संघटनाही उभी करू शकलो नाही. शैक्षणिक परिवर्तन व शैक्षणिक परिवर्तनातून समाजपरिवर्तन या संकल्पना आम्ही स्वतःच आत्मसात् करू शकलो नाही. मग अशा परिवर्तनासाठी आवश्यक असे जनमानस तयार करणे हे तर दूरच राहिले. १९६८ मध्ये त्या वेळचे शिक्षणमंत्री श्री. मधुकरराव चौधरी यांनी विधानसभेला सादर केलेल्या शैक्षणिक पुनर्रचनेसंबंधीच्या श्वेतपत्रिकेची जी परवड झाली ती याच वस्तुस्थितीचे निदर्शन आहे. गुणात्मक विकास व त्याबरोबरच वंचित समूहांना शिक्षणाची समान संधी ही श्वेतपत्रिकेमागील मुख्य सूत्रे ही महाराष्ट्र राज्याचीच मूलभूत उद्दिष्टे होती. परंतु अजाणता किंवा विशिष्ट हितसंबंधांतून हेतुपुरस्सरपणे श्वेतपत्रिकेवर ज्या वेळी

अनुक्रमणिका

तीव्र टीका झाली, त्या वेळी जनमानसासमोर तिचा प्रमुख आशय स्पष्ट व प्रभावी रीतीने मांडण्यात आपण अयशस्वी ठरलो.

त्या नंतरही असा प्रयत्न कोणी केला नाही व या क्षेत्रांतील प्रमुख आंदोलने ही वेतनवाढ व कोणता बदल केला असता कोणाच्या नोकऱ्यांवर किती गदा येईल या दृष्टिकोनातूनच चालत राहिली. हे दोन्ही प्रश्न महत्त्वाचेच आहेत; परंतु मूलभूत ध्येय कायम ठेवूनही ते सोडविता येतात इकडे कोणाचेच लक्ष राहिले नाही.

(७) आर्थिक आघाडीवरील महाराष्ट्रातील अपेक्षाभंग हा अधिकच चिंताजनक आहे. या चिंतेची कारणे अशी :

(अ) महाराष्ट्र हे एकूण भारतात औद्योगिक दृष्टया प्रगत राज्य समजले जाते. मुंबई हे याचे प्रमुख, किंबहुना एकमेव कारण आहे. समृद्धीचे प्रवाह महाराष्ट्रात सर्वत्र पोहोचविण्याच्या दृष्टीने महाराष्ट्राच्या अविकसित भागांचा संतुलित विकास साध्य करण्याच्या प्रयत्नांत आपण अपुरे पडलो.

(ब) पूर्वीच्या पद्धतीचे भारतातील अग्रक्रमाचे स्थानही आपण गमावले. आपला आर्थिक विकासाचा वेग भारताच्या केवळ अन्य प्रगत राज्यांच्या तुलनेतच नव्हे तर सर्वसाधारण सरासरीपेक्षाही उणाच राहिला.

(क) जिल्हास्तरावरील विकेंद्रित नियोजनाच्या दृष्टीने महाराष्ट्र राज्याने प्रथम पावले उचलली असे समजते जाते. परंतु वस्तुतः त्या दिशेने झालेली प्रगती ही जवळपास शून्य आहे. नियोजन मंडळाने दिलेल्या एका प्रकल्पानुसार प्रस्तुत लेखक व त्याचे सहकारी डॉ. अ. वि. गाडगीळ यांनी केलेल्या पाहणीचा हाच निष्कर्ष आहे.

(८) समाजवादी समाजरचनेकडे वाटचाल करण्याच्या आपल्या उद्दिष्टाच्या संदर्भात तीन गोष्टी लक्षणीय आहेत :

(अ) रोजगार हमीयोजनेच्या प्रथम प्रवर्तनाचे भारतातील श्रेय महाराष्ट्राचे आहे. परंतु एकूण गरजू लोकांची संख्या व त्यांचे बेकारीचे दिवस लक्षात घेता या योजनेने मिळविलेले यश अद्याप फारच मर्यादित आहे.



(ब) मराठी अर्थशास्त्र परिषदेच्या १९८० मधील धुळे येथील अधिवेशनात आपल्या अध्यक्षीय भाषणात डॉ. वि. वि. बोरकर ( प्रमुख, अर्थशास्त्रविभाग, मराठवाडा विद्यापीठ ) यांनी पुढील विधान केले आहे. या विधानाचा अद्याप अभ्यासाच्या पातळीवर कोणी प्रतिवाद केलेला नाही. ते विधान असे :

'एका बाजूने शेतीक्षेत्रातील कुंठित अवस्था व दुसऱ्या बाजूने होणारा 'हरित क्रांतीचा' परिणाम लक्षात घेता, अलीकडील काही वर्षांत महाराष्ट्रातील आर्थिक विषमतेची दरी वाढली असण्याची शक्यता आहे. महाराष्ट्र राज्याच्या, मराठवाडा, विदर्भ व पश्चिम महाराष्ट्र या तीन विभागांतील आर्थिक विषमतेची दरीदेखील सातत्याने वाढत आहे. त्यामुळे महाराष्ट्र राज्य म्हणजे, वाढती विभागीय विषमता असणारे एक प्रातिनिधिक राज्य म्हणावे लागेल.'

(क) याच परिषदेच्या १९७८ मधील नागपूर येथील अधिवेशनात आपल्या अध्यक्षीय भाषणात प्रा. वि. म. दांडेकर यांनी केलेले विधानही समाजवादी समाजरचनेच्या विरोधी अशा एका प्रक्रियेकडे आपले लक्ष वेधते. भारतीय अर्थव्यवस्थेत संघटित व असंघटित अशी दोन क्षेत्रे असून गेल्या तीस वर्षांत या दोन क्षेत्रांबाबत दुटप्पी धोरण स्वीकारल्यामुळे अर्थव्यवस्थेत अंतर्गत वसाहतवाद निर्माण झाला अशा आशयाचे ते विधान आहे. या अंतर्गत वसाहतवादाला स्पष्टपणे विरोध केला पाहिजे अशी त्यांची भूमिका आहे या त्यांच्या विधानाविषयी व भूमिकेविषयी वाद होऊ शकतो; परंतु अशा वादाचा निर्णय कसाही लागला तरी सामाजिक न्यायाच्या दृष्टीने विचार करणाऱ्या लोकांनी प्रश्नाचे हे अंग दुर्लक्षून चालण्यासारखे नाही एवढी गोष्ट सर्वांनाच मान्य व्हावयास हरकत नसावी.

महाराष्ट्र शासन वा अन्य राजकीय पक्ष यांच्याशी संबंध नसलेल्या व आतापर्यंत निर्देश न आलेल्या या कालखंडातील तीन नव्या प्रवृत्तींचा निर्देश या ठिकाणी करणे मला उचित वाटते. संयुक्त महाराष्ट्रामुळेच या प्रवृत्ती अस्तित्वात आल्या असे म्हणणे योग्य होणार नाही; परंतु

अनुक्रमणिका

महाराष्ट्राच्या विशिष्ट प्रकृतिधर्माच्या पार्श्वभूमीवर या प्रवृत्तींना काही प्रमाणात तरी पोषक वातावरण मिळाले असे अवश्य म्हणता येईल. त्या अशा :

(१) सुस्मृत* हमीद दलवाई, व अ. भि. शहा यांच्या प्रयत्नाने चाललेली मुस्लिम प्रबोधनाची चळवळ. सत्यशोधक मुस्लिम समाजाच्या रूपात ती आजही कार्यकारी आहे.

(२) श्री. बाबा आढाव यांच्या नेतृत्वाखाली चाललेले विषमता निर्मूलन परिषदेचे कार्य. महाराष्ट्रात गेल्या दोन दशकांच्या काळात समाज परिवर्तनाच्या क्षेत्रात सामाजिक न्यायप्रस्थापनेची आग्रही भूमिका घेऊन राजकीय पक्षांच्या आहारी न जाता, निःस्वार्थ बुद्धीने, लोकशाही वृत्तीने व कणखरपणे काम करणारे तरुणांचे अनेक छोटे छोटे गट निर्माण झाले. हे गट हे महाराष्ट्राचे एक वैशिष्ट्य मानावे लागेल व अशा गटांच्या निर्मिति-प्रक्रियेत महाराष्ट्रातील 'महाराष्ट्रीय' विशेष-प्रवृत्तींचा प्रभाव आहे हेही मान्य करावे लागेल. गेली दोन तीन वर्षे या अशा गटांचा अभ्यास करण्याचा प्रयत्न केल्यानंतर प्रस्तुत लेखक हे विधान करीत आहे. या गटांचे एक मुक्त व्यासपीठ या दृष्टीने विषमतानिर्मूलन परिषदेच्या कार्याचे महत्त्व आहे.

(३) श्री. विलासराव साळुंखे यांच्या 'पाणी पंचायत' प्रयोगाचे असेच आगळे महत्त्व आहे. पाणी ही संपत्ती सर्वांच्या सारख्या मालकीची असावयास पाहिजे व गरीबांतल्या गरीब माणसाला तिचा लाभ मिळेल अशा पद्धतीने तिचा विनियोग झाला पाहिजे या दृष्टिकोनातून पाणी पंचायतच्या कार्याची रचना आहे. ( 'जैसा की आसमान का पानी, सूरज की रोशनी जिस पर हरएक का अधिकार होता है उसी तरह जमीन पर हरएक का अधिकार है ।' या विनोबाजींच्या ऐकलेल्या विवेचनाची या ठिकाणी आठवण होते. परंतु 'आसमान का पानी' वरही सर्वांचा आज समान अधिकार नाही ही गोष्ट त्यांच्याही तीक्ष्ण नजरेतून सुटली होती.)

या तीन प्रवृत्ती महाराष्ट्रात निर्माण झाल्या याचा महाराष्ट्राला अभिमान वाटेल अशा पद्धतीने भारतात त्याचे अनुकरण आज ना उद्या होईलच असा प्रस्तुत लेखकाला विश्वास आहे. निदान त्याची तशी आशा आहे. धर्मातीत लोकशाही समाजवादी भारताची रचना करावयाची तर हे आणि यांसारखे मार्ग चोखाळण्याखेरीज गत्यंतर नाही. आज या प्रवृत्तींच्या कार्यक्रमाविषयी महाराष्ट्रात काहीसे कौतुक, अल्पसे कुतूहल व बुष्कळशी उपेक्षा आढळते हाही महाराष्ट्राचा एक प्रकृतिधर्मच आहे.

संयुक्त महाराष्ट्राच्या उद्दिष्टांच्या दिशेने वाटचाल करण्याची जबाबदारी एकट्या महाराष्ट्र शासनाचीच आहे असे मानावयाचेही कारण नाही. त्यामुळे या वाटचालीत जी कमतरता राहिली तिचे उत्तरदायित्व महाराष्ट्र शासनावर आहे त्याचप्रमाणे इतर राजकीय पक्षांवर व विविध क्षेत्रांतील कार्यकर्त्यांवरही आहे. यांपैकी प्रत्येकाला या उद्दिष्टांत काही भर घालता आली असती. अग्रक्रमातही कमीअधिक फरक सुचविता आला असता. आपापल्या दिशेने व आपापल्या आग्रहाप्रमाणे कार्य करता आले असते. सुस्मृत महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार यांनी लिहिले आहे :

'माझ्या मते खरे म्हटले तर समितीला अखिल जनतेने जो हार्दिक पाठिंबा दिला तो वस्तुप्राप्ती-पुरताच मर्यादित होता; म्हणूनच अनेक मतांचे आणि रंगाचे, वयाचे आणि व्यवसायांचे लाखो लोक समितीच्या पाठीशी उभे राहिले. वस्तूला पुढे कोणते रूप द्यावे या विषयाच्या संबंधाने स्वाभाविकच या लाखो लोकांचे एकमत होते असे समजणे योग्य नाही. भावी महाराष्ट्राला कोणता आकार द्यावा याबद्दल ज्यांचे एकमत असेल त्यांनी आपापली संघटना करावी हेच बरे.' (लालजी पेंडसे : महाराष्ट्राचे महामन्थन, साहित्य सहकार संघ प्रकाशन, १९६५, प्रस्तावना. )

अशा संघटना अर्थातच प्रामुख्याने विविध राजकीय पक्षच होत. परंतु कोणताही राजकीय

* पैगंबरवासी, कैलासवासी असे शब्द या दोघांच्या बाबत वापरणे त्यांना अन्यायाचे होईल. 'सुस्मृत' हा यांसाठी एक प्रयत्न; परंतु त्याच शब्दाबद्दल आग्रह नाही.

अनुक्रमणिका

पक्ष या कालखंडात, कालखंडाच्या प्रारंभी होता त्यापेक्षा अधिक समर्थ झाला नाही, हे अखिल भारताचे चित्र होते; तसेच महाराष्ट्राचेही होते. याची कारणमीमांसा या ठिकाणी करावयाचे कारण नाही. महाराष्ट्रापुरतेच विशेष सांगावयाचे तर संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीनंतरच्या पहिल्या दशकात महाराष्ट्राच्या एकमुखी नेतृत्वाचा जो उदय व त्याचा दबदबा भारतीय स्तरावर भासमान झाला होता त्याचाही गेल्या दहा वर्षांत झपाट्याने अस्त झाला. त्यामुळे महाराष्ट्र भारताच्या राजकारणाला, अर्थकारणाला वळण देईल हे स्वप्न तर दूरच राहिले; परंतु प्रत्यक्ष महाराष्ट्रातदेखील आपण आपल्या अर्थकारणाला, राजकारणाला स्वतंत्रपणे वळण लावू शकतो हा आत्मविश्वास महाराष्ट्रातील अतिरथी-महारथी गमावून बसले. या सर्वांचा अपरिहार्य प्रतिकूल परिणाम उद्दिष्टांच्या दिशेने होणाऱ्या वाटचालीवर होणे अटळ होते.

परंतु इतिहासाचे चक्र अटळपणे फिरतच राहणार असते आणि आजची ही महाराष्ट्राची कुचंबलेली परिस्थिती निरंतर अशीच राहणार आहे अशी निराशावादाची भूमिका घेऊन हताश होण्याचे कारण नाही. महाराष्ट्राभिमान, प्रागतिक प्रवृत्ती व मूलतः निकोप भावनात्मक प्रकृती ही महाराष्ट्राच्या भावी अभ्युदयाच्या दृष्टीने महाराष्ट्राची बलस्थाने आहेत. प्रतिपदेचा चंद्र द्वितीया किंवा तृतीयेलाच पूर्ण होऊ शकत नाही व चंद्रही अभ्रपटलांनी मधून मधून अल्प किंवा दीर्घकाल झाकोळला जाऊ शकतो एवढे लक्षात ठेवले तर महाराष्ट्राच्या ब्रीदवाक्यातून आपल्याला सतत आश्वासन घेता येईल—

प्रतिपच्चन्द्ररेखेव वर्धिष्णुः विश्ववंदिता ।<br>
महाराष्ट्रस्य राज्यस्य मुद्रा भद्राय राजते ॥













अनुक्रमणिका

# महाराष्ट्रातील राजकीय पक्ष व प्रवृत्ती

पन्नालाल सुराणा

महाराष्ट्रातील राजकारण हा भारतीय राजकारणाचा एक भाग आहे. देशात असलेले प्रमुख पक्ष व प्रवृत्ती महाराष्ट्रात आहेत. शिवाय काही प्रादेशिक पक्ष व गट आहेत. इथले राजकीय प्रवाह नीट समजण्यासाठी ऐतिहासिक पार्श्वभूमी लक्षात घेतली पाहिजे.

नजीकच्या इतिहासाकडे नजर टाकली असता असे दिसते, की सतरा ते एकोणिसाव्या शतकांतील महत्त्वाच्या घटनांचा महाराष्ट्राच्या आजच्या राजकारणावर प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष प्रभाव आहे. छत्रपती शिवाजी महाराजांनी हिंदवी स्वराज्याची स्थापना केली होती. अहमदनगरची निजामशाही, बिजापूरची आदिलशाही, गोवळकोंड्याची कुतुबशाही आदी राजवटींना शिवाजीने निष्प्रभ केले होते. दिल्लीच्या मोगल साम्राज्यशाहीला इथे पाय रोवू दिले नव्हते. शिवाजीचे राज्य तसे (आजच्या) चार पाच जिल्ह्यांपुरते मर्यादित होते. त्याच्या मृत्यूनंतर मराठी राजवटीत विस्कळीतपणा आला होता. तरी मराठे सरदार दूरदूरच्या प्रांतांत जाऊन मर्दुमकी गाजवीत होते. उत्तर व पूर्वेकडल्या राजकारणात ते हस्तक्षेप करीत होते. त्यांचा दरारा बऱ्याच भागांत निर्माण झाला होता. शिवाजी महाराजांच्या पराक्रमाचा अभिमान हा महाराष्ट्राच्या अस्मितेचा अविभाज्य भाग बनला आहे.

छत्रपतींचा कारभार शाहू महाराजांच्या काळापासून पेशवे पाहत होते. खरी सत्ता त्यांच्याच हातांत होती. त्याचा फायदा घेऊन ब्राह्मणांनी सामाजिक उतरंडीतील आपल्या उच्च स्थानाला बळकटी आणली होती. शूद्रांना हीन लेखले जायचे. अस्पृश्य मानल्या गेलेल्या जातींवर तर अनेकविध लाजीरवाणी बंधने घालण्यात आली होती. ब्राह्मण सरदार व त्यांचे गणगोत शेतजमिनींवर कबजा करून होते. त्यांची सावकारीही बरीच असायची.

एकोणिसाव्या शतकात ब्रिटिशांनी भारतात आपली सत्ता कायम केली. गुजरात, बंगाल, मद्रास या भागांत त्यांना फारसा प्रतिकार झाला नाही. महाराष्ट्रात झाला. पण १८१८ मध्ये पेशव्यांचा किंवा मराठी सत्तेचा त्यांनी निर्णायक पराभव करून आपली पकड याही प्रदेशावर बसविली. त्यांच्या राजवटीविरुद्ध १८५७ साली व्यापक सशस्त्र उठाव झाला. त्यात उत्तरेकडे मुस्लिम नबाबांचा पुढाकार होता. महाराष्ट्र ही प्रत्यक्ष युद्धभूमी झाली नव्हती. पण झाशीची राणी, तात्या टोपे आदी उत्तरेकडील महाराष्ट्रीयन सेनानींनी त्या युद्धात शौर्य गाजवले होते. त्याबद्दलच महाराष्ट्रीयनांना अभिमान वाटतो.

१८५७ चा उठाव अयशस्वी झाला. ब्रिटिश राजवट स्थिरावली. त्याच्या आधीपासून रेल्वे, दळणवळणाची इतर आधुनिक साधने येथे उभारायला सुरुवात झाली होती. कापड-गिरण्यांच्या रूपाने आधुनिक कारखानदारीची मुहूर्तमेढ रोवली गेली. लॉर्ड मेकॉलेच्या शिफारशींनुसार आधुनिक शिक्षणप्रणाली सुरू करण्यात आली. छापखाने निघाले, त्या पाठोपाठ वृत्तपत्रे आली. ब्रिटिशांनी स्थायी स्वरूपाची प्रशासनयंत्रणा उभी केली. नवे व्यवसाय उदयाला आले. आधुनिक ज्ञानविज्ञान व पाश्चात्त्य संस्कृतीचा परिचय झालेला नवा सुशिक्षितांचा वर्ग निर्माण झाला. ब्रिटिश राज्य हे परकीयांचे आहे, ते उलथून टाकले पाहिजे असे वाटणारे काही साहसवादी तरुण दहशतवादी मार्गाचा अवलंब करत होते. पण ब्रिटिश सत्ता महाबलाढ्य आहे, तिच्या विरुद्ध असे साहसवादी उठाव करणे निरर्थक व आत्मघातकीपणाचे ठरणार आहे असे नवशिक्षित समाजधुरीणांना वाटत होते. त्याऐवजी नव्या, सुस्थिर राजवटीचा फायदा घेऊन आपला आर्थिक अभ्युदय साधावा, आपल्या समाजात परंपरेने








अनुक्रमणिका

चालत आलेल्या दुष्ट व हानीकारक रूढी नष्ट करून व्यक्तीला मुक्त, गतिमान जीवन जगण्याची संधी निर्माण करून द्यावी व त्यायोगे समाजाचे आंतरिक बळ वाढवावे असा त्यांचा दृष्टिकोन होता. ब्रिटिशांनाही येथे सुखाने राज्य करण्यासाठी स्थानिक लोकांचे व विशेषतः समाजावर प्रभुत्व असणारांचे सहकार्य पाहिजे होते. त्यांनी या नव-शिक्षित वर्गाला अनेक सवलती देऊ केल्या. राजकीय असंतोष वाढू नये म्हणून त्याला मर्यादित वाट करून द्यावी असेही त्यांचे धोरण होते. १८५७ च्या अनुभवामुळे मुसलमानांविषयी ते अधिक साशंक व सावध होते. ब्रिटिश. सरकारशी कुठल्याही प्रकारे सहकार्य करू नये अशी फर्माने मुल्ला-मौलवींनी काढली होती. आधुनिक शिक्षणाचा लाभ घेऊ पाहणारे मुसलमान अपवादात्मक होते. हिंदु समाजा-तील उच्च व मध्यमवर्गाला कुरवाळण्याचे ब्रिटि-शांचे धोरण होते. तर सैन्यात अस्पृश्य मानल्या गेलेल्या जातींना सामावून घेण्याचा त्यांचा प्रयत्न होता. ब्रिटिश राजवटीला विरोध न करता प्रशासनात वाढती भागीदारी, उद्योगधंद्यांना संरक्षण, साह्य व माफक राजकीय हक्क यांची मागणी नवशिक्षित वर्ग करू लागला. त्यासाठी वेगवेगळ्या संस्था निघाल्या. १८८५ साली मुंबईत इंडियन नॅशनल काँग्रेसची स्थापना झाली. काँग्रेस हे नवशिक्षित भारतीयांचे राजकीय व्यासपीठ बनले. केंद्रीय लेजि-स्लेटिव्ह कौंसिलवर काही भारतीयांच्या नेमणुका होऊ लागल्या. तसेच जिल्हा लोकल बोर्डे व नगरपालिका-महापालिका अस्तित्वात आल्या. या संसदीय संस्थांचा नवशिक्षित भारतीयांना व विशेषतः महाराष्ट्रीयनांना परिचय होऊ लागला.

याच कालखंडात महाराष्ट्रात आणखी एक चळवळ सुरू झाली. म. जोतीबा फुले यांनी सामा-जिक विषमता व भटशाहीवर हल्ले चढवायला सुरुवात केली. ब्रिटिशांचे राज्य परकीय आहे, म्हणून त्याविरुद्ध लढावे यात येथील कुणबी-शूद्रांना काय रस आहे, ही राजवट घालवली तर परत पेशवाई येईल आणि रयतेचा अधिक छळ सुरू होईल अशी त्यांची मांडणी होती. समाजाच्या आतापर्यंत उपेक्षित राहिलेल्या थरांत व स्त्रियांत शिक्षणप्रसार करावा, व्यापक लोकजागृती घडवावी असा त्यांचा प्रयत्न होता. शेतकऱ्यांची गाऱ्हाणी सरकारच्या कानावर घालण्याचे कार्यही फुल्यांनी केले; पण त्यासाठी उच्चवर्णीयांच्या पुढाकाराने चालू झालेल्या काँग्रेससारख्या संघटनांत ते गेले नाहीत. आपली चळवळ संघटित करण्यासाठी त्यांनी सत्यशोधक समाजाची स्थापना केली. फुल्यांच्या चळवळीमुळे मराठा व दलित जातींत हालचाल सुरू झाली. त्यांना धीर व दिलासा मिळाला. असे हे एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस महाराष्ट्राच्या राजकारणाचे चित्र होते.

ब्रिटिश राजवटीचे आर्थिक व राजकीय शोष-णाचे स्वरूप जसजसे प्रखर होऊ लागले तसा त्याला विरोधही वाढू लागला. लो. टिळकांच्या नेतृत्वा-मुळे काँग्रेसला जहाल वळण मिळाले. १९०६ साली बंगालची फाळणी करण्याच्या ब्रिटिशांच्या योजनेला विरोध करण्यासाठी टिळकांनी देशव्यापी चळवळ संघटित केली. काँग्रेस ही सर्व भारतीयांचे प्रतिनिधित्व करणारी संघटना बनावी असा तिच्या संस्थापकांचा व नेत्यांचा हेतू होता. तरी प्रत्यक्षात नवशिक्षित उच्चवर्णीयांच्या नेतृत्वाखालील संघटना असेच तिचे स्वरूप राहिले. या मर्मावर बोट ठेवून भारतीय समाजात फूट पाडावी या हेतूने ब्रिटिश राज्यकर्त्यांनी मुसलमानांना जवळ करायला सुरुवात केली. त्यांना लष्कर व पोलिसात वाढते स्थान देऊ केले. त्यामुळे दलितांचे मात्र नुकसान झाले. ब्रिटिशांच्या उत्तेजनाने आगा-खानननी १९०७ साली मुस्लिम लीगची स्थापना केली. त्याची प्रतिक्रिया म्हणून हिंदुमहासभेची स्थापना झाली. या घडामोडी दिल्लीत झाल्या असल्या तरी हळूहळू त्यांचे लोण महाराष्ट्रातही पोहोचले. १९०९ साली ब्रिटिश सरकारने कौंसिलां-साठी मुसलमानांना विभक्त मतदारसंघ दिले. सत्यशोधक चळवळीतील मराठा नेत्यांनी सामाजिक समतेपेक्षा ब्राह्मणेतरपणावर भर दिला होता, म्हणून ब्रिटिशांनी त्यांना हाताशी धरले. १९१९ च्या भारत सरकार कायद्यान्वये मुंबई इलाख्याच्या लेजिस्लेटिव्ह कौंसिलास मराठा जातीला पाच राखीव जागा दिल्या. ब्रिटिशांच्या या कूटनीतीवर मात करण्यासाठी टिळकांनी १९१६ साली लखनौ येथे मुस्लिम लीगशी करार करून मुसलमानांच्या

विभक्त मतदारसंघांना मान्यता दिली व मराठ्यांना जवळ करण्यासाठी शिवजयंती उत्सव सुरू केला.

टिळकांच्या निधनानंतर काँग्रेसमध्ये गांधीयुग सुरू झाले. म गांधींनी स्वातंत्र्यचळवळ शांततामय मार्गाने चालवली व तीत सामान्य माणसाला— शेतकरी, कामगार, महिला, दलित यांना ओढण्याचा प्रयत्न केला महात्माजींची दृष्टी चौफेर होती. भारतीयांतील स्वाभिमान व उपक्रमशीलता जागवण्यासाठी खादी-ग्रामोद्योगांना उत्तेजन, बुनियादी शिक्षणप्रणाली आदी विधायक उपक्रम त्यांनी सुरू केले. अस्पृश्यतानिवारण, दारुबंदी, हिंदु-मुस्लिम ऐक्य यांवर भर दिला. टिळकांचा वारसा चालवू पाहणारांना गांधींचा सत्याग्रह जसा मानवला नाही, तसा त्यांचा विधायक कार्यक्रमही रुचला नाही. त्याच सुमारास १९१९ च्या कायद्यानुसार थोड्या विस्तारित (पण पैसेवाल्यांपुरता मर्यादित असलेल्या) मताधिकाराच्या आधारे कौंसिलांच्या निवडणुका व्हायच्या होत्या. म. गांधींचा कौंसिलच्या निवडणुका लढविण्याला विरोध होता, तर टिळक-अनुयायांनी त्या लढवण्यासाठी टिळक स्वराज्य पक्षाची स्थापना केली. काँग्रेसमध्ये कौंसिलवर बहिष्कार टाकावा या आधीच्या निर्णयाचा फेरविचार करावा की करू नये यावर बराच काळ वाद चालत राहिला. कौंसिलप्रवेश व सनदशीर राजकारण यांवर टिळक– अनुयायांचा भर वाढत राहिला. म. गांधींच्या नेतृत्वाला महाराष्ट्रातील उच्चवर्णीयांचा फारसा पाठिंबा मिळाला नाही. फुल्यांच्या सत्यशोधक चळवळीतील अनेकजण मात्र काँग्रेसमध्ये सामील झाल्याने काँग्रेसला ग्रामीण भागात मजबूत आधार प्राप्त झाला.

या कालखंडात आणखी तीन प्रकारच्या प्रवृत्ती सुरू झाल्या. दहशतवादी राजकारणाचे मेरुमणी स्वातंत्र्यवीर सावरकर यांनी केलेल्या साहसाबद्दल तरुणांना आकर्षण वाटत राहिले. पण गुप्त संघटनाबांधणीला फारसा वाव मिळणे शक्य नव्हते. अखिल हिंदूंना संघटित करण्याची सावरकरांची दृष्टी होती. जातिनिर्मूलन हा त्याचाच एक भाग म्हणून ते पुरस्कारीत होते. या व इतर सामाजिक सुधारणांत त्यांच्या अनुयायांनी फारसा रस घेतला नाही. हिंदूंचे संघटन करण्याचा विचार मात्र काही जणांच्या मनांत बळावत होता. त्याची परिणती १९२५ साली राष्ट्रीय स्वयंसेवक संघाची नागपुरात स्थापना होण्यात झाली. भारतभूमीची सेवा करण्यासाठी निष्ठावान, चारित्र्यसंपन्न व शिस्तबद्ध स्वयंसेवक तयार करण्याचे त्या संघटनेचे सुरुवातीला उद्दिष्ट होते. निमलष्करी शिक्षण देण्यावर त्यांचा भर होता. पुढे हिंदुराष्ट्रनिर्मिती हे त्या संघटनेने आपले उद्दिष्ट घोषित केले. मुस्लिम व ख्रिश्चन धर्मीयांचा द्वेष करणे, एवढेच नव्हे तर वेदविद्येवर व अन्य धर्मग्रंथांवर आधारलेला पुनरुज्जीवनवाद जोपासणे, असे त्या संघटनेला स्वरूप आले. संघाचा गांधींच्या नेतृत्वाला विरोध होता. स्वातंत्र्यचळवळीच्या प्रत्यक्ष कार्यक्रमात तो भाग घेत नव्हता. संघटनेचे बळ पुरेसे वाढल्याशिवाय प्रत्यक्ष कृती करायची नाही असे त्यांचे धोरण होते. म्हणून 'संघटनेसाठी संघटना' हा त्यांचा घोषमंत्र बनला. गांधीजींनी याच काळात वर्ध्याजवळ सेवाग्रामला आपला आश्रम चालू केला. काही व्यापारी व उद्योगपती त्यांना मदत करीत असले, तरी ग्रामीण भागातील शेतकरीवर्गाचा त्यांना भरघोस पाठिंबा मिळत राहिला. संघाची स्थापना नागपुरात झाली व त्याचे प्रमुख केंद्र तेथे असले तरी विदर्भात संघाला किंवा हिंदुत्ववादी विचारसरणीला जनमानसात स्थान मिळाले नाही. काँग्रेसची पाळेमुळे विदर्भाच्या खेड्यापाड्यांत पक्की रुजलेली दिसतात.

१९१७ साली रशियात झालेल्या क्रांतीचे पडसाद भारतातही उमटले. मार्क्सवादापासून प्रेरणा घेऊन डांगे आदी तरुणांनी १९२५ साली कम्युनिस्ट पक्षाची स्थापना केली. मुंबई, नागपूर, सोलापूर आदी ठिकाणी कापडगिरण्या व इतर उद्योग वाढत होते. कामगारवर्गाच्या वाढत्या संख्येला संघटित करण्याचे काम कम्युनिस्ट मंडळी करू लागली. त्यांच्यापैकी काहीजण काँग्रेसच्या चळवळीतही भाग घेत. पण गांधी हे भांडवलदारांचे हस्तक आहेत अशी त्यांची भूमिका होती. राष्ट्रीय स्वातंत्र्याची चळवळ ही राष्ट्रीय भांडवलदारांच्या हिताची असल्याने कामगारवर्गाने त्यात भाग घेऊ नये असे ते मानत असत. मार्क्सवादाविषयी आकर्षण असलेल्या युसूफ मेहेरअल्ली, अच्युत पटवर्धन, एस. एम. जोशी,







अनुक्रमणिका

ना. ग. गोरे आदी तरुणांना कम्युनिस्टांची राष्ट्रीय स्वातंत्र्य चळवळीबाबतची भूमिका मान्य नव्हती. म्हणून त्यांनी १९३४ साली काँग्रेस समाजवादी पक्षाची स्थापना केली. कामगारांच्या व काही भागात शेतकऱ्यांच्या संघटनाही ते बांधू लागले. अस्पृश्यतानिवारण वगैरे सामाजिक सुधारणांच्या कार्यक्रमांतही त्यांना रस होता. सोशालिस्टांच्या कार्यामुळे कामगारवर्ग काँग्रेसच्या बाजूला राहण्यास मदत झाली.

तिसरा प्रवाह सुरू झाला दलित चळवळीचा. म. फुल्यांच्या सामाजिक समताविषयक विचारांचा वारसा घेऊन डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी आपल्या कार्याला सुरुवात केली. शिक्षणप्रसार, अन्य सामाजिक सुधारणा यांचा वारसा त्यांनी चालू ठेवला. सामाजिक विषमतेचे मूळ वैदिक धर्माच्या शिकवणुकीतच आहे अशी मूलगामी मांडणी करून त्यांनी केवळ पुरोहितवर्गावरच नव्हे तर वैदिक धर्माच्या मूळ भूमिकेवरच कठोर प्रहार केले. चवदार तळ्यासारखे लढे उभारले. खेड्यापाड्यांतील दलितांची आर्थिक बंदिस्ती नष्ट करण्यासाठी महार-वतन नष्ट करणारे बिल मांडणे आदी उपक्रम सुरू केले आणि राजकीय सत्तेत दलितांना वाटा मिळाला पाहिजे असा आग्रह धरला. ब्रिटिशांनी आपल्या 'फोडा व झोडा' नीतिनुसार काँग्रेसला शह देण्यासाठी दलितांना काही सवलती दिल्या. सरकारी नोकऱ्यांत दलितांसाठी राखीव जागा ठेवण्याची सुरुवात तेव्हापासून झाली. १९३२ साली तर ब्रिटिशांनी दलितांना विभक्त मतदारसंघही जाहीर केले. विभक्त मतदारसंघांची मागणी आंबेडकरांनी केली नव्हती. पण ब्रिटिशांनी तशी घोषणा केल्याने ते मिळावेत यासाठी त्यांनी आग्रह धरला. दलितांनाही विभक्त मतदारसंघ दिले गेले तर भारतीय समाजातील फाटाफूट वाढेल व ग्रामीण भागातील दलितांचे अधिकच हाल होतील असे वाटल्यावरून त्या योजनेला गांधींनी विरोध केला व येरवडा तुरुंगातच बेमुदत उपोषण सुरू केले. देशातील जनमानस पाहून आंबेडकरांनी अखेरीस तडजोड केली. दलितांसाठी विभक्त मतदारसंघाचा मुद्दा त्यांनी सोडून दिला व त्यांच्यासाठी अधिक प्रमाणात राखीव जागा ठेवाव्यात असे काँग्रेसने व अन्य उच्चवर्णीय पुढाऱ्यांनी मान्य केले.

आंबेडकरांची वैदिक धर्मविषयक मते सत्यशोधक चळवळीतील मराठा मंडळींना मानवली नाहीत. सामाजिक उतरंडीतील प्रतिष्ठेचे परंपरेने मिळालेले स्थान त्यांना पाहिजे होते. तसेच दलितांवरील गावकीचे जोखड फेकून देण्याच्या आंबेडकरांच्या भूमिकेमुळे सधन मराठावर्गाच्या हितसंबंधांनाच बाध येणारा होता. त्यामुळे आंबेडकरांना मुख्यतः दलितांतूनच अनुयायी मिळाले. काही सुशिक्षित पुरोगामी विचारांचे उच्चवर्णीय तरुण त्यांच्या कामात सहभागी होत होते. १९२४ साली आंबेडकरांनी स्वतंत्र मजूर पक्ष स्थापन केला. त्यांची पुढे कौंसिलवरही नेमणूक झाली होती. वास्तविक मुंबईच्या कामगारवर्गात दलितांची संख्या मोठी होती. कामगारांत कम्युनिस्टांच्या व समाजवाद्यांच्या संघटना होत्या. कम्युनिझम-विजयी आंबेडकरांचे मन पहिल्यापासून साशंक होते. काही समाजवादी आंबेडकरांच्या पर्वती-सत्याग्रहासारख्या कार्यक्रमांत सहभागी होत होते. पण आंबेडकर काँग्रेसच्या विरोधी व ब्रिटिशांशी वेळप्रसंगी सहकार्य करणारे असल्याने समाजवाद्यांचे व त्यांचेही सहकार्य होऊ शकले नाही. स्वतंत्र मजूर पक्षाला फारसा पाठिंबा न मिळाल्याने व दलितांतील जागृती वाढून त्यांचा राजकारणातील रस व सहभाग वाढू शकेल असे दिसल्याने आंबेडकरांनी पुढे शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन पक्षाची स्थापना केली. या पक्षाला महाराष्ट्रातील बहुसंख्य असलेल्या महार जातीचा पूर्ण पाठिंबा असायचा. दलितांतील चांभार, मातंग आदी जाती मात्र काँग्रेसच्या पाठीमागे असायच्या.

१९३५ च्या भारत सरकार कायद्याने मताधिकाराची कक्षा वाढवण्यात आली, तरी आयकर किंवा विशिष्ट पातळीवरील शेतसारा वा घरभाडे भरणारांपुरताच तो मर्यादित होता. कामगारवर्गासाठी एक जागा प्रांतिक कौंसिलवर राखीव ठेवण्यात आली. या आधारावर १९३७ साली झालेल्या निवडणुकीत काँग्रेसला भरघोस यश मिळाले व त्या पक्षाचे मंत्रिमंडळ बनले. हिंदुसभेला एकदोन जागा मिळाल्या, मुस्लिम मतदारसंघात

मुस्लिम लीगचे उमेदवार निवडून आले. दलितांच्या राखीव जागांवर एकदोन जागा शेडचूल्ड कास्ट्स् फेडरेशनला मिळाल्या व बाकीच्या ठिकाणी काँग्रेसचेच उमेदवार निवडून आले. मध्य प्रदेशात असलेल्या विदर्भातही काँग्रेसला प्रचंड यश मिळाले.

मराठवाडा त्या वेळी निजामाचे राज्य असलेल्या हैद्राबाद संस्थानात होते. तेथे राजेशाही व्यवस्था होती. नागरिकांना प्रतिनिधी पाठवण्याचा अधिकार नव्हता. तेथील राजा मुस्लिमधर्मीय व बहुसंख्य प्रजा हिंदुधर्मीय होती आर्य समाजाच्या चळवळीला उच्चवर्णीयांचा व व्यापाऱ्यांचा पाठिंबा असायचा. तेथील राजेशाही विसर्जित व्हावी यासाठी हैद्राबाद स्टेट काँग्रेसच्या नेतृत्वाखाली चळवळ चालू होती. निजामाच्या दडपशाही धोरणामुळे तेथे गुप्त रीतीने संघटनाबांधणीचे काम चालू असायचे. सशस्त्र मार्गाचा अवलंब केला जात असला तरी नेतृत्वावर गांधींच्या इतर विचारांचा प्रभाव होता. त्या नेत्यांपैकी काहीजण मार्क्सवादी विचारांचेही भोक्ते होते.

१९३९ साली दुसरे महायुद्ध सुरू झाले. त्यात ब्रिटिशांच्या बाजूने भारत सामील झाल्याची घोषणा ब्रिटिश सत्ताधाऱ्यांनी लोकप्रतिनिधींना विश्वासात न घेता केली. त्याच्या निषेधार्थ काँग्रेस मंत्रिमंडळाने राजीनामा दिला. जर्मनी व इटाली हे फॅसिस्ट देश असून सारे जग जिंकण्याच्या हिटलरच्या राक्षसी महत्त्वाकांक्षेला प्राणपणाने विरोध केला पाहिजे व त्यासाठी ब्रिटिशांच्या युद्धप्रयत्नांना मदत केली पाहिजे असे नेहरूप्रभृती काँग्रेसनेत्यांना वाटत होते. तर ब्रिटिशांनी भारताला स्वातंत्र्य देण्याचे वचन दिल्याशिवाय त्यांच्या युद्धप्रयत्नांना साह्य करू नये असा दुसरा विचारप्रवाह होता. गांधीजीही त्याच मताचे होते. कम्युनिस्टांनी हे भांडवलशाहीचे साम्राज्यशाही युद्ध आहे असे म्हणून सुरुवातीस विरोध केला. ब्रिटिशांनी भारताला स्वातंत्र्य देण्याचे वचन द्यायला नकार दिल्याने काँग्रेसच्या नेतृत्वाखाली वैयक्तिक सत्याग्रहाची चळवळ सुरू झाली. तिला महाराष्ट्रात चांगला प्रतिसाद मिळाला. ८ ऑगस्ट १९४२ रोजी काँग्रेसने 'छोडो भारत'चा नारा दिला. ब्रिटिशांनी सर्व प्रमुख पुढाऱ्यांना अटक करून दडपशाही सुरू केली. त्याविरुद्ध देशव्यापी भूमिगत चळवळ चालवण्यात समाजवाद्यांनी महत्त्वपूर्ण कामगिरी बजावली. अच्युत पटवर्धन, एस. एम. जोशी आदी नेते त्या चळवळीचे संचलन करीत होते. जर्मनीने रशियावर हल्ला केला व रशियाला ब्रिटनची मदत घ्यावी लागली. त्यामुळे इथल्या कम्युनिस्टांनी हे 'लोकयुद्ध' आहे असे म्हणून युद्धप्रयत्नांना सहकार्य करण्याची भूमिका घेतली. डॉ बाबासाहेब आंबेडकरांनी व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळातील स्थान स्वीकारले. संघाचे काही कार्यकर्ते व्यक्तिशः राष्ट्रीय स्वातंत्र्यचळवळीत सहभागी झाले होते. पण संघटना म्हणून रा. स्व संघ त्या चळवळीपासून अलिप्त राहिला. मुस्लिम लीगही तटस्थ राहिली. महाराष्ट्रात सातारा, सांगली भागांत प्रतिसरकारची चळवळ काही काळ प्रभावशाली होती. आताच्या रायगड जिल्ह्यातील जंजिरा संस्थानावरही काँग्रेसच्या लोकांनी कबजा करून प्रतिसरकार चालवले होते.

१९४५ साली युद्धसमाप्ती झाली. काँग्रेसनेत्यांची सुटका झाली. त्यांचे व भूमिगत चळवळीच्या नेत्यांचे जनतेने उत्स्फूर्त स्वागत केले. ब्रिटिशांनी सत्तांतराची बोलणी सुरू केली व दरम्यान केंद्रीय व प्रांतिक कौंसिलांच्या निवडणुका घेतल्या. स्वातंत्र्यप्राप्तीसाठी आणखी एक प्रखर लढाच द्यावा लागणार आहे म्हणून काँग्रेसने वाटाघाटीच्या घोळात पडू नये असे समाजवाद्यांचे मत होते. ते काँग्रेस नेत्यांनी मान्य न केल्याने समाजवादी निवडणुकांपासून दूर राहिले. निवडणुकांत काँग्रेसला प्रचंड जय मिळाला. केंद्रात पं. जवाहरलाल नेहरूंच्या नेतृत्वाखाली हंगामी सरकार बनले व मुंबई इलाख्यातही काँग्रेसचे मंत्रिमंडळ बनले. हिंदुमहासभा निष्प्रभ बनली होती. विभक्त मतदारसंघामुळे मुस्लिम लीगला चांगल्या जागा मिळाल्या. दलितांच्या राखीव जागांवर शे. का. फे. ला फारसे यश न मिळता काँग्रेसचेच उमेदवार निवडून आले.

सत्तांतराच्या वाटाघाटीत ब्रिटिशांनी उत्तेजन दिल्यामुळे मुस्लिम लीगचे नेते बॅ. जीनांनी देशाची फाळणी करण्याचा आग्रह धरला व त्यासाठी देशभर हिंदु-मुस्लिम दंगे घडवून आणले. अखेरीस काँग्रेसनेतृत्वाने फाळणीला संमती दिली. मुस्लिम लीगचे प्रमुख नेते पाकिस्तानात निघून गेले. तो

पक्ष एकदम प्रभावहीन झाला. हिंदूंच्या मनात राग होता; पण हिंदुत्ववाद्यांच्या संघटनांनी फाळणीला विरोध करण्यासाठी चळवळ मात्र उभारली नाही फाळणी झाली तरी सीमाभागांत दंगे व कत्तली होत राहिल्या. गांधीजी शांतता प्रस्थापनासाठी व हिंदु–मुस्लिम सलोख्यासाठी नौआखली, कलकत्ता व दिल्लीत प्रयत्न करीत होते. स्वतःला हिंदुत्ववादी म्हणविणाऱ्या नथुराम गोडसेंनी दिल्लीत जाऊन गांधीजींचा खून केला. त्यामुळे महाराष्ट्रातील बहुजनसमाजाचा ब्राह्मणांवरील राग उफाळून आला व अनेक ठिकाणी त्यांच्या घरांवर हल्ले झाले, त्यांना आगी लावण्यात आल्या. ब्राह्मण -ब्राह्मणेतर दरी अशा प्रकारे कायमच राहिली.

रा. स्व. संघ ही निमलष्करी संघटना असल्याने व तिचे धोरण सांप्रदायिक, अन्यधर्मीयविरोधी असल्याने राष्ट्रीय ऐक्याला व स्थैर्याला ही संघटना धोकादायक ठरेल असे गांधी–खुनानंतर भारत सरकारला वाटले. नथुराम गोडसे एके काळी संघात होता व त्याच्या इतर साक्षीदारांचाही संघाशी संबंध होता. म्हणून भारत सरकारने रा. स्व. संघावर बंदी घातली. त्याच्या प्रतिकारार्थ संघाने देशव्यापी सत्याग्रह केला. महाराष्ट्रातही संघाचे हजारो स्वयं-सेवक तुरुंगात गेले. अखेरीस संघाने स्वतःची घटना बनवून सरकारला सादर केल्यावर व तीत सरकारने सुचविलेल्या दुरुस्त्या केल्यावर बंदी उठविण्यात आली. या अनुभवामुळे संघाला असे वाटू लागले, की आपली राजकीय आघाडी असली पाहिजे. डॉ. शामाप्रसाद मुखर्जी यांच्या अध्यक्षतेखाली भारतीय जनसंघाची स्थापना केली. महाराष्ट्रातही त्या पक्षाचे कार्य सुरू झाले.

१९४७ साली भारत स्वतंत्र झाला तरी अनेक संस्थाने भारतीय संघराज्यात विलीन झाली नव्हती. हैद्राबाद हे त्यांपैकी प्रमुख संस्थान होय. हैद्राबाद मुक्तिसंग्रामाला वेग आला. भारतीय हद्दीत स्टेट काँग्रेसची काही केंद्रे असली तरी त्यांचे मुख्य कार्य संस्थानी प्रदेशातच चालायचे. निजामाने दमनचक्र जोरात सुरू केले होते. रझाकार या बिनसरकारी संघटनेमार्फत स्टेट काँग्रेस कार्यकर्त्यांवर हल्ले होत. यामुळे हिंदु-मुस्लिमांतील कटुता व तणाव वाढत असला तरी स्टेट काँग्रेसच्या लढ्याला धर्मनिरपेक्ष, सर्वसमावेशक असेच स्वरूप राहिले होते. भारत सरकारने १९४८ साली पोलीसकारवाई करून ते संस्थान संघराज्यात सामील करून घेतले. स्टेट काँग्रेसचे भारतीय काँग्रेस पक्षात विलीनीकरण झाले. तेथे त्या पक्षाचे मंत्रिमंडळ बनले. मराठ-वाड्यात पुरोगामी विचाराचे काही कार्यकर्ते काँग्रेसमधून बाहेर पडले व त्यांनी पीपल्स डेमोक्रॅटिक फ्रंट ही संघटना स्थापन केली. मराठवाड्यातील अनेक नामवंत कार्यकर्ते या आघाडीत सामील झाले.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर बनविण्यात आलेल्या राज्य-घटनेचा अंमल २६ जानेवारी १९५० रोजी सुरू झाला. भारत हे स्वतंत्र, सार्वभौम, लोकशाही-वादी प्रजासत्ताक आहे अशी घोषणा घटनेद्वारा करण्यात आली. एकवीस वर्षांवरील प्रत्येक प्रौढ स्त्री-पुरुषाला मतदानाचा हक्क देण्यात आला. जुन्या राजेशाही संस्थानी परंपरा, जन्मावर आधा-रलेली सामाजिक विषमता व ब्रिटिश अमदानीत सुरू झालेली केवळ धनवंतांना मताधिकार देण्याची प्रथा या सर्वांना छेद देऊन प्रौढ मताधिकाराचे धाडसी पाऊल उचलून घटनाकारांनी लोकशाही राजकारणाची थोर सेवा बजावली. धर्मावर आधार-लेले विभक्त मतदारसंघ नष्ट करण्यात आले. अस्पृश्यता घटनेने व कायद्याने नष्ट करण्यात आली. पण त्याचबरोबर सामाजिक व शैक्षणिक दृष्ट्या मागास असलेल्या जातिजमातींना विशेष सवलती देण्याचे व अनुसूचित जाती (म्हणजे दलित) व अनुसूचित जमाती (म्हणजे आदिवासी) यांच्या-साठी लोकसभा व विधानसभेत राखीव जागा ठेवण्यात आल्या. भारत हे संघराज्य आहे अशी घोषणा व त्यानुसार केंद्र व राज्य सरकारांच्या अधिकारांविषयी तरतुदी करण्यात आल्या. केंद्र व राज्य दोन्ही ठिकाणी संसदीय स्वरूपाची पद्धत स्वीकारण्यात आली.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर काँग्रेसला एका पक्षाचे स्वरूप देण्यात आले. पक्षांतर्गत उपपक्ष चालवायला मनाई करण्यात आली. पूर्वीही प्रस्थापित हितसंबंधीयांना जपणारा गट काँग्रेसमध्ये होताच. म. गांधी स्वतः मनाने गरिबांच्या बाजूचे असल्याने ते कष्टकऱ्यांची बाजू घेणाऱ्या परिवर्तनवादी विचाराच्या कार्य-



अनुक्रमणिका

कार्यकर्त्यांना सांभाळून घेत व आधार देत असत. त्यांच्यानंतर सर्वांना एकत्र ठेवणारा दुवा नष्ट झाला. सत्ताप्राप्तीमुळे काँग्रेसवर प्रस्थापित हितसंबंधीयांची पकड वाढू लागली. म्हणून काँग्रेस समाजवादी पक्ष काँग्रेसच्या बाहेर पडला व 'समाजवादी पक्ष' या नावाने त्यांनी स्वतंत्रपणे आपले कार्य चालू केले. रा. स्व. संघाच्या हिंदुसांप्रदायिक व पुनरुज्जीवनवादी भूमिकेला विरोध करण्यासाठी व तरुण पिढीच्या मनावर जातिधर्मनिरपेक्ष राष्ट्रवादाचे संस्कार करण्याच्या हेतूने महाराष्ट्रातील समाजवादी कार्यकर्त्यांनी राष्ट्रसेवा दल या संघटनेची स्थापना १९३९ साली केली होती. त्यापूर्वीही काँग्रेस सेवा दलाची स्थापना झाली होती. पण कुणी स्वतःला त्या कामात गाडून न घेतल्याने त्या संघटनेला फारसे रूप आले नव्हते. महाराष्ट्रात सानेगुरुजी, शिरूभाई लिमये, एस. एम. जोशी, भाऊसाहेब रानडे आदींनी पुरेसे लक्ष घातल्यामुळे सेवा दलाला बाळसे आले होते. त्यांतल्या काही कार्यकर्त्यांनी १९४२ च्या स्वातंत्र्यलढ्यातही भाग घेतला होता. त्यामुळे १९४५ नंतर त्या संघटनेला प्रचंड प्रतिसाद मिळू लागला होता. काँग्रेसमधील काही नेत्यांना ही संघटना वाढत असल्याबद्दल वैषम्य वाटू लागले होते. गांधी–खुनानंतर संघावर बंदी घालताना भारत सरकारने सर्वच निमलष्करी संघटनांवर बंदी घालण्याची सूचना राज्य सरकारांना केली. मुंबई सरकारने राष्ट्रसेवा दलावरही बंदी घातली. पण समाजवादी नेत्यांनी सरकारशी वाटाघाटी केल्यावर ती बंदी उठवण्यात आली. तरी काँग्रेस नेतृत्वाशी तणाव वाढला होता, म्हणून ही संघटनाही काँग्रेसच्या बाहेर पडली. समाजवादी पक्षाला तिने आपली राजकीय आघाडी मानले होते.

याच काळात महाराष्ट्रात काँग्रेसमधून आणखी एक गट बाहेर पडला. त्याने मार्क्सवादी विचारसरणी स्वीकारली. त्यात बहुजनसमाजातील तरुणांचा भरणा होता. महाराष्ट्रातील कम्युनिस्ट व सोशलिस्ट पक्षांचे नेतृत्व शहरी मध्यमवर्गीयांकडे असल्याने ह्या गटाने त्यांपैकी कुठल्याही पक्षात न जाता शेतकरी कामगार पक्ष स्थापन केला.

कम्युनिस्ट पक्षाला महायुद्धविषयक भूमिकेमुळे अडचणीतून जावे लागले असले तरी त्यांनी स्वतःला सावरून घेतले. हैद्राबाद संस्थानच्या तेलंगाणा भागात तर जमीनदारवर्गाच्या अत्याचारांविरुद्ध त्यांनी सशस्त्र उठाव केला. भारताला स्वातंत्र्य मिळाले हे खरे नाही, नेहरू हे अमेरिकन भांडवलदार–साम्राज्यवाद्यांचे हस्तक आहेत असे ते म्हणत. त्यामुळे तेलंगाणातील उठाव हा केवळ स्थानिक प्रश्नांपुरता सीमित नसून भारतातील प्रस्थापित सरकारविरुद्ध आहे असे कम्युनिस्ट पक्षाचे सरचिटणीस कॉ. बी. टी. रणदिवे यांनी घोषित केले. त्या उठावाला सुरुवातीला जरा प्रतिसाद मिळाला असला, तरी भारत सरकारने त्याविरुद्ध कठोर कारवाई सुरू केल्यावर शेतमजूर–कुळे व शेतकरी यांची दुहेरी ससेहोलपट सुरू झाली. भारत सरकार भांडवलदारांचे हस्तक आहे ही भूमिका त्यांना आवडली होती असे नाही. त्यामुळे तिथला पाठिंबा ओसरत गेला. कम्युनिस्ट पक्षाने सशस्त्र उठावाची इतरत्र तशी तयारी केली नव्हती. आणि भारतीय जनतेला आपण ब्रिटिशांच्या गुलामगिरीतून मुक्त झालो याचा आनंद झाला होता. गांधी–नेहरू आदींच्या देशभक्तीबद्दल त्यांच्या मनांत तिळमात्र शंका नव्हती. त्यामुळे तेलंगाणा–उठावाला शेजारच्या महाराष्ट्रातसुद्धा पाठिंबा मिळाला नाही. कम्युनिस्टांविषयी सर्वसामान्य जनतेत विशेषतः मध्यम वर्गात साशंकता मात्र वाढली. तरी देशातील व महाराष्ट्रातील कम्युनिस्ट चिवटपणे कामगारसंघटना बांधत राहिले. याच सुमारास गोदुताई व शामराव परुळेकरांनी ठाणे जिल्ह्यातील आदिवासींना संघटित करायला सुरुवात केली.

तेलंगाणा चळवळीचा परिणाम म्हणून १९५१ साली भूदान यज्ञ आंदोलन सुरू झाले. गांधीजींच्या काळात व्यापक राष्ट्रीय स्वातंत्र्य व पुनर्निर्माण आंदोलनाचा एक भाग म्हणून खादी, ग्रामोद्योग, नई तालीम, हरिजन सेवकसंघ आदी कामे चालत असत. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर संदर्भ बदलला होता. त्यातच गांधीजींच्या निधनामुळे या कार्यक्रमांना व संस्थांना नवी दिशा द्यायला कोणी वाली राहिला नाही. काँग्रेस पक्ष सत्ताधारी बनल्याने या सर्वोदय कार्यकर्त्यांचा सत्ताधाऱ्यांबाबत सहानुभूतीचा दृष्टि-







अनुक्रमणिका

कोन असायचा. जनतेच्या चळवळीपासून ते दुरावत चालले होते. शेतजमिनीच्या प्रश्नावरून कम्युनिस्टांनी सशस्त्र चळवळ उभारली. हे गांधीविचाराला एक प्रकारचे आव्हान होते. गांधीजींचे आध्यात्मिक वारस मानले गेलेले आचार्य विनोबा भावे यांनी खूप विचार करून तेलंगाणात जाण्याचे ठरवले. पोचमपल्ली या गावी भूमिहीनांचा प्रश्न त्यांनी मांडला व भूमिहीनाला आपला भाऊ समजून त्याला आपल्यातली थोडी जमीन भूमिवानांनी द्यावी, असे आवाहन त्यांनी केले. एका शेतकऱ्याने लगेच काही एकर जमिनीचे दान विनोबांना दिल्याचे घोषित केले. हा प्रतिसाद मिळालेला पाहून आचार्य विनोबांनी पदयात्रा सुरू केली. देशापुढील जमीनफेरवाटपाचा व एकंदरीनेच असलेला आर्थिक विषमतेचा प्रश्न अहिंसक मार्गाने सोडवता येईल असा विश्वास बाळगून त्यांनी भूदान मागायला सुरुवात केली. भूमिहीनाला आपला सहावा भाऊ समजून आपल्या शेतजमिनीचा एकषष्ठांश भाग त्याच्या पुनर्वसनासाठी दान म्हणून द्यावे अशी सूचना ते मांडत राहीले. सुरुवातीच्या काळात बरीच जमीन भूदानात मिळू लागली. विनोबांनी या कार्यक्रमासाठी देशभर पदयात्रा काढली. अनेक सर्वोदय कार्यकर्ते या कार्यक्रमात सहभागी झाले. पुढे भूदानातून ग्रामदान, संपत्तीदान असे कार्यक्रम निघत गेले. जयप्रकाश नारायणही त्या कार्यक्रमांत सहभागी झाले. महाराष्ट्रात अण्णासाहेब सहस्रबुद्धे आदी सर्वोदय कार्यकर्ते व एस. एम. जोशी आदी समाजवादी कार्यकर्ते यांनी मधूनमधून पदयात्रा काढल्या. ही म्हटले तर राजकीय चळवळच होती. पण जमिनीच्या मागणीसाठी भूमिहीनांना संघटित करण्याचा कार्यक्रम विनोबांनी घ्यायचे नाकारले. वर्गविग्रह नको, सर्वांचा समन्वय हवा अशी त्यांची भूमिका होती. त्यामुळे ही चळवळ विशेष प्रभाव पाडू शकली नाही. तरी आता अशा प्रश्नावर विचार करावा लागणार व हालचाल करावी लागणार याचे भान काही सर्वोदय कार्यकर्त्यांना झाले.

प्रौढ मताधिकारावर आधारलेल्या पहिल्या सार्वत्रिक निवडणुका १९५२ साली झाल्या. त्यांत काँग्रेस पक्षाला भरघोस यश मिळाले. जे देशभर तेच महाराष्ट्रातही झाले. समाजवादी, कम्युनिस्ट, शे. का. पक्ष आदी सर्वच बिगर-काँग्रेसपक्षांना फार मोठ्या जागा मिळाल्या. समाजवादी पक्षाच्या अपेक्षा फार होत्या. पर्यायी पक्ष बनण्याचे त्यांचे स्वप्न होते. त्यांचा अपेक्षाभंग फार मोठा होता. अनेक कार्यकर्ते निराश व निष्क्रीय बनले. शे. का. पक्षातही फाटाफूट झाली. त्यांचे काही पुढारी काँग्रेसमध्ये गेले तर काहीजणांनी कामगार किसान पक्ष काढला. त्यातून पुढे लाल निशाण गट बाहेर पडला. मुस्लिम लीग, हिंदुमहासभा, जनसंघ, शेडयूल्ड कास्ट्स् फेडरेशन आदी पक्षांना एकेकसुद्धा जागा मिळाली नाही. त्या वेळी मध्य प्रदेशात असलेल्या विदर्भात व हैद्राबाद राज्यातील मराठवाड्यातही असेच चित्र उमटले.

पं. जवाहरलाल नेहरूंनी आपल्या हंगामी मंत्रिमंडळात डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना घेतले होते. राज्यघटनेचा मसुदा बनविण्याचे महत्त्वपूर्ण कामही त्यांच्याकडे सोपविण्यात आले होते तरी ते काँग्रेस मध्ये सामील झाले नव्हते. शेडयुल्ड कास्ट्स् फेडरेशन हा आपला पक्ष त्यांनी चालू ठेवला होता. हिंदु व्यक्तिगत कायदा हा जो परंपरेने मनुस्मृती व याज्ञवल्क्यस्मृतीवर आधारलेला होता, तो बदलावा व न्याय आणि समतेच्या आधारावर नवे हिंदु कोड करावे असा बाबासाहेबांचा आग्रह होता. नेहरू व्यक्तिशः या सूचनेला अनुकूल असले, तरी काँग्रेस पक्षात सनातनी मंडळींचा प्रभाव बराच असल्याने ते सरकार म्हणून ती सूचना स्वीकारू शकले नाहीत. त्यामुळे आंबेडकरांनी मंत्रिपदाचा राजीनामा दिला. बाहेरचे सामाजिक वातावरण दलितांना अडचणीचेच राहिले आहे व हिंदुधर्माभिमानी लोक त्यांना समानतेने वागवायला तयार नाहीत असे पाहून बरेच दिवस मनात घोळत असलेला धर्मांतराचा विचार त्यांनी पक्का केला. आपल्या हजारो अनुयायांसह त्यांनी बौद्ध धर्म स्वीकारला. त्याचे महाराष्ट्राच्या ग्रामीण भागात बरेच पडसाद उमटले. मेलेली जनावरे ओढणे आदी गावकीची कामे करायला नवबौद्धांनी नकार दिल्याने अनेक ठिकाणी तणाव निर्माण झाले. मारामाऱ्याही झाल्या. आता शेडयूल्ड कास्ट्स् फेडरेशन या पक्षाची आवश्यकता उरली

अनुक्रमणिका

नाही. दलित व इतरेजन यांचा मिळून राजकीय पक्ष बनवावा असे वाटून बाबासाहेबांनी रिपब्लिकन पक्षाची स्थापना केली. शैक्षणिक व नोकरीविषयक सवलती या हिंदुधर्मातील अनुसूचित जातींसाठी आहेत. ज्या दलितांनी बौद्ध धर्म स्वीकारला त्यांना या सवलती नाकारल्या गेल्या. महाराष्ट्रात १९६४ साली नवबौद्धांना वा सवलती लागू करण्यात आल्या; पण केंद्र सरकारच्या नोकऱ्यांत मात्र राखीव जागांवर त्यांना अधिकार देण्यात आलेला नाही.

१९५५ साली तेलगु भाषिकांचे आंध्रराज्य वेगळे व्हावे यासाठी पोट्टी श्रीरामुलू यांनी उपोषण केले. ५६ व्या दिवशी त्यांचा त्यात अंत झाला. जनतेचा आगडोंब उसळला. अखेरीस भारत सरकारने आंध्र-प्रदेशनिर्मितीला मान्यता दिली. परिणामतः भाषावार राज्यरचनेची मागणी इतर अनेक भागांत व महाराष्ट्रातही होऊ लागली. राज्य पुनर्रचनेच्या प्रश्नाचा विचार करण्यासाठी केंद्र सरकारने फाझल अली कमिशन नेमले. त्यांच्या शिफारशींमुळे मराठी भाषिक जनतेचे समाधान न होऊन, विशेषतः मुंबईला स्वतंत्र राज्याचा दर्जा न देता ते शहर महाराष्ट्रातच ठेवावे या मागणीसाठी महाराष्ट्रात प्रखर जनआंदोलन सुरू झाले. सुरुवातीला काँग्रेस पक्ष या मागणीसाठी इतर पक्षांबरोबर सहकार्य करीत असला तरी पक्षश्रेष्ठींनी पक्षशिस्त पाळा असा सल्ला दिल्याने ते दूर झाले. समाजवादी (तोपर्यंत त्या पक्षाचे नामाभिधान प्रजासमाजवादी पक्ष असे झाले होते), कम्युनिस्ट, शेकाप, रिपब्लिकन आदी पक्षांची मिळून संयुक्त महाराष्ट्र समिति बनविण्यात आली व तिने त्या चळवळीचे नेतृत्व केले. १९५६ च्या राज्यपुनर्रचना कायद्यानुसार विदर्भ व मराठवाडा हे मराठीभाषिक प्रदेश मुंबई राज्याला जोडण्यात आले. बेळगाव, कारवार व विजापूर हे कानडी भाषिक प्रदेश नव्याने अस्तित्वात आलेल्या कर्नाटक राज्याला जोडण्यात आले. मुंबईसह गुजरात व महाराष्ट्र यांचे विशाल द्वैभाषिक राज्य बनविण्यात आले. या दोन्ही भाषिकांना आपली स्वतंत्र राज्ये पाहिजे होती. त्यामुळे चळवळ चालूच राहिली. बेळगाव, कारवार व बिदर या जिल्ह्यांतील मराठी बहुभाषिक असलेला प्रदेश महाराष्ट्राला जोडला जावा अशी तेथील जनतेची इच्छा होती. संयुक्त महाराष्ट्र समितीने १९५७ च्या लोकसभा व विधानसभेच्या निवडणुका या प्रश्नावर लढविल्या. गुजरातेत महागुजरात जनता परिषद व महाराष्ट्रात सं. म. समितीला खूप जागा मिळाल्या. पण विदर्भात काँग्रेसला फारच जागा मिळाल्याने काँग्रेस बहुमत मिळवू शकला. त्या पक्षाचे मंत्रिमंडळ यशवंतराव चव्हाणांच्या नेतृत्वाखाली बनले. त्यांनी जनतेच्या भावना ओळखून पं. जवाहरलाल नेहरूंचे मन वळवले व १९६० साली द्विभाषिकाची विभागणी होऊन गुजरात व महाराष्ट्र ही दोन राज्ये अस्तित्वात आली.

संयुक्त महाराष्ट्राचा प्रश्न हा राजकीय दृष्ट्या फारच स्फोटक ठरला. काँग्रेस पक्षाचे केंद्रात व राज्यात दोन्ही ठिकाणी सरकार होते. केंद्राने घेतलेला निर्णय राज्यशाखेला पसंत पडला नाही, किंवा त्या निर्णयाची प्रतिक्रिया जनतेत फार तीव्र झाली तर राज्यशाखेने कसे वागावे हा प्रश्न उपस्थित झाला. काही काँग्रेसजन केंद्राच्या निर्णयाच्या विरोधात उभे राहिले व त्या प्रश्नापुरते त्यांनी विरोधी पक्षांशी, म्हणजे सं. म. समितीशी सहकार्य केले. काही नेते नाराज होऊन निष्क्रीय झाले. तर काही जणांनी या प्रश्नावरील मतभेद हा मूलभूत स्वरूपाचा नाही, पक्षाचे एकूण ध्येयधोरण आपल्याला मान्य असल्याने या प्रश्नावरील केंद्रीय नेतृत्वाचा निर्णय आपल्याला पसंत पडला नसला तरी पक्षाची शिस्त पाळली पाहिजे असे मानले. काही केंद्रीय नेत्यांसमोर मान तुकवली नाही तर सत्तास्थाने सोडावी लागतील असे वाटल्यावरून त्यांनी तशी भूमिका घेतली असे काही जणांचे मत आहे. ते काही असो. या प्रश्नामुळे काँग्रेस पक्षाला मोठ्या कसोटीतून जावे लागले हे खरे. त्या पक्षाच्या राज्यशाखेच्या नेतृत्वात या निमित्ताने महत्त्वपूर्ण बदल घडून आला. देव–देवगिरीकर (शंकरराव देव हे महाराष्ट्र काँग्रेसचे ज्येष्ठ नेते व केंद्रीय पातळीवर सरचिटणीस होते, तर त्र्यं. र. देवगिरीकर हे महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस कमिटीचे अनेक वर्षे अध्यक्ष होते.) यांचे नेतृत्व संपले व बहुजनसमाजाच्या, म्हणजे मराठा व्यक्तींच्या हाती, यशवंतराव चव्हाणांच्या भाषेत 'कारभारीपण'

अनुक्रमणिका






आले. महाराष्ट्रातील बहुजन समाजाला, आता आपण सत्ताधारी बनलो असे वाटू लागले. हे एक महत्त्वाचे मन्वन्तर होते. याचे बरेवाईट दूरगामी परिणाम झाले. आपण खऱ्या अर्थाने सत्ताधारी बनलो या जाणिवेमुळे बहुजनसमाजातील नेत्यांच्या उपक्रमशीलतेला बहर आला. साखर, सूत, तेल आदी क्षेत्रांतील सहकारी कारखानदारी मोठ्या प्रमाणावर वाढली. ग्रामीण भागात उद्योगाची नवी केंद्रे स्थापन झाल्याने तेथील आर्थिक विकासाला व सांस्कृतिक-शैक्षणिक हालचालींना चालना मिळाली. मात्र सत्ताधारी बनणे हा आपला जन्मसिद्ध हक्क आहे असा समज मराठा जातीच्या अदूरदर्शी तरुणांत निर्माण होऊ लागला. ध्येयवाद, उमेदवारी, स्वयंसेवक वृत्ती यांची गरज नाही, जन्मामुळेच सत्ता मिळू शकते अशा अपप्रवृत्तींना प्रोत्साहन मिळाले. इतर छोट्या छोट्या, विशेषतः मागास जमातींना दडपण्याची प्रवृत्ती वाढली.

या चळवळीचा विरोधी पक्षांना फायदा मिळाला. प्रजासमाजवादी, शे. का. पक्ष, कम्युनिस्ट, रिपब्लिकन व हिंदुमहासभा हे पक्ष व काही अपक्ष व्यक्ति–पत्रकार यांना लोकसभा विधानसभेत मोठ्या संख्येने जागा मिळाल्या. त्यानंतर झालेल्या महापालिका व लोकल बोर्ड निवडणुकांतही त्यांना यश मिळत गेले. संयुक्त महाराष्ट्र चळवळीला पाठिंबा देणाऱ्या पण निवडणुकीसाठी त्या आघाडीत सामील न होता वेगळे राहिलेल्या जनसंघ व लोहिया–सोशालिस्टांचा धुव्वा उडाला. या प्रश्नावरून विरोधी पक्षांपैकी प्रजासमाजवादी पक्षातही मतभेद निर्माण झाले. या प्रश्नावरील महाराष्ट्र शाखेची भूमिका केंद्रीय नेतृत्वाला अतिरेकी वाटली. त्यासाठी एक प्रतिनिधिमंडळ महाराष्ट्रात आले. अखेरीस दिलजमाई झाली. मात्र विदर्भातील अनेक कार्यकर्त्यांनी या प्रश्नावरील मतभेदामुळे पक्ष सोडला व ते नागविदर्भ आंदोलन समितीत सामील झाले. ( विदर्भाचे स्वतंत्र राज्य ठेवावे अशी भावना तेथील काही थरांत होती. पुढे काही काळ त्या प्रश्नावर अधूनमधून चळवळही होत राहिली. पण कालांतराने त्यातील तीव्रता कमी झाली. )

सं. म. समितीला मिळालेल्या यशामुळे तो एक राजकीय पक्षच बनवावा असा विचार समितीतील बिनपक्षाच्या लोकांनी आग्रहाने मांडला. राजकीय पक्षवाद्यांनी त्यावर निर्णय घेण्याचे लांबवले. तरी कामगारसंघटना एक कराव्यात असा बूट निघाला. मुंबईत मुंबई गिरणी कामगार युनियन स्थापन झाली. तिचे अध्यक्ष एस. एम. जोशी व सरचिटणीस श्री. अ. डांगे होते. इतर काही औद्योगिक केंद्रांतही तसे प्रयोग झाले. महापालिका व लोकल बोर्डातील सत्तास्थानांच्या वाटपावरून समितीत मतभेद झाले. १९५९ साली हंगेरीतील इम्रेनाज या कम्युनिस्ट नेत्याला रशियन आदेशाचे पालन करायला नकार दिल्यामुळे ठार मारण्यात आले. त्या घटनेचा निषेध करण्याचा प्रजासमाजवाद्यांनी आग्रह धरला कम्युनिस्टांनी विरोध केला. शेवटी या प्रश्नावरून प्र. स. पक्ष समितीच्या बाहेर पडला. याच सुमारास, म्हणजे १ मे १९६० रोजी वेगळ्या महाराष्ट्र राज्याची निर्मिती झाली. त्यामुळे प्र. स. पक्ष, शे. का. पक्ष व कम्युनिस्ट पक्षातील अनेक मराठा कार्यकर्ते काँग्रेसमध्ये सामील झाले. १९६२ च्या सार्वत्रिक निवडणुकीत काँग्रेसला प्रचंड विजय मिळाला. सं. म. समिती व तिच्यातून बाहेर पडलेला प्र. स. पक्ष या दोहोंना पराभव पत्करावा लागला. जनसंघ व लोहिया-समाजवाद्यांनाही यश मिळाले नाही.

१९६२ नंतर महाराष्ट्रात जिल्हा परिषद–पंचायत समित्या यांना विशेष अधिकार देण्यात आले सहकारी चळवळीला, विशेषतः कारखानदारीला उत्तेजन देण्यात आले. यात मोठ्या उमेदीने शिरलेल्या बहुजनसमाजाने काँग्रेसला व्यापक आधार मिळवून दिला. ग्रामीण भागात शिक्षणसंस्थांचीही मोठ्या प्रमाणावर वाढ झाली. विरोधी पक्षाच्या कार्यकर्त्यांनी अशा उपक्रमांत पुढाकार घेतला तर त्यांची कोंडी करण्यात येऊ लागली. सहकारी संस्था, ग्रामीण शिक्षणसंस्था ही सत्तेची महत्त्वाची केंद्रे बनली. सत्तास्थानांच्या वाटपातून हेवेदावे मोठ्या प्रमाणावर वाढले. बहुतेक सर्वच पक्षांत या अपप्रवृत्ती दिसून येऊ लागल्या. १९६७ च्या सार्वत्रिक निवडणुकीपूर्वी विरोधी पक्षांनी बेळगाव आदी सीमाप्रश्नावर एकत्र येऊन संपूर्ण महाराष्ट्र समिती बनवली. पण त्याने जनमनाची पकड घेतली नाही. सं. म. समितीला फार थोड्या जागा मिळाल्या. काँग्रेस पक्षाला बहुमत मिळाले तरी त्यांच्यात

फाटाफूट बरीच झाली होती. त्या निवडणुकीचे वैशिष्टय हे, की सर्व विरोधी पक्षांपेक्षा बंडखोर काँग्रेसवाले अधिक संख्येने विधानसभेवर निवडून आले होते.

१९६२ ते ६७ या काळात बहुतेक पक्षांत फाटाफूट झाली होती. रिपब्लिकन पक्षाचे तीन गट झाले होते. कम्युनिस्ट पक्षात १९६४ झाली राष्ट्रीय पातळीवर दोन गट पडले. महाराष्ट्रातही फाटाफूट झाली. डाव्या कम्युनिस्टांना सरकारने स्थानबद्ध करावे यासाठी उजव्या कम्युनिस्टांनी माहिती पुरवल्याची उदाहरणे काही ठिकाणी घडली. समाजवादी व प्रजा समाजवादी एकत्र येऊन संयुक्त समाजवादी पक्ष स्थापन झाला व त्यातून काही जण बाहेर पडून त्यांनी परत प्रजा समाजवादी पक्ष चालू केला. अशी फाटाफूट शे. का. प. मध्ये झाली नसली तरी त्याची शक्तीही क्षीण होऊ लागली. मुस्लिम लीग व हिंदुमहासभा निष्प्रभ बनले तर जनसंघाची ताकद वाढू लागली. निदान अधिक संघटित दिसू लागली.

१९६८ साली मुंबईत एका नव्या राजकीय शक्तीचा उदय झाला. तिचे नाव शिवसेना. संयुक्त महाराष्ट्र चळवळीच्या काळात महाराष्ट्राची अस्मिता व छत्रपती शिवाजी महाराज यांचा बराच उदोउदो झाला होता. तरी धोरणे व मांडणी राजकीय-आर्थिक प्रश्नांच्या अनुषंगाने होत राहिली. भाषावार राज्यरचनेचा आग्रह त्या चळवळीने धरला असला तरी अन्यभाषिकांविषयी द्वेष-भावना निर्माण होऊ नये अशी खबरदारी नेत्यांनी घेतली होती मात्र आर्थिक प्रश्न बिकट होत चालले होते. १९६४ ते ६७ या काळात महागाईच्या प्रश्नावर कामगारांचे लढे मोठ्या प्रमाणावर संघटित झाले होते. दुष्काळनिवारण, शेतमालाला किफायतशीर भाव बांधून मिळावेत, शेतसारा रद्द व्हावा, शेतमजुरांना किमान वेतन ठरवून मिळावे आदी मागण्यांवर समाजवाद्यांनी व शे. का. पक्षाने आंदोलने केली होती. भूमिहीनांना जमीन मिळावी या प्रश्नावर रिपब्लिकन पक्षाने सत्याग्रह केला होता. पण एकंदरीने जनतेचे, विशेषतः मुंबईतल्या लोकांचे प्रश्न सोडविण्यासाठी खास कृती करण्याच्या अवस्थेत कोणी नव्हते. त्या शहरात सुशिक्षितांच्या बेकारीचा प्रश्न उग्र रूप धारण करत होता. तेथे एके काळी प्रभावशाली असलेले समाजवादी व कम्युनिस्ट पक्ष अंतर्गत भांडणांमुळे कमजोर झाले होते. ज्या मुंबईसाठी-मराठी तरुणांनी रक्त सांडले त्या शहरात मराठी तरुणांना रोजगार मिळत नाही अशी भावना बळावत चालली. सरकारी, निमसरकारी व खाजगी कंपन्यांत महत्त्वाच्या जागांवर बिगरमराठी, विशेषतः दक्षिणभारतीय तरुणांच्या नेमणुका होत आहेत, तेव्हा त्यांना हटविल्याशिवाय मराठी तरुणांना नोकऱ्या मिळणार नाहीत असा प्रचार मार्मिक या साप्ताहिकातून श्री. बाळ ठाकरे या व्यंगचित्रकारांनी सुरू केला. पाहता पाहता ती चळवळ फोफावत गेली. दक्षिण भारतीयांची दुकाने, विशेषतः उडप्यांची हॉटेले फोडणे व लुटणे, बेछूट दगडफेक करणे असे प्रकार शिवसैनिक करू लागले. शिवाजी महाराजांना दैवत मानून संघटनेचे नाव शिवसेना असे ठेवण्यात आले व बाळासाहेब ठाकरे सेनापती बनले. राजकीय पक्षांनी जनतेचे नुकसान केले, सीमाभागातील मराठी भाषिकांची फसवणूक केली– असे त्यांचे प्रतिपादन असे. मध्यमवर्ग सं. म समितीच्या विघटनामुळे नाराज झाला होता. त्यानेही शिवसेनेला उचलून धरले. ध्येयवाद, विचारसरणी, धोरणे वगैरे प्रपंच न करता अन्य भाषिकांचा द्वेष व बेछूट गुंडगिरी एवढाच या संघटनेचा कार्यक्रम होता. १९६८ साली शिवसेनेने घडवलेल्या दंगलीत प्रचंड प्राणहानी व वित्तहानी झाली. सत्ताधाऱ्यांनी दंगल शमवण्यासाठी गोळीबार वगैरे उपाय योजले, तरी एकंदरीने सबुरीचेच धोरण स्वीकारले. महापालिका निवडणुकीत शिवसेनेला चांगले यश मिळाले. भांडवलदारवर्गाने या शक्तीचा कम्युनिस्टांना नामोहरम करण्यासाठी उपयोग करून घेतला. तर सत्ताधाऱ्यांनीही विरोधकांविरुद्ध तिचा सोयीनुसार वापर केला. शिवसैनिकांनी कम्युनिस्टांविरोधी अनेक दंगली घडवल्या. पुढे शिवसेनेने अँबुलन्ससेवा वगैरेसारखी लोकोपयोगी कामे सुरू केली. शिवसेनेचा प्रभाव मुंबई-ठाणे परिसरापलीकडे फार वाढला नाही. पुणे, नासिक येथे काही राजकीय कार्यकर्त्यांनी शिवसेनेत प्रवेश केला. पण त्यांना फारसा प्रतिसाद

मिळाला नाही. शिवसेनेने मुस्लिमद्वेषाची भावनाही कडवेपणाने जोपासली. ख्रिश्चन धर्मीयांविरुद्धही मधूनमधून वक्तव्ये करण्यात येतात.

१९६७ साली देशाच्या राजकारणात महत्त्वपूर्ण बदल सुरू झाला. पं. नेहरूंच्या निधनामुळे काँग्रेस पक्ष कमकुवत बनला होता. आर्थिक प्रश्न सोडविण्यात व आर्थिक विकासाची गती वाढविण्यात सरकारला फारसे यश येत नव्हते. १९६२ साली झालेल्या चिनी आक्रमणापुढे भारताचा झालेला पराभव व १९६५ सालचे पाकिस्तानबरोबरचे युद्ध यांमुळे सरकारी तिजोरीवर व एकंदर अर्थव्यवस्थेवर ताण पडला होता. दक्षिणेत व पूर्वेकडे भाषिक दंगली झाल्या होत्या. भ्रष्टाचार बोकाळला होता. १९६६ सालच्या दुष्काळामुळे व महागाईमुळे सामान्य जनता त्रस्त झाली होती. परिणामतः १९६७ च्या निवडणुकीत काँग्रेसला लोकसभेतही जेमतेम बहुमत मिळाले व सात मोठ्या राज्यांत त्या पक्षाचा पराभव झाला. डॉ. लोहियांनी 'काँग्रेस हटाव' ही घोषणा देऊन विरोधी पक्षांना किमान कार्यक्रमाच्या आधारावर एकत्र येण्याचे आवाहन केले होते. निवडणुकीपूर्वी त्यांच्यात आघाडी स्वरूपाचे किंवा जागावाटपाच्या स्वरूपाचेसुद्धा सहकार्य झाले नव्हते. तरीही काँग्रेसचा पराभव झालेल्या राज्यांत विरोधी, म्हणजे बिगरकाँग्रेसी पक्षांना सत्तेवर जाण्याची संधी चालून आली. त्यासाठी विधिमंडळ पातळीवर संयुक्त विधायक दले निर्माण करण्यात आली व त्यांनी तेथे तेथे मंत्रिमंडळे बनविली. संयुक्त समाजवादी, प्रजा समाजवादी, भारतीय कम्युनिस्ट, मार्क्सवादी कम्युनिस्ट, जनसंघ आदी राष्ट्रीय पातळीवरचे व भारतीय क्रांतिदल, फॉर्वर्ड ब्लॉक यांसारखे प्रादेशिक पक्ष या आघाड्यांत व संयुक्त मंत्रिमंडळांत सामील झाले. ज्या राज्यांत काँग्रेसला नाममात्र बहुमत होते तेथील असंतुष्ट काँग्रेसवाले बाहेर पडून बिगर काँग्रेसी आघाड्यांत सामील झाले. सत्ताप्राप्तीसाठी पक्षांतरे करण्याचे प्रकार मोठ्या प्रमाणावर होऊ लागले. 'आयाराम-गयाराम' हा वाक्प्रचार रूढ झाला. पक्षांतरामुळे अनेक राज्यसरकारे कोसळली व नवी बनली. संधिसाधुपणाला ऊत आला.

काँग्रेस पक्षाबद्दल जनसामान्यांत आस्था राहिलेली नाही हे पाहून त्या वेळी पंतप्रधान असलेल्या इंदिरा गांधींनी स्वतःची पुरोगामी प्रतिमा बनविण्याचा प्रयत्न सुरू केला. राष्ट्रपती-निवडणुकीच्या निमित्ताने त्यांनी काँग्रेस पक्षात फूट पाडली. जुन्या, जेष्ठ नेत्यांना प्रतिगामी, सिंडिकेटवाले म्हणून बदनाम केले. दोन्ही कम्युनिस्ट पक्ष व काही प्रादेशिक पक्षांचा पाठिंबा मिळवून केंद्रीय मंत्रिमंडळासाठी लोकसभेत बहुमत टिकवले. महाराष्ट्रातील काँग्रेस पक्ष राष्ट्रपती-निवडणुकीच्या वेळी सिंडिकेटच्या बाजूने होता; पण त्या निवडणुकीत इंदिराबाईंची सरशी झालेली पाहून यशवंतरावांनी बाजू बदलली. दोन्ही कम्युनिस्ट पक्ष केंद्रात काँग्रेसला पाठिंबा देत होते, तर महाराष्ट्रात त्या पक्षाच्या सरकारला विरोध करीत होते. संयुक्त समाजवादी पक्ष 'काँग्रेस हटाव' भूमिकेवर चिकटून होता. (तरी राष्ट्रपती-निवडणुकीत त्यानेही इंदिराबाईंचे उमेदवार व्ही. व्ही. गिरी यांना पाठिंबा दिला.) अशी गोंधळाची परिस्थिती असताना १९७० च्या अखेरीस इंदिराबाईंनी लोकसभा विसर्जित करून मध्यावधी सार्वत्रिक निवडणुका घेण्याचे जाहीर केले. कम्युनिस्ट स्वतंत्रपणाने लढले. प्रजा समाजवादी पक्ष इंदिरा काँग्रेसशी सहकार्य करायला तयार झाला होता, पण त्यांना आयत्या वेळी तोंडघशी पाडण्यात आले. संयुक्त समाजवाद्यांनी संघटना काँग्रेस, स्वतंत्र पक्ष, जनसंघ आदी उजव्या समजल्या जाणाऱ्या पक्षांबरोबर बडी आघाडी बनविली. बँकांचे राष्ट्रीयीकरण व संस्थानिकांचे तनखे रद्द करणे यांसारख्या उपक्रमांमुळे इंदिराबाईंची प्रतिमा पुरोगामी बनली होती. लोकसभा निवडणुकीत त्यांना प्रचंड यश मिळाले. देशातल्याप्रमाणे महाराष्ट्रातले काँग्रेसविरोधी पक्षही साफ धुतले गेले. याच काळात यशवंतरावांनी रिपब्लिकन पक्ष—गायकवाड गटाबरोबर युती केली होती.

निवडणूक जिंकण्यासाठी इंदिराबाईंनी 'गरिबी हटाव'चा नारा दिला होता. त्या दिशेने विशेष काही कृती होत नव्हती. एवढ्यात बांगला देशाचा प्रश्न उभा राहिला. पूर्व पाकिस्तानमधील जनता प्रक्षुब्ध होऊन पाकिस्तानी सत्ताधाऱ्यांविरुद्ध उठली.

पाकिस्तानने कुरबूर काढल्याने भारत—पाक युद्ध झाले. त्यात भारताचा अभूतपूर्व विजय झाला व पाकिस्तानचे दोन तुकडे होऊन स्वतंत्र 'बांगला देश' अस्तित्वात आला. त्या पार्श्वभूमीवर १९७२ ला झालेल्या विधानसभांच्या सार्वत्रिक निवडणुकीतही इंदिरा-कॉंग्रेसला प्रचंड यश मिळाले.

निवडणुकीतील पराभवामुळे विरोधी पक्ष काही काळ निराश झाले असले तर आश्चर्य नाही. 'गरिबी हटाव' घोषणेनुसार केंद्र व राज्य सरकारे काही भरीव कृती करण्याचे लक्षण दिसेना. आंतरराष्ट्रीय बाजारपेठेत तेलाच्या किंमती वाढल्याने चलनवाढ व महागाईचे चटके सामान्य जनतेला परत तीव्रतेने बसू लागले १९७२ ते ७४ ही तीन वर्षे महाराष्ट्रात भयानक दुष्काळाची गेली. समाजवादी, मार्क्सवादी कम्युनिस्ट, लाल निशाण, शे. का. पक्ष आदींनी दुष्काळनिवारण व निर्मूलनासाठी शेतकरी —शेतमजुरांना संघटित करण्याचे प्रयत्न जिद्दीने चालवले होते. सरकारी यंत्रणाही तुलनेने बरीच संवेदनशील बनली होती. ग्रामीण रोजगार हमी योजना याच काळात सुरू करण्यात आली. वर उल्लेखिलेल्या पक्षांच्या आघाडीने रोजगार, केल्या कामाचा दाम, पाणी, धान्य, चारा आदी गोष्टी सुमारे दोन कोटी दुष्काळग्रस्त जनतेला मिळवून देण्यात भरीव कामगिरी बजावली. या पक्षांची आघाडी बनली होती; पण ती केवळ जनतेच्या प्रश्नांवर करावयाच्या कार्यक्रमापुरती मर्यादित होती. निवडणुकीबाबत त्यांच्यात कसलाही करार झालेला नव्हता. दुष्काळनिवारण कामावर काम करणाऱ्यांना महागाई भत्ता रोज पन्नास पैसे मिळावा या मागणीसाठी १९७४ च्या २ जानेवारीला महाराष्ट्र बंद चा कार्यक्रम झाला. त्यात औद्योगिक कामगारही सहभागी झाले होते.

भ्रष्टाचार व महागाई या प्रश्नांवर देशभरची जनता त्रस्त झाली होती. गुजरातेत या प्रश्नांवर विद्यार्थ्यांनी नवनिर्माण आंदोलन सुरू केले. त्याने इतके उग्र रूप धारण केले की, अखेरीस तेथील राज्यसरकार कोसळले. जयप्रकाश नारायण यांनी त्या प्रश्नावर देशव्यापी आंदोलन सुरू केले. विशेषतः बिहारमध्ये विद्यार्थ्यांची व्यापक चळवळ उभी राहिली. जॉर्ज फर्नांडीस यांच्या नेतृत्वाखाली रेल्वे कामगारांचा अभूतपूर्व देशव्यापी संप झाला. गुजरात विधानसभेच्या निवडणुका झाल्या. त्यांत इंदिरा कॉंग्रेसचा पराभव झाला. संघटना कॉंग्रेस, जनसंघ, समाजवादी, स्वतंत्र व अपक्ष यांच्या मिळून बनलेल्या 'जनता मोर्चा'ला बहुमत मिळाले व त्यांचे मंत्रिमंडळ बनले. ज्या दिवशी गुजरातचा निकाल जाहीर झाला त्याच दिवशी इंदिरा गांधींची लोकसभेवर १९७१ साली झालेली निवडणूक अवैध असल्याचा अलाहाबाद उच्च न्यायालयाचा निकाल आला (१२ जून १९७५). त्यांनी पंतप्रधानकीचा राजीनामा द्यावा अशी मागणी विरोधी पक्षांनी व जे. पीं. नी केली. देशातल्या बहुतेक वृत्तपत्रांनीही ती मागणी उचलून धरली. आपल्या हातून सत्ता जाते आहे हे पाहून ती टिकविण्यासाठी इंदिराजींनी २५ जून १९७५ रोजी अंतर्गत आणीबाणी देशावर लादली. विरोधी पक्षांच्या प्रमुख नेत्यांना स्थानबद्ध करण्यात आले. नागरिकांचे मूलभूत हक्क तहकूब करण्यात आले. वृत्तपत्रांवर सेन्सॉरशिप लादण्यात आली. जे. पी. व संघटना कॉंग्रेस, समाजवादी, जनसंघ, भारतीय क्रांतिदल आदी पक्ष हे प्रतिगामी फॅसिस्ट असून त्यांना देशात प्रतिगामी उठाव करावयाचा होता; त्यांचा तो कट हाणून पाडण्यासाठी व 'गरिबी हटाव'चा वीस कलमी कार्यक्रम राबवण्यासाठी आणीबाणी लादावी लागली असे प्रतिपादन इंदिराबाईंनी केले. भारतीय कम्युनिस्ट पक्षाने त्यांना पाठिंबा दिला. महाराष्ट्रातील लाल निशाण पक्षानेही तसेच केले.

मध्यंतरीच्या काळात महाराष्ट्रातील कॉंग्रेस पक्षात महत्त्वाची घडामोड झाली. वसंतराव नाईक १९६३ पासून मुख्यमंत्री होते. ते वंजारा जातीचे होते. यशवंतरावांचा त्यांना पाठिंबा होता. मराठा लॉबीत नाईकांच्या विरुद्ध नाराजी होती. त्यांना मुख्यमंत्रिपदावरून हटविण्याच्या कारवाया सुरू झाल्या. इंदिराबाईंनी यशवंतरावांना विश्वासात न घेता बंडखोरांना पाठिंबा दिला. नाईकांना राजीनामा द्यावा लागला व शंकरराव चव्हाण मुख्यमंत्री झाले. महाराष्ट्र कॉंग्रेसच्या तोपर्यंत एकमुखी असलेल्या नेतृत्वाला तडे गेले. आणीबाणीच्या काळात शंकररावांनी एककल्ली कारभार केल्याने कॉंग्रेस पक्षात असंतोषनिर्माण झाला.









आणीबाणीला केवळ काही राजकीय पक्षांनीच विरोध केला असे नाही. साहित्यिक, पत्रकार, समाजातील अनेक जाणकार अपक्ष नागरिक यांचा आणीबाणीच्या नावाखाली होणाऱ्या दडपशाहीला विरोध होता व तो संघटित होऊ लागला होता. त्या एकाधिकारशाही राजवटीत गरीब जनतेचे प्रश्न सोडवण्याऐवजी धनिष्ठ वर्गाला अनुकूल अशीच पावले पडू लागली. संजय गांधी यांच्या नेतृत्वाखालील युवक काँग्रेसमध्ये समाजातील हुच्च मनोवृत्तीच्या शक्ती संघटित झाल्या व ते समाजात हवा तसा धुडगूस घालू लागले. नागरिकांचे राजकीय हक्क हिरावून घेतले गेले असल्याने उघडपणे विरोधी चळवळ चालू शकत नव्हती; तरी समाजवादी, जनसंघ व संघटना काँग्रेस व काही सर्वोदयवादी यांनी स्थापन केलेल्या लोक-संघर्ष समितीमार्फत शांततामय भूमिगत चळवळ चालवली जात होती. गुप्त पत्रके छापून महाराष्ट्रभर व देशभर पाठवली जात होती. मधूनमधून सत्याग्रह होत होते. कार्यकर्त्यांची शिबिरे होत होती. कराड येथे भरलेल्या मराठी साहित्य संमेलनाच्या व्यास-पीठावरून दुर्गाबाई भागवतांनी अभिव्यक्तिस्वातंत्र्या-वरील बंधनांचा निषेध केला व जयप्रकाशांना अभिवादन केले. पुढे त्यांनाही तुरुंगात जावे लागले. शे. का. पक्ष व मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्ष यांनी आणीबाणीला पाठिंबा दिला नाही, उलट जनतेच्या मागण्या रेटण्यासाठी काही कार्यक्रम उघडपणे केले.

आणीबाणीच्या काळात घटनेत दुरुस्ती करून इंदिराबाईंनी लोकसभा व विधानसभांची मुदत पाच ऐवजी सहा वर्षांची करून घेतली होती. आणी-बाणीला जनतेचा फारसा उघड विरोध झालेला नाही व प्रमुख विरोधी पक्षांच्या संघटना विस्कळीत झाल्या आहेत अशा स्थितीत निवडणुका घेतल्या तर आपल्याला जय मिळेल असे वाटल्यावरून इंदिराबाईंनी मार्च १९७७ मध्ये लोकसभेच्या सार्वत्रिक निवडणुका घेतल्या. आणीबाणीला विरोध करणाऱ्या पक्षांनी एकच पक्ष बनवावा असा विचार आधीपासून सुरू झाला होता. लोकसभा निवडणु-कांच्या घोषणेमुळे त्याला गती मिळाली. संघटना काँग्रेस, भारतीय लोकदल, जनसंघ व समाजवादी या पक्षांनी मिळून राष्ट्रीय पातळीवर जनता पक्षाची स्थापना केली. त्यात अनेक सर्वोदय कार्यकर्ते व काँग्रेसमधून फुटून आलेले लोक सामील झाले. राष्ट्रीय पातळीवर मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्षाने त्याच्याशी सहकार्य करण्याचे ठरवले. महाराष्ट्रात शेतकरी कामगार पक्ष, रिपब्लिकन पक्ष खोब्रागडे व कांबळे गट आणि महाविदर्भ आंदोलन समिती यांनी सहकार्य करण्याचे ठरवले. त्या निवडणुकांत आंध्र व कर्नाटकचा अपवाद वगळता इंदिरा काँग्रेसचा पराभव झाला. महाराष्ट्रात ४८ पैकी २८ जागा जनता व मित्र पक्षांनी जिंकल्या. केंद्रात जनता पक्षाचे मंत्रिमंडळ अधिकारारूढ झाले. त्यानंतर काँग्रेसमधून अनेकजण जनता पक्षात आले.

महाराष्ट्रात काँग्रेसचा इतका निर्णायक पराभव पहिल्यांदाच झाला होता त्याचा त्या पक्षावर परि-णाम झाला. अंतर्गत बंडखोरांना ते निमित्तही मिळाले. शंकरराव चव्हाणांविरुद्ध उठाव झाला. मध्यंतरीच्या काळात राजकारणाचा संन्यास घेत-लेले श्री. वसंतदादा पाटील मुख्यमंत्री झाले.

राष्ट्रीय पातळीवर काँग्रेसमध्ये परत फूट पडली होती. इंदिराबाईंचा काँग्रेस पक्ष बाजूला गेला. महाराष्ट्रात श्री. नासिकराव तिरपुडे यांच्या नेतृत्वाखाली त्या पक्षाची शाखा संघटित झाली. त्या पक्षाला विदर्भात विशेष पाठिंबा मिळाला. शंकरराव चव्हाण वगैरेंनी बाहेर पडून महाराष्ट्र समाजवादी काँग्रेस या पक्षाची स्थापना केली.

१९७८ च्या मार्च महिन्यात महाराष्ट्र विधान-सभेच्या सार्वत्रिक निवडणुका झाल्या. त्यांत विविध पक्षांचे बलाबल पुढीलप्रमाणे दिसून आले.

| | उमेदवार उभे | विजयी | डिपॉ. जप्त | मिळालेल्या मतांचे% |
|---|---|---|---|---|
| जनता | २१५ | ९९ | २६ | २७.९९ |
| काँग्रेस (स्वर्णसिंग) | २५९ | ६९ | ७७ | २५.३३ |
| काँग्रेस (आय.) | २०३ | ६२ | ८५ | १८.३४ |
| मार्क्स. कम्युनिस्ट | १२ | ९ | १ | १.६९ |
| भारतीय कम्युनिस्ट | ४८ | १ | ४१ | १.४८ |
| शे. का. पक्ष | ८८ | १३ | ४७ | ५.६५ |
| अपक्ष | ९९४ | ३५ | ८८२ | १९.६२ |









रिपब्लिकन पक्ष खोब्रागडे व कांबळे गट आणि महाविदर्भ संघर्ष समिती हे जनता पक्षाच्या बरोबर होते. त्यांना मान्यताप्राप्त पक्षांचा दर्जा नसल्याने त्यांचा अंतर्भाव वरील तक्त्यात 'अपक्ष' या गटात केलेला आहे. तसेच शंकरराव चव्हाणांच्या नेतृत्वाखालील महाराष्ट्र समाजवादी कॉंग्रेस या पक्षाचाही त्यात समावेश आहे. खऱ्या अपक्ष विजयी उमेदवारांची संख्या बरीच कमी होती.

या निवडणुकीत कुठल्याच पक्षाला बहुमत नाही. कॉंग्रेस व कॉंग्रेस (आय.) यांनी एकत्र येऊन व काही अपक्ष आमदारांचा पाठिंबा मिळवून वसंतदादांच्या नेतृत्वाखाली मंत्रिमंडळ बनविले. श्री. तिरपुडेंसाठी उपमुख्यमंत्रिपद निर्माण करण्यात आले. मंत्रिमंडळात ओढाताण चालू राहिली. जुलै मध्ये श्री. शरद पवारांच्या नेतृत्वाखाली काही आमदारांचा गट कॉंग्रेसमधून बाहेर पडला. जनता व मित्र पक्ष आणि पवारांचा समाजवादी कॉंग्रेस या पक्षांचे मिळून विधिमंडळ पातळीवर पुरोगामी लोकशाही दल बनले व त्याला बहुमत असल्याने पुलोदचे मंत्रिमंडळ अधिकारावर आले. त्यांनी चाळीस-कलमी कार्यक्रम स्वीकारला होता. या मंत्रिमंडळाचे काम काही काळ चांगले चालले.

पुलोद मंत्रिमंडळाच्या कारभाराला गालबोट लागले ते नामांतराच्या प्रश्नामुळे. १९७७ मध्ये मराठवाडा विद्यापीठाच्या कार्यकारिणीने एका ठरावान्वये अशा शिफारस केली होती, की त्या विद्यापीठाला डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे नाव द्यावे. जनता, शेकाप, भाकप, माकप व रिपब्लिकन पक्षांनी त्याला पाठिंबा दिला. १९७८ च्या विधानसभा निवडणुकीच्या आधी व नंतर मुख्यमंत्री वसंतदादांनी त्यावर निर्णय घेतला नाही. पुढे पुलोद मंत्रिमंडळ आल्यावर जनता पक्षातल्या काही आमदारांनी 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ' असे नाव द्यावे अशी सूचना केली. तोपर्यंत मराठवाड्यातील काही संघटनांनी मराठवाड्याची अस्मिता जोपासण्याच्या दृष्टीने त्या विद्यापीठाच्या नावात काहीही बदल करू नये अशी आग्रही भूमिका घेतली. २९ जुलै १९७८ रोजी विधिमंडळाच्या दोन्ही सभागृहांत डॉ. आंबेडकरांचे नाव मराठवाडा विद्यापीठाच्या नावाला जोडावे असा ठराव एकमताने केला. त्याबरोबर मराठवाड्यात दंगली उसळल्या. दलितांच्या वस्तीवर हल्ले झाले. त्यांची घरेदारे पेटवली गेली. मराठवाड्यातील जनतेला विश्वासात घेतल्याशिवाय त्या ठरावाची अमलबजावणी केली जाणार नाही असे निवेदन मुख्यमंत्र्यांनी केले. महाराष्ट्राच्या राजकीय व सार्वजनिक जीवनात हा प्रश्न खोलवर शिरला आहे.

जुलै १९७९ मध्ये जनता पक्षात फूट पडली. मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्ष, शे. का. पक्ष व इतर काही पक्षांनी जनता पक्षाला असलेला पाठिंबा काढून घेतला. केंद्रातील जनता सरकार कोसळले. केंद्रीय पातळीवर शे. का. प., कॉंग्रेस (स) यांनी जनता पक्षाला विरोध केला असला तरी त्याचा महाराष्ट्रावर परिणाम होऊ देऊ नये असे संबंधित सर्वांनी ठरविल्यामुळे पुलोद मंत्रिमंडळ टिकून राहिले. १९८० च्या जानेवारीत लोकसभेच्या निवडणुका झाल्या. त्यात पुलोदमधील सहकारी पक्ष एकमेकांविरुद्ध लढले. सबंध देशभर जनतापक्षाचा पराभव झाला व कॉंग्रेस (इं.) पक्ष प्रचंड बहुमताने निवडून आला. दरम्यानच्या काळात यशवंतराव सोडून वसंतदादा आदी बहुतेक सगळे कॉंग्रेसवाले कॉंग्रेस (इं.) मध्ये सामील झाले होते. त्या निवडणुकीचे निकालपत्रक पुढील प्रमाणे होते.

| | उमेदवार | | | |
|---|---|---|---|---|
| | उभे | विजयी | डिपॉ.जप्त | मतदान% |
| कॉंग्रेस (आय) | ४८ | ३९ | – | ५२.९८ |
| कॉंग्रेस (यू) | २४ | १ | ५ | ४.१७ |
| जनता | ३१ | ८ | ६ | २०.३७ |
| भारतीय कम्यु. | २ | – | २ | ०.५० |
| माकप | ४ | – | २ | १.३६ |
| शेकाप | ५ | – | १ | २.५४ |
| रिपब्लि. खो. | ७ | – | ५ | १.५२ |
| रिपब्लि. ग. | २३ | – | २२ | १.७४ |
| फॉर्वर्ड ब्लॉक (म्हणजे विदर्भ संघर्ष स.) | १ | – | १ | ०.०२ |
| अपक्ष | २४६ | – | २४४ | ५.४५ |

मुंबई शहर व रत्नागिरी जिल्हा सोडले तर जनता पक्षाला चांगलाच दणका बसला होता. शरद पवार मुख्यमंत्री असूनही त्यांच्या कॉंग्रेस (यू) पक्षाचे पार पानिपत झाले होते. त्यांच्या पक्षाचे यशवंतराव तेवढे निवडून आले होते.

केंद्रात इंदिरा गांधींच्या नेतृत्वाखालील मंत्रिमंडळ अधिकारारूढ झाले. त्यांनी सुमारे महिन्याभरात महाराष्ट्रातील पुलोद मंत्रिमंडळ बरखास्त केले. इंदिराजी पुन्हा सत्तेवर आल्या हे पाहून जनता पक्षात आलेले बरेचसे काँग्रेसवाले परत तिकडे गेले. एप्रिलमध्ये संघाच्या संदर्भात निर्माण झालेल्या द्विसदस्यत्वाच्या प्रश्नावरून पूर्वाश्रमीचे जनसंघवाले बाहेर पडले. त्यानी भारतीय जनता पक्ष स्थापन केला. भारतीय कम्युनिस्ट पक्षाने आणीबाणीनंतर इंदिरा गांधींना बिनशर्त पाठिंबा देण्याचे धोरण बदलले. १९८० च्या निवडणुकीनंतर श्री. अ. डांगे परत इंदिराबाईंबरोबर सहकार्य करण्याची भूमिका मांडू लागले. त्यामुळे त्यांची पक्षातून हकालपट्टी झाली. त्यांनी अखिल भारतीय कम्युनिस्ट पक्षाची स्थापना केली. त्यांना अनुयायी थोडे मिळाले. भारतीय कम्युनिस्ट पक्षाची ताकत मात्र खच्ची झाली. अनेक कार्यकर्ते निष्क्रीय बनले.

१९८० च्या जूनमध्ये विधानसभेच्या सार्वत्रिक निवडणुका झाल्या. जनता, शेकाप, रिपब्लिकन-खोब्रागडे, भारतीय कम्युनिस्ट व मार्क्सवादी कम्युनिस्ट यांचा जागावाटपाचा समझोता झाला होता. तरी बिगर-काँग्रेसी पक्षांचे अपयश चुकले नाही. या वेळी मध्यमवर्गीयांच्या उदासीनतेमुळे मतदानही फार कमी झाले होते. (मुंबई शहरात ३७%). या निवडणुकीचे निकालपत्र पुढीलप्रमाणे होते–

| | उमेदवार | | | मतदान |
|---|---|---|---|---|
| | उभे | विजयी | डिपॉ. जप्त | % |
| काँग्रेस (आय) | २८६ | १८६ | ५ | ४४·५२ |
| काँग्रेस (यू) | १९३ | ४७ | ५७ | २०·७६ |
| जनता | १११ | १७ | ५० | ८·६४ |
| भाजप | १४५ | १४ | ७४ | ९·१७ |
| भाकप | १७ | २ | ७ | १·३२ |
| माकप | १० | २ | २ | ०·९५ |
| शेकाप | ४१ | ९ | १३ | ४·१५ |
| गरिप | ३६ | – | ३१ | ०·८१ |
| खोरिप | ४१ | १ | ३४ | १·३६ |
| मुस्लिम लीग | ५ | – | १ | ०·१६ |
| फॉर्वर्ड ब्लॉक | १ | – | १ | ०·०३ |
| अपक्ष | ६१३ | १० | ५७३ | ७·८३ |

महाराष्ट्रातील राजकीय पक्षांची यादी वरील तक्त्यात आली आहे. शिवसेनेचा अंतर्भाव अपक्षांत करण्यात आला होता. याशिवाय लाल निशाण पक्ष हा मार्क्सवादी विचारसरणी प्रमाण मानून काम करणारा पक्ष आहे. पुरेशी ताकद वाढली व श्रमिकांच्या चळवळीला मदत होणार असली तरच निवडणूक लढवायची असे त्याचे धोरण आहे.

काँग्रेस (आय) हा महाराष्ट्रातील सर्वांत मोठा पक्ष आहे. सुमारे शंभर वर्षांची परंपरा व अनेक राष्ट्रीय नेत्यांच्या पुण्याईचा वारसा या पक्षाला लाभला. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर केंद्रात (सत्तावीस महिन्यांचा जनता राजवटीचा अपवाद वगळता) तो पक्ष सतत सत्तेवर आहे. बहुतेक राज्यांतही तो सत्तेवर होता. स्वातंत्र्यचळवळीच्या काळातील ठेवण व पं. नेहरूंची भूमिका यामुळे सर्वसमावेशक, राष्ट्रवादी व कल्याणकारी कार्यक्रमावर भर देणारा असे या पक्षाचे स्वरूप आहे. समाजवादी समाजरचनेचे ध्येय अंगिकारणारा ठराव या पक्षाने १९५९ साली नेहरूंच्या प्रेरणेने स्वीकारला होता. शेती व औद्योगिक-व्यापारी क्षेत्रातील धनिक वर्गाचा आपल्या हितसंबंधांच्या रक्षणासाठी सत्ताधाऱ्यांवर अप्रत्यक्ष प्रभाव पाडण्याचा प्रयत्न असतो. स्वातंत्र्योत्तर काळात निवडणुकीच्या राजकारणासाठी राजकीय पक्षांना पैसा पाहिजे असतो. तो देऊन त्या बदल्यात आपल्याला अनुकूल धोरणे राबवायला लावणे या त्यांच्या नीतीला काँग्रेस पक्ष बळी पडला आहे. लोकशाही समाजवादाची मूलभूत तत्त्वे व सार्वजनिक जीवनातील किमान नीतिमत्ता यांच्याबद्दल आंतरिक तळमळ वा बांधिलकी नसल्याने इंदिरा गांधींच्या नेतृत्वाखाली या पक्षाने देशी व परदेशी धनिक वर्गाला अनुकूल ठरतील अशी धोरणे राबवणे, सांप्रदायिक पुनरुज्जीवनवादी शक्तींशी तडजोड करणे, समाजद्रोही, गुंड प्रवृत्तीच्या शक्तींचा राजकीय फायद्यासाठी वापर करणे व त्या बदल्यात त्यांना अभय देणे असे काँग्रेस पक्षाचे चारित्र्य बनले आहे. महाराष्ट्रातील काँग्रेस पक्षातही या सर्व प्रवृत्ती दिसून येत आहेत.

काँग्रेस (स.) या पक्षाला १९८० च्या विधानसभा निवडणुकीत दुसऱ्या क्रमांकाचे स्थान मिळाले होते. पण काँग्रेस (आय) ची पकड घट्ट बसलेली

अनुक्रमणिका

पाहून सत्तेशिवाय राजकारण करण्याची सवय नसलेले अनेक आमदार कार्यकर्ते व खुद्द यशवंतराव 'स्वगृही' परत गेले. विधानसभेतील या पक्षाची आमदारसंख्या ४७ वरून ७ वर आली. काही काळ बेचैनीत गेले. आपण काँग्रेस (आय) विरुद्ध ठामपणाने उभे राहिले पाहिजे असे या पक्षाचे राष्ट्रीय अध्यक्ष श्री. शरद पवार यांनी ठरवले. त्यांनी आपल्या पक्षाच्या घटनेत दुरुस्ती करून समाजवादी काँग्रेस असे नामाभिधान घेतले. काँग्रेस पक्षाच्या घोषित धोरणांनुसार जनमत संघटित करण्यासाठी हा पक्ष आंदोलनात्मक कार्यक्रम हाती घेत असतो. राष्ट्रीय पातळीवर जनता व इतर समविचारी पक्षांशी सहकार्य करण्याचे त्या पक्षाचे सध्या धोरण आहे.

जनता पक्षाच्या ध्येयधोरणावर गांधीवादी–समाजवादी विचारांची छाप पडलेली आहे. धर्मनिरपेक्ष राष्ट्रवाद जोपासणे, नागरिकांच्या मूलभूत हक्कांचे जतन करणे व आर्थिक–सामाजिक समता स्थापन करण्यासाठी आमूलाग्र परिवर्तन घडवणे ही या पक्षाच्या धोरणाची प्रमुख वैशिष्ट्ये आहेत. राजकीय व आर्थिक सत्तेचे विकेंद्रीकरण व्हावे, आर्थिक नियोजनात शेती व ग्रामीण विकासाला अधिक महत्त्व मिळावे या कार्यक्रमांचा हा पक्ष पाठपुरावा करीत असतो. १९८० च्या पडघडीनंतरही महाराष्ट्रात हा पक्ष बळ धरून उभा आहे. जुन्या समाजवादी पक्षातल्या कार्यकर्त्यांबरोबरच संघटनाकाँग्रेस व राजारामबापूंबरोबर आलेले काँग्रेसवाले टिकून असून पूर्वी राजकारणात नसलेले अनेक कार्यकर्ते या पक्षाला मिळाले आहेत. ग्रामीण व शहरी भागांत अनेकविध सहकारी संस्था चालवणे, औद्योगिक कामगारांच्या संघटना चालवणे, महिलांच्या चळवळी– आदी कार्यक्रमांत या पक्षाचे कार्यकर्ते गुंतले आहेत. पश्चिम महाराष्ट्र व मराठवाड्यात या पक्षाचे काम चांगले असून विदर्भातही काही ठिकाणी या पक्षाने पाय रोवले आहेत. पक्षसभासद नोंदणी, पक्षांतर्गत निवडणुका, रीतसर अधिवेशने, कार्यकर्त्यांची अभ्यासशिबिरे होत असतात. काँग्रेस (आय) विरोधी पक्षांबरोबर सहकार्य करण्याचे या पक्षाचे धोरण आहे.

संघटना व्यवस्थित असण्याबाबत भारतीय जनता पार्टीची पहिल्यापासून ख्याती आहे. पक्षसभासद नोंदणी, पक्षांतर्गत निवडणुका ही कामे त्या पक्षात व्यवस्थित होत असतात. मुंबई-ठाणे-पुणे-नागपूर आदी शहरी भागाप्रमाणे विदर्भ व मराठवाड्यातील काही ग्रामीण भागात त्या पक्षाने पाय रोवले आहेत. जनता पक्षातून बाहेर पडताना 'गांधीवादी समाजवाद' हे आपले ध्येय राहील असे त्या पक्षाने जाहीर केले. या दोन्ही विचारधारांना त्यातील बहुसंख्य कार्यकर्त्यांचा पहिल्यापासून विरोध होता. जनता पक्षात फूट घडवणारांवर 'दलबदलू' म्हणून त्यांनी कडाडून टीका केली होती. काँग्रेस (आय)ला देशपातळीवर आमचाच खरा पर्याय बनेल असेही त्यांनी म्हटले होते. १९८२ त हरियाना विधानसभा निवडणुकीच्या वेळी त्यांनी लोकदलाबरोबर आघाडी केली. हे त्यांच्या अनेक कार्यकर्त्यांना व पाठीराख्यांना आवडले नाही. कर्नाटक, आंध्र, दिल्ली व जम्मू-काश्मीर येथील विधानसभा निवडणुकांत पराभव पत्करावा लागल्यानंतर एकाधिकारशाही व घराणेशाहीविरुद्ध लढण्यासाठी बिगर-कम्युनिस्ट पक्षांबरोबर सहकार्य करण्याची भूमिका त्यांनी घेतली. लोकदलाबरोबर त्यांनी राष्ट्रीय लोकशाही आघाडी बनवली. इतर पक्षांबरोबर सहकार्य करण्याची त्यांची घोषणा असली तरी स्वतंत्रपणे काम करण्यावरच या पक्षाचा भर आहे.

शेतकरी कामगार पक्ष हा महाराष्ट्रातील एके काळचा प्रमुख बिगरकाँग्रेसी पक्ष आता आकुंचन पावल्यासारखा झाला आहे. पक्षाने आपल्या दाभाडी प्रबंधात मार्क्सवादी विचारसरणी स्वीकारली होती. राजकीय चर्चेत ह्या पक्षाला विशेष रस नसतो. या पक्षाने पहिल्यापासून शेतमालाला किफायतशीर भाव बांधून मिळावेत यासारख्या शेतीविषयक प्रश्नांचा सातत्याने पाठपुरावा केला आहे. मुंबई-ठाणे परिसरातील मच्छिमारांची संघटना या पक्षाचे कार्यकर्ते चालवीत असून सांगली भागात काही काही कामगारसंघटनाही चालवतात. रायगड, कोल्हापूर, सांगली, सोलापूर, उस्मानाबाद, परभणी, अकोला, बुलढाणा आदी जिल्ह्यांत या पक्षाची केंद्रे आहेत. अन्य डाव्या पक्षांबरोबर सहकार्य करण्याचे या पक्षाचे धोरण आहे.








कम्युनिस्ट पक्षाला महाराष्ट्रात फारसे स्थान कधीच मिळाले नव्हते. मुंबईतील कामगारांच्या संघटनाबांधणीत या पक्षाचा सुरुवातीला मोठा वाटा होता. नागपूर-भंडारा भागातील विडी कामगार व अन्य कामगारसंघटना या पक्षाचे कार्यकर्ते चालवीत असत. हा पक्ष मार्क्सवादी विचारसरणी पूर्णतया प्रमाण मानतो. कामगार-वर्गच क्रांतीचे नेतृत्व करील हा सिधान्त ते प्रमाण मानतात व क्रांतीनंतर कामगारवर्गाची हुकूमशाही चालवावी लागेल असेही मानतात. अनेक युरोपीय देशांतील कम्युनिस्ट पक्ष उपरोक्त सिद्धान्तांचा फेर-विचार करीत असले तरी तसे करण्याची आम्हाला गरज वाटत नाही, असे भारतातील कम्युनिस्ट ठासून सांगत असतात. आंतरराष्ट्रीय क्रांतीचा नेता सोव्हिएट रशिया असून त्याचे हितसंबंध जपणे हे सर्व कम्युनिस्टांचे कर्तव्य आहे असे ते मानत असत. १९६२ नंतर चीनमधील कम्युनिस्ट पक्षाने व राजवटीने सोव्हिएट रशियाच्या नेतृत्वाला आव्हान दिले. भारतातील कम्युनिस्ट पक्षात त्यावरून फूट पडली. भारतीय कम्युनिस्ट पक्ष अद्यापही रशियाचे नेतृत्व मानतो. मार्क्सवादी कम्यु-निस्टांनी काही काळ चीनच्या कम्युनिस्ट पक्षाशी जवळीक दाखवली. नंतर त्यांनी रशिया व चीन दोन्ही कम्युनिस्ट पक्षांशी मैत्रीचे संबंध स्थापण्याचा प्रयत्न चालविला आहे. या दोन पक्षांच्या एकी-करणात रशियाचे नेतृत्व बिनतक्रार मानायचे की नाही यावरील मतभेद हीच महत्त्वाची अडचण आहे. महाराष्ट्रात भारतीय कम्युनिस्ट पक्ष बराच आकुंचन पावला आहे. मुंबई, नगर, कोल्हापूर, सोलापूर, औरंगाबाद, अमरावती, नागपूर, भंडारा आदी जिल्ह्यांत या पक्षाची केंद्रे आहेत.

मार्क्सवादी पक्षाचे कार्यकर्ते मुंबई, पुणे, कोल्हापूर, वर्धा, सोलापूर आदी ठिकाणी कामगारसंघटनांत काम करतात. ठाणे, नाशिक, धुळे, परभणी या भागांतही या पक्षाची केंद्रे आहेत. धुळे जिल्ह्यातील या पक्षाचे कार्यकर्ते बाहेर पडले असून त्यांनी सत्यशोधक मार्क्सवादी पक्षाची स्थापना केली आहे.

रिपब्लिकन पक्ष डॉ. आंबेडकरांची विचारसरणी प्रमाण मानतो. आंबेडकरांनंतर ध्येयधोरणांची नीट मांडणी करण्याचे काम कोणी केले नाही. या पक्षाच्या खोब्रागडेगटाला विदर्भात, गवईगटाला पश्चिम महाराष्ट्रात व कांबळेगटाला मुंबईत पाठिंबा आहे.

नक्षलवादी म्हणून ओळखल्या जाणारा कम्यु-निस्ट पक्ष (मार्क्सवादी-लेनिनवादी) महाराष्ट्रातही क्रियाशील आहे. मुंबई शहर व चंद्रपूर आणि नांदेड या जिल्ह्यांत त्याची काही केंद्रे आहेत. देशात या पक्षाचे सतरा गट असून महाराष्ट्रातही पाचसात गट आहेत असे बोलले जाते.

कामगारसंघटना ही राजकीय पक्षांची महत्त्व-पूर्ण आघाडी मानली जाते. स्वातंत्र्यपूर्व काळात पं. जवाहरलाल नेहरूंच्या नेतृत्वाखाली ऑल इंडिया ट्रेड युनियन काँग्रेस (आयटक) ही संघटना स्थापन केली होती. १९४२ च्या चलेजाव आंदोलनात काँग्रेस व समाजवादी नेते तुरुंगात अडकले असताना कम्युनिस्टांनी त्या संघटनेवर कबजा केला. १९४५ नंतर काँग्रेसने इंडियन नॅशनल ट्रेड युनियन काँग्रेस (इंटक) ही संघटना स्थापन केली. तिला मुंबईत व देशात इतरत्र चांगला पाठिंबा मिळाला होता. मुंबई राज्यात १९४८ साली करण्यात आलेल्या बाँबे इंडस्ट्रिअल रिलेशन्स ॲक्ट (बी आय आर) मध्ये किमान तीस टक्के कामगार ज्या संघटनेचे सभासद आहेत तिला प्रातिनिधिक संघटना म्हणून मान्यता देण्याची व कामगारांविषयीचे सर्व करार मान्यताप्राप्त संघ-टनेशीच करण्याची तरतूद करण्यात आली. या कायद्याच्या जोरावर इंटक व पर्यायाने काँग्रेसला कामगारचळवळीत आपले स्थान टिकवता येत आहे. १९४८ साली समाजवाद्यांनी काँग्रेसमधून बाहेर पडल्यावर हिंद मजदूर सभा ही संघटना स्थापन केली. प्र. स. पक्षातून लोहियागट बाहेर पडल्यावर त्यांनी हिंदमजदूर पंचायत ही संघटना स्थापन केली. लाल निशाण पक्षाने सर्व श्रमिक संघ ही संघटना चालवली आहे. जनसंघाने भार-तीय मजदूर संघ ही संघटना स्थापन केली होती. १९६४ साली कम्युनिस्ट पक्षात फूट झाल्यानंतर मार्क्सवाद्यांनी सेंटर फॉर इंडियन ट्रेड युनियन्स (सीटू) ही संघटना स्थापन केली. प्रजा समाज-वाद्यांपैकी काही जणांनी कामगार संघटना राजकीय पक्षांच्या नियंत्रणापासून मुक्त असाव्यात अशी भूमिका घेतली होती. मुंबईत आर. जे. मेहतांच्या

अनुक्रमणिका

कामगारसंघटना त्या पद्धतीने चालवायला सुरुवात झाली. जनता पक्षाच्या निर्मितीनंतर समाजवादी व संघटना काँग्रेस यांच्या नेतृत्वाखालील कामगारसंघटनांचे हिंदमजदूर सभेत एकत्रीकरण करण्यात आले. जनसंघवाल्यांनी आपला भारतीय मजदूर संघ मात्र वेगळाच ठेवला. जनता पक्षातून जॉर्ज फर्नांडीस वगैरे कार्यकर्ते लोकदलात गेल्यावर त्यांनी हिंदमजदूर किसान पंचायत ही संघटना सुरू केली. मध्यंतरी शिवसेनेनेही भारतीय कामगार सेना काढून पाहिली. श्री. दत्ता सामंत यांच्या नेतृत्वाखालील अपक्ष कामगारसंघटनांचा जोर गेल्या काही वर्षांत वाढला आहे. राजकीय पक्षांचे कामगार-संघटनेवर प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष नियंत्रण असले तर कामगारांना व्यापक ध्येयवादाची थोडी तरी शिकवण दिली जाते. पण राजकीय नेते कामगारसंघटनांचा आपल्या राजकीय स्वार्थासाठी दुरुपयोग करण्याचा संभव असतो. पक्षात फाटाफूट झाली की कामगार-संघटनांतही फाटाफूट होते हा आणखी एक तोटा होय; तर मुक्त, बिगर राजकीय कामगारसंघटना कमालीच्या अर्थवादी व बेजबाबदार बनण्याचा धोका असतो. सध्या मोठ्या औद्योगिक केंद्रांतील कामगारसंघटना या वरील दोन्ही प्रकारच्या दोषांनी ग्रस्त आहेत; तर छोट्या छोट्या शहरांतील कामगारसंघटना अतिशय क्षीण झाल्या आहेत.

शेतकरी-शेतमजुरांच्या संघटना बांधण्याचे प्रयत्नही स्वातंत्र्यपूर्व काळापासून होत आले आहेत. किसानसभा या संघटनेत पूर्वी काँग्रेसीय, कम्युनिस्ट व समाजवादी कार्यकर्ते काम करायचे. स्वातंत्र्य-प्राप्तीनंतरच्या काळात काँग्रेसने शेतकऱ्यांच्या संघटना बांधण्याचा प्रयत्न केला नाही. समाजवाद्यांनी हिंद किसान पंचायत काढली. शे. का. पक्ष, समाजवादी व कम्युनिस्ट यांनी शेतकरी व शेतमजुरांच्या प्रश्नावर अनेक चळवळी केल्या. पण स्थायी संघटना बांधण्याचा फारसा प्रयत्न झाला नाही. कम्युनिस्टांची किसानसभा व जनतापक्षीयांची शेतकरी शेतमजूर पंचायत महाराष्ट्राच्या काही भागांत काम करीत आहेत. लाल निशाण पक्षानेही नगर, सातारा, पुणे आदी जिल्ह्यांत शेतमजुरांना संघटित केले आहे. १९८० साली कांदा व उसाला योग्य भाव बांधून मिळावा या मागण्यांसाठी श्री. शरद जोशींच्या नेतृत्वाखाली चळवळ झाली व त्यातून शेतकरी संघटनेचा उदय झाला. तिने फक्त किफायतशीर भावाच्या प्रश्नावर आपले लक्ष केंद्रित केले असून नाशिक, नगर, पुणे, धुळे, परभणी, निपाणी अशा काही भागांत तिचे काम आहे.

पाणी हे समाजाच्या मालकीचे साधन असल्याने समता व न्यायाच्या दृष्टीने अधिकाधिक शेतकऱ्यांच्या शेतीला योग्य प्रमाणात सिंचनाची सोय उपलब्ध करून द्यावी या भूमिकेचा पाठपुरावा पुणे जिल्ह्याच्या पुरंदर तालुक्यातील पाणीपंचायत ही संघटना करीत आहे. शेतकऱ्यांनी स्वप्रयत्नांनी उपसा व अन्य प्रकारच्या सिंचनयोजनांची बांधणी करून त्या राबवाव्यात असा त्या संघटनेचा प्रयत्न आहे. काही चांगल्या योजना त्यांनी सुरू करून दाखवल्या आहेत. आपल्या कार्यक्रमाचा अधिक व्यापक प्रमाणावर प्रचार करता यावा यासाठी त्यांनी आपल्या संघटनेला राजकीय पक्षाचे स्वरूप दिले आहे.

आदिवासींत नवजागृती निर्माण करण्याच्या दृष्टीने म. गांधींच्या प्रेरणेने काही जणांनी काम सुरू केले होते. ठाणे, नाशिक, यवतमाळ, चंद्रपूर आदी जिल्ह्यांत काही सर्वोदयी कार्यकर्ते निष्ठापूर्वक काम करीत असत. अलीकडे त्यांची संख्या कमी झाली आहे. ग्राम स्वराज्य समिती धुळे जिल्ह्यात काम करीत असून छात्र युवा संघर्षवाहिनी यवतमाळ, अमरावती, नागपूर, सातारा, जळगाव, औरंगाबाद, परभणी आदी जिल्ह्यांत काम करीत आहे. विदर्भात चंद्रपूर व भंडारा जिल्ह्यात आदिवासींच्या स्वतंत्र संघटना काही काळ प्रबळ होत्या. आता त्या कमजोर झाल्या आहेत.

बहुतेक राजकीय पक्षांच्या महिला व युवक-आघाड्या आहेत. पण त्यांचे विशेष प्रभावशाली काम नाही. समाजवादी महिला सभा ही संघटना मात्र गेली वीसबावीस वर्षे सातत्याने विधायक व प्रबोधनात्मक काम करीत आहे.

रा. स्व. संघ ही संघटना देशव्यापी असून महाराष्ट्रातही बहुतेक भागांत आहे. राष्ट्रसेवादल ही संघटनाही टिकून असून मुंबई, पुणे, नगर, नाशिक, धुळे, जळगाव, रत्नागिरी, कोल्हापूर,



अनुक्रमणिका

सांगली, बीड, लातूर, परभणी, चंद्रपूर, नागपूर आदी जिल्ह्यांत तिचे काम चालते. महाराष्ट्राबाहेर मध्य प्रदेश, उत्तर प्रदेश, दिल्ली आदी भागांतही तिचा प्रसार होतो आहे.

रा. स्व. संघाच्या प्रेरणेने सुरू झालेली अखिल भारतीय विद्यार्थी परिषद ही संघटना सांस्कृतिक व राजकीय काम करीत आहे.

संसदबाह्य राजकीय काम करणारे अनेक छोटे छोटे गट व संघटना गेल्या काही वर्षांत अस्तित्वात आल्या आहेत. त्यांचे मुख्यतः दोन प्रवाह आहेत. एक परिवर्तनवादी व दुसरा सांप्रदायिक पुनरुज्जीवनवादी. १९६७ च्या सुमारास काही परिवर्तनवादी तरुणांचे गट काम करू लागले. युवक क्रांती दलाची स्थापना त्या सुमारास झाली. विद्यापीठातील भ्रष्टाचार वगैरे प्रश्नांवर त्यांनी आंदोलने केली. प्रबोधनाच्या कामावरही त्यांचा भर होता. पुढे त्यांनी स्वतःला राजकीय संघटना म्हणून घोषित केले. शेतमजुरांना संघटित करण्याचे काम त्यांनी काही ठिकाणी सुरू केले. १९७७ साली त्यांच्यातील काहीजण जनता पक्षात सामील झाले. धुळे जिल्ह्यातील शहादे भागात काही तरुणांनी श्रमिक संघटना या नावाने आदिवासी व शेतमजुरांचे लढे उभे केले. पुढे त्यांच्यातले काहीजण मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्षात सामील झाले. १९७२ च्या सुमारास मुंबईत काही दलित तरुणांनी दलित पँथर्स ही चळवळ सुरू केली. रिपब्लिकन पक्षातील गटबाजी, पुढाऱ्यांतील भांडणे व संधिसाधूपणा यांना विटलेल्या तरुणांनी दलितांचे सामाजिक व आर्थिक प्रश्न हिरीरीने मांडायला व स्वतंत्रपणे चळवळी उभारायला सुरुवात केली. हा हा म्हणता राज्यभर ती चळवळ पसरली. बहुतेक राजकीय पक्षांनी त्यांना सुरुवातीला प्रामाणिकपणे मदत केली. कम्युनिस्ट नेत्यांनी त्यांना जवळ ओढण्याचा प्रयत्न केला. १९७४ च्या मुंबईतील एका लोकसभा पोटनिवडणुकीच्या वेळी सत्ताधारी काँग्रेस पक्षानेही तसाच प्रयत्न केला. त्याच सुमारास शिवसेना व दलित पँथर्स यांच्यात तुफान दंगल झाली. काही काळ दलित पँथर्सनी आपला दरारा निर्माण केला. पुढे त्यांच्यात बरीच फाटाफूट झाली व विस्कळीतपणा आला. बीड, औरंगाबाद जिल्ह्यांत दलित युवक आघाडी ही संघटना निघाली. त्यांनी दलितांच्या जमिनीचे व शेतमजुरांचे प्रश्न हाती घेतले. साताऱ्याचे समाजवादी युवकदल वसतिगृह चालविणे यासारखे विधायक व सामाजिक विषमतेच्या, दलितांवर होणाऱ्या अत्याचारांच्या प्रश्नांवर आंदोलनात्मक कार्यक्रम करीत असे. पुढे रा. से. दलातून बाहेर पडलेल्या काही जणांबरोबर सहकार्य करून त्यांनी समता आंदोलनाची स्थापना केली. ठाणे जिल्ह्यात आदिवासींच्या आर्थिक प्रश्नावर चळवळ करणारी भूमिसेना मर्यादित क्षेत्रात चांगले बळ धरून उभी राहिली. फलटण भागात प्रबोधन मंडळ व लोक जागृती मंडळ संघटना जागृतीचे व चळवळीचे काम करीत आहे. पुण्याच्या मावळ—मुळशी भागात गरीब-डोंगरी संघटनाही अशाच प्रकारचे काम करीत आहे. काही ख्रिश्चन तरुणांनी ठाणे जिल्ह्यात कष्टकरी संघटना उभारण्यास सुरुवात केली आहे. तर नगर जिल्ह्यातही काही तरुण तसे कार्य करीत आहेत. असे असंख्य छोटे-छोटे गट वेगवेगळ्या क्षेत्रांत काम करीत आहेत.

पूर्वी समाजवादी पक्षात असताना डॉ. बाबा आढाव यांनी 'एक गाव एक पाणवठा' ही चळवळ सुरू केली होती. म. फुले समता प्रतिष्ठान या नावाने सुरू केलेल्या संघटनेमार्फत सामाजिक समतेच्या दृष्टीने अनेक उपक्रम चालतात. त्यांच्याच पुढाकाराने सुरू झालेली विषमता निर्मूलन समिती ही अशा प्रकारे काम करणाऱ्या गटांचे व व्यक्तींचे व्यासपीठ बनली आहे.

गेल्या तीनचार वर्षांत स्त्रीमुक्तीच्या प्रश्नाला वाहून घेतलेले काही गट मुंबई, पुणे, नागपूर, औरंगाबाद, सोलापूर आदी शहरांत काम करीत आहेत. त्यांचे एक राज्यपातळीवरील व्यासपीठ निर्माण होत आहे.

विशिष्ट आर्थिक आणि/किंवा सामाजिक प्रश्नांपुरते व मर्यादित प्रदेशात परिवर्तनाचे काम करण्याच्या हेतूने अस्तित्वात आलेल्या अनेक गटांपुढे प्रश्न निर्माण झाले आहेत. एकंदर समाजपरिवर्तनात राजसत्तेचे स्थान महत्त्वाचे असते व त्यासाठी देश किंवा किमानपक्षी राज्यपातळीवरील संघटना व कृती आवश्यक आहे हे त्यांच्यापैकी अनेकांना मान्य आहे. आपल्या मर्यादित लढ्यांसाठीही त्यांना

मधूनमधून राजकीय पक्षांची मदत घ्यावी लागते. पण बहुतेक पक्षांचे निवडणुकांवर लक्ष केंद्रित झालेले आहे. त्यासाठी ते धरसोडपणा वा संधिसाधूपणा करतात, आपल्या तत्त्वांना-विचारांना मुरड घाल-तात, काही जण भ्रष्टाचारही करतात– या त्यांच्या-तल्या दोषांमुळे राजकीय पक्षापासून चार हात लांब रहावे अशी त्यांच्यात प्रवृत्ती दिसून येते. त्यांना जाणवणारे दोष राजकीय पक्षांत नाहीत असे नाही. व्यापक संघटन राजकीय पक्षाशिवाय बांधणे अवघड असल्याने त्यात राहून व दोषांशी सामना देत देत परिवर्तनवादी शक्ती संघटित केल्या पाहिजेत, हा विचार त्यांच्यापैकी अनेकजण तत्त्वतः कबूल करतात; पण व्यवहारात नाकारतात. शिवाय फाटाफूट, संधिसाधूपणा या दोषांपासून तर क्रांति-कारकांचे हे छोटे गटही स्वतःला पूर्णतया वाचवू शकतातच असे नाही. त्यांच्यातही या दोषांचा प्रादुर्भाव तितक्याच सहजतेने होतो असे आढळून आले आहे.

दुसरा प्रवाह आहे सांप्रदायिक-पुनरुज्जीवनवादी संघटना-गटांचा. हिंदू व मुस्लिम दोन्ही जमातींत हे गट वाढत आहेत. जमाते-इस्लामी ही कट्टर पंथीयांची संघटना निवडणुकात भाग घेत नसली तरी तिला राजकारणात रस आहे. तिची युवक आघाडी जमियत-उल-तुलना या नावाने काम करते. धर्मप्रसार हा हेतू असलेल्या मुस्लिमांच्या आणखीही अनेक संघटना आहेत. त्यांचा प्रचार इस्लाम धर्माला बळकटी आणण्याच्या हेतूने केला जातो. मुस्लिम समाज अल्पसंख्याक असून तो बंदिस्त असल्यासारखा वागतो. पाकिस्ताननिर्मि-तीच्या पार्श्वभूमीमुळे त्यांच्या हालचालींकडे अन्य समाज संशयाने पाहतो. त्यांच्या हालचाली धर्म-संस्थांच्या परिसरात होत असल्याने व उर्दू किंवा अरेबिक भाषांचा वापर केला जात असल्याने इतरांना त्यांच्या हालचालींचे स्वरूप नीट समजत नाही व त्यामुळे संशय वाढत जातो. अरबांचा पेट्रोल-पैसा भारतात मोठ्या प्रमाणावर येतो आहे व त्याचा त्यांच्या सांप्रदायिक संघटना वाढविण्यासाठी उपयोग केला जातो, असेही इतरांना वाटते आहे. हमीद दलवाईंनी स्थापन केलेल्या मुस्लिम सत्य-शोधक समाजाच्या व जोहरा समाजातील सुधारणा-वाद्यांच्या प्रयत्नांना कट्टरपंथीयांचा विरोध होत असतो. इराणमध्ये अयातुल्ला खोमेनीची राजवट सुरू झाल्यापासून मुस्लिम पुनरुज्जीवनवादाची लाट जगभर पसरली आहे. महाराष्ट्रात त्या अनुषंगाने मुस्लिम स्त्रियांनी सिनेमा पाहू नये असे दंडक घाल-ण्याचा प्रयत्न झाला. इतिहासाच्या पुस्तकातील काही उल्लेख किंवा कुसुमाग्रजांची 'शिवशंकरा' ही कविता– यांना कट्टरवादी मुसलमानांनी आक्षेप घेतला व शासनाने त्यांना खूष करणारे आदेश काढले. राज्यकर्ते मुसलमानांचे लांगूलचालन करतात व त्यामुळे ते अधिकच शेफारू लागले आहेत अशी भावना हिंदुसमाजात बळावत जाऊ लागली आहे. काही सुशिक्षित मुस्लिम तरुण अशा कट्टर पंथीयांना विरोध करून पुरोगामी शैक्षणिक व सांस्कृतिक कार्यक्रम करत असतात ही त्यातल्या त्यात दिलासा देणारी गोष्ट आहे.

सांगली–सातारा जिल्ह्यात सातआठ वर्षांपूर्वी हिंदु एकता आघाडी ही संघटना निर्माण झाली. हिंदूंचे संघटन करणे हा तिचा घोषित उद्देश असला तरी मुस्लिमद्वेष हा तिचा मुख्य दृष्टिकोन आहे. कार्यक्रमही त्याच प्रकारचे घेतले जातात. बहुजनसमाजातील तरुणांचा या संघटनेत भरणा आहे. शंकराचार्यांची पूजा यासारख्या कार्यक्रमातही ते सहभागी होतात. पुणे भागातील पतित पावन संघटनेचे स्वरूपही त्यासारखेच आहे. दलितांच्या राखीव जागांना विरोध करण्याचे त्या संघटनेचे धोरण आहे. १९७९ साली गुजरातेत राखीव जागाविरोधी आंदोलन झाले. महाराष्ट्रात त्या वेळी स्थापन झालेल्या मराठा महासंघाने राखीव जागा-विरोधी कडवा प्रचार सुरू केला. शैक्षणिक व नोकरीविषयक सवलती आर्थिक मागासलेपणाच्या कसोटीवर ठेवाव्यात असे त्यांचे म्हणणे आहे. असा दृष्टिकोन कोणी मांडण्यात काही गैर नाही. पण मराठा महासंघ तेवढे करून थांबत नाही. अनेक बाबतीत तो एकांतिक व आक्रमक भूमिका घेतो आहे. मुस्लिमविरोधी कार्यक्रमांना त्यांचा पाठिंबा असतो. मंडल आयोग शिफारशींना विरोध करताना त्या आयोगाच्या अहवालाचे वर्णन 'औरंगजेबानंतर मराठ्यांवर होत असलेले दुसरे आक्रमण' अशा शब्दांत केले जात आहे.

'जय शिवाजी जय भवानी' ही त्यांची मुख्य घोषणा आहे.

विश्व हिंदु परिषद हे एक असेच पुनरुज्जीवनवादी व्यासपीठ आहे. तामीळनाडूत काही खेड्यांत दलितांनी हिंदुधर्माचा त्याग करून इस्लामचा स्वीकार केला. त्या धर्मांतराविरुद्ध वि. हिं. परिषदेने देशभर मोहीम उघडली. हिंदू किंवा वैदिक धर्माची थोरवी कशात आहे हे सांगण्याऐवजी अरबी पैशाच्या जोरावर ही धर्मांतरे घडवून आणली जात आहेत असा प्रचार करण्यात आला. जनजागरण पंधरवडा पाळला गेला. त्यात 'धर्मांतर म्हणजे राष्ट्रांतर' ही घोषणा ठासून सांगण्यात आली. धर्म व राजकारण यांची विनाकरण गल्लत करण्यात आली. परधर्मीयांचा द्वेष हेच त्या सर्व मोहिमेमागील महत्त्वाचे सूत्र होते. अशा उपक्रमांमुळे समाजसुधारणा, धर्मसुधारणा किंवा निव्वळ धर्मप्रचार असे काहीही न होता धर्मभावनेच्या आधारावर फक्त पिसाटपणा वाढविला जातो. या चिंताजनक व हानिकारक प्रवृत्ती आहेत.

देशाच्या व महाराष्ट्राच्या राजकारणात अशा अनेक अनिष्ट प्रवृत्ती वाढत आहेत. समाजाचा कारभार लोकशाही पद्धतीने चालायचा तर निश्चित विचारसरणी व सुस्पष्ट धोरणे यांवर आधारलेल्या राजकीय पक्षांची नितांत आवश्यकता आहे. राजकीय पक्षांत शिरलेल्या दोषांमुळे एकूण 'राजकीय पक्ष' या संकल्पनेबद्दल व संज्ञेबद्दल हेटाळणीची भावना जोपासली जात आहे. वृत्तपत्रांतून सत्तास्थानांच्या संदर्भात चाललेल्या कारस्थानांच्या व हालचालींच्या अतिरंजित बातम्या दिल्या जातात. भडकपणा सगळीकडेच वाढला आहे. वृत्तपत्रे, कादंबऱ्या, कथा, नाटक, सिनेमा आदी संचार किंवा संवादमाध्यमांतून राजकारणातील अपप्रवृत्तींचे प्रमाणाबाहेर चित्रीकरण केले जात आहे. उदात्त ध्येयवाद उराशी बाळगून आपले सर्वस्व त्यासाठी पणाला लावणारे कार्यकर्ते आजही नाहीत असे नाही. त्यांचे अस्तित्व नजरेआड करून केले जाणारे राजकारणाचे वर्णन समाजाला हानिकारक ठरणार आहे. मध्यमवर्ग किंवा बुद्धिजीवी वर्ग हाही राजकीय पक्षांबद्दल हेटाळणीची, किंबहुना तुच्छतेची भावना बाळगून असलेला दिसतो. बिकट होत चाललेले आर्थिक प्रश्न व वाढत चाललेली बेबंदशाही यामुळे परिवर्तनासाठी किंवा न्याय मिळविण्यासाठी सामूहिक कृती करण्याऐवजी लाचारीने सत्ताधाऱ्यांचे लांगुलचालन करण्याची प्रवृत्ती शिकलेले–बिनशिकलेले– या सगळ्यांतच वाढत असलेली दिसते. नैतिक मूल्यांची घसरण सर्व क्षेत्रांत पसरली आहे.

याचा अर्थ देशात किंवा महाराष्ट्रात लोकशाही पद्धतीने परिवर्तनवादी शक्ती संघटित करणे अशक्य आहे असा मात्र नाही. भारतीय जनता तशी शहाणी आहे, चांगल्या-वाईटाचा विचार करून योग्य निर्णय घेण्याची क्षमता तिच्या ठायी आहे. महाराष्ट्रात तर त्या दृष्टीने बरीच जुनी शे-दीडशे वर्षांची परंपरा आहे. परिवर्तनवाद्यांना राजकीय शक्ती संघटित करण्यासाठी फार कष्ट करावे लागणार आहेत इतकेच.



# महाराष्ट्रातील लघु व मध्यम उद्योगांत मराठी तरुण

भा. र. साबडे

महाराष्ट्रातील लघु व मध्यम उद्योगांतील मराठी तरुणांसंबंधी लिहिताना प्रथम अडचण येते ती ही, की कोणाला 'मराठी तरुण' म्हणावे ? महाराष्ट्रीय हा शब्दही आता व्यापक अर्थाने वापरावा असा संकेत रूढ झाला आहे. त्यामुळे "महाराष्ट्रात राहून जो आपला चरितार्थ चालवितो तो महाराष्ट्रीय" अशी व्याख्या करण्यात आलेली दिसते. त्याचप्रमाणे महाराष्ट्राला आपली मायभूमी व कर्मभूमी मानणाऱ्या, महाराष्ट्राच्या इतिहासाशी व परंपरेशी समरस होणाऱ्या, तिचा अभिमान बाळगणाऱ्या व आपल्या उद्योगाचे फळ येथेच साठविणाऱ्या माणसाला महाराष्ट्रीय म्हणावे ही दुसरी व्यापक व्याख्या. पूर्वी जो माणूस मराठीतून किंवा वालचंद म्हणत त्याप्रमाणे मोडीतून आपले व्यवहार करतो, अशी याला एक पुस्ती दिली जात असे. पण आता असे व्यवहार करणे व्यावहारिकदृष्ट्या अशक्य झाले आहे. सर्व व्यवहार इंग्रजीतून होतात. मोडी तर आता कोणाला वाचताही येत नाही. तेव्हा याचा आग्रह धरणे योग्य होणार नाही.

वरील सर्व व्याख्या सत्य व शास्त्रशुद्ध आहेत. हल्लीच्या काळात प्रांताभिमान, भाषाभिमान किंवा जातींचा उल्लेख करणेही बरोबर होणार नाही. पण ही ढोबळ व्याख्या लोकांच्या भावनेला भिडत नाही हे खरे. म्हणून वस्तुस्थितीच्या संदर्भात बोलायचे झाले म्हणजे अशी व्याख्या धरून न बोलता जुन्या समजुतीला धरून बोलणे, मराठी भाषिकांच्या दृष्टीनेच विचार करणे योग्य होणार आहे. कारण त्याखेरीज खऱ्या वस्तुस्थितीच्या संदर्भात आपण विचार करतो असे होणार नाही.

याचे एक कारण असे वाटते, की महाराष्ट्रात आलेले मारवाडी, गुजराथी, सिंधी, पंजाबी कित्येक पिढ्या येथे राहूनही त्यांचे मराठी समाजाशी रोटीबेटीचे संबंध न आल्याने त्यांची विभिन्नता कायम राहिली नि येथे आल्यापासून व्यापार-उद्योग बहुतांशी त्यांच्या ताब्यात राहिल्यामुळे महाराष्ट्रीय, गुजराथी, मारवाडी इत्यादी भेद महाराष्ट्रात कायम राहिले. त्यामुळे अनेक पिढ्या येथे असूनही 'महाराष्ट्रीय' या शब्दात या सर्व परप्रांतीयांचा समावेश करावा हे अजून आपल्या मनाला पटत नाही.

शिवाय महाराष्ट्रीयांची व्यापक व्याख्या एकदा स्वीकारावयाची म्हटल्यावर मग उद्योगातील तरुण माणसे एवढ्यावरच विचार करता येईल. 'मराठी तरुण' यावर काही जोर देऊन लिहिता येणार नाही. मग लेखाची व्याप्ती महाराष्ट्रातील मध्यम व लघुउद्योगधंदे एवढीच होईल. अशा कृत्रिम व्याख्येमध्ये न अडकता ज्यांना आपण मराठी भाषिक म्हणतो अशी तरुण माणसे उद्योगांत कितपत आहेत, त्यांची कर्तबगारी काय आहे याचा विचार करणे हे या लेखाचे उद्दिष्ट मानून पुढे या संदर्भात काही विचार मांडण्याचा प्रयत्न केला आहे.

महाराष्ट्रात व्यापार नि उद्योगांत इतर प्रांतीयांचे वर्चस्व आढळते हे काही नाकारता येणार नाही. मुंबईतील उद्योगधंदे पारशी, गुजराथी नि मारवाडी यांच्या भांडवलाने नि कर्तृत्वाने स्थापन होऊन महाराष्ट्रीय लोक तेथे बहुतांशी मजूर नि कारकून झाले आहेत. तीच गोष्ट महाराष्ट्राच्या सर्व नव्या औद्योगिक केंद्रांतून दिसून येते. याला एक अर्थ आहे व त्यासाठी इतिहासात जाऊन थोडा मागोवा घेतला पाहिजे.

'महाराष्ट्रीय' असा लौकिकदृष्ट्या समजणारा किंवा आपणास तसे समजणारा असा वाणीसमाज आपल्याकडे नाही. फक्त कोकणी वैश्य हा एक







अनुक्रमणिका

लहान वर्ग कोकणात दिसतो. मागे कै. धनंजयराव गाडगिळांनी मराठी माणसांची आडनावे पाहून इतर प्रांतांप्रमाणे व्यापार किंवा धंदेवाचक एकही आडनाव मराठी समाजात नाही हे दाखवून दिले होते. जुन्या कागदपत्रांतून पेशव्यांचे वकील निजामाच्या शरीरयष्टीचे वर्णन बारकाव्याने करताना दिसतील; परंतु त्या राज्यातील बाजारपेठा, व्यापारउदीम, आर्थिक व्यवहार, व्यवसाय यांबद्दल लक्ष द्यावे, ती माहिती पुरवावी असे त्यांना बिलकूल वाटणार नाही. व्यापार-उद्योगाची परंपरा आपल्याकडे नाही, व्यापारी संस्कार नाहीत किंबहुना व्यापार नि उद्योग ही पुरुषार्थ दाखविण्याची क्षेत्रे आहेत याचा आपल्याला विसर पडला. त्यामुळे काशी–रामेश्वरापर्यंत जाऊन अजिंक्यपत्रे मिळविणाऱ्या पंडितांच्या आख्यायिका आपण वाचतो, शिपाईगिरीची मर्दुमकी आपण वाचतो, राजकीय चळवळीतील नेतृत्व करणाऱ्या, देशासाठी फासावर जाणाऱ्या देशभक्तांच्या गोष्टी आपण ऐकतो; पण मराठी व्यापारी सौदागराने परदेशी जाऊन काही व्यापारी कसब दाखविले आहे याची चुकूनही एखादी गोष्टदेखील आपल्या नजरेला इतिहासात येत नाही.

नाही म्हणायला 'सावकारी' करणारी रास्ते, भिडे, तांबवेकर, पटवर्धन, गद्रे, अनगळ अशी बरीच मराठी कुटुंबे पेशवाईत होती. पण यातही मराठी सावकारीचे स्वरूप एकांगी व फक्त सरकारी व्यवहारावर अवलंबून होते; व्यापारावर नाही. त्यामुळे परप्रांतीय सावकार नि सराफ आल्यावर हळूहळू ही सावकारीही कमी कमी होत गेली.

याच सावकारीतून गुजराथी पुढे व्यापारात गेले, त्यातून भांडवलाच्या जोरावर ते उद्योगात गेले. पण ही प्रक्रिया महाराष्ट्रात घडली नाही. त्यामुळे महाराष्ट्रात असे एकही खेडे नाही, की जेथला व्यापार मारवाडी किंवा गुजराथी व्यापाऱ्याच्या हातात नाही. महाराष्ट्र जर सोडला तर भारतात असा एकही प्रांत नाही, की जेथील सर्व व्यापार परप्रांतीयांच्या हाती आहे. ही घटना जशी विस्मयजनक तशीच अनर्थकारक. त्यामुळे समाज एकांगी बनला नि आर्थिक व्यवहाराची इष्ट वाढ झाली नाही.

याचीच फळे आज आपण भोगतो आहोत. दुर्दैवाने आपण काय गमाविले आहे याची जाणीवही महाराष्ट्रीय समाजाला नाही. इतिहासाच्या जुन्या नि रम्य स्वप्नातच तो आहे. वास्तवतेचे भान त्याला नाही.

त्यामुळे उद्योगात मराठी तरुण म्हटल्यावर दुर्बिण घेऊनच संशोधनास बाहेर पडावे लागते. वेचून टिपून माणसे काढावी लागतात. हे एका अर्थाने दुर्दैव आहे. तरी गेल्या वीस–पंचवीस वर्षांत विशेषतः महाराष्ट्र राज्य झाल्यापासून व्यापारात नाही तर निदान उद्योगांत मराठी माणसे मोठ्या (म्हणजे पूर्वीपेक्षा) प्रमाणात येऊ लागली आहेत, हे मान्य केले पाहिजे.

१९६० साली पुण्याच्या वसंत व्याख्यानमालेत बोलताना श्री. शंतनुराव किर्लोस्कर ह्यांनी मराठी माणूस व्यापार-उद्योगाला महत्त्व देत नाही, आपली मुलगी द्यावयाची तर तो सरकारी वरिष्ठ नोकराचा विचार करील, स्थिर उत्पन्नाचा विचार करील, पण होतकरू तरुण कारखानदाराचा विचार करणार नाही अशी तक्रार केली होती. पण आता ही वृत्ती पालटली आहे हे मान्य केले पाहिजे. कारखानदारीला समाजात प्रतिष्ठा प्राप्त झाली आहे. कोणत्याही तरुण उद्योजकाकडे कौतुकाने पाहिले जाते, अभिमानाने पाहिले जाते हे मान्य केले पाहिजे. दुर्दैवाने तीच प्रतिष्ठा व्यापाऱ्याला मात्र मिळाली नाही.

मराठी तरुण मोठ्या संख्येने उद्योगक्षेत्रात येण्याची अनेक कारणे आहेत. एक तर मोठ्या कारखान्यांची जशी वाढ होऊ लागली, तशी त्यांना लागणाऱ्या मालाचा पुरवठा करण्यासाठी अनेक पूरक उद्योगांची गरज भासू लागली. विशेषतः किर्लोस्करांसारख्या कंपन्यांनी तरुण उद्योजकांना हेतुपुरस्सर उत्तेजन देण्याचे धोरण ठेवल्यामुळे त्यांच्या कारखान्याच्या आसपास अनेक लहान उद्योगधंदे उभे राहिले. कारखान्यांत काम करणारे कुशल तंत्रज्ञ, इंजिनिअर ह्यांनाही स्वतःचा कारखाना काढण्यासाठी प्रसंगी किर्लोस्करांनी उत्तेजन दिले, त्यांना भांडवल पुरविले, तंत्रज्ञान दिले. त्यामुळे ही लहान मराठी माणसे उभी राहू शकली. हेच धोरण नंतर आलेल्या अनेक मोठ्या कारखान्यांनी स्वीकारल्या-

मुळे छोटया भांडवलातून स्वतःचा लहान उद्योग उभा करून तो यशस्वीपणे चालविणारे अनेक तरुण उद्योजक उभे राहिले. त्यांना मिळालेले यश, मान, सुस्थिती पाहून 'डेमॉन्स्ट्रेशन इफेक्ट' पद्धतीने याची लागण झाली नि आणखी बरेच तरुण उभे राहिले.

आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे सरकारी उत्तेजन. ज्या उद्योजकांकडे पुरेसे भांडवल नाही पण तंत्रज्ञान आहे, अशांना त्यांचा पैसा नसतानाही कर्जे देण्याचे धोरण बँकांनी नि इतर आर्थिक संस्थांनी स्वीकारले. लहान उद्योगांना कमी व्याजदर, हप्ते-बंदीने यंत्रसामग्री, सरकारी मालखरेदीत त्यांना अग्रक्रम अशा अनेक योजनांमुळेही लहान नि मध्यम उद्योगांना उत्तेजन मिळाले आहे हे नाकारता येणार नाही.

यामुळे ज्यांच्याकडे पूर्वी कोणीही कोणता उद्योग किंवा व्यवसाय केला नाही अशा घराण्यातील अनेक कर्तबगार उद्योजक आता नव्याने कारखाने काढताहेत नि ते यशस्वी करून दाखवीत आहेत. त्यांपैकी कोणी शाळामास्तरांचा मुलगा आहे, कोणी सरकारी अधिकाऱ्याचा. त्यांच्या घराण्यात विद्येची परंपरा आहे, पण व्यवसायाची नाही. पण आता आसपास पाहून नवीन पिढी नवीन महत्त्वाकांक्षा मनाशी धरून नव्या उद्योगांत यशस्वी पावले टाकीत आहे. अशी एक ना दोन शेकडो उदाहरणे पुण्यामुंबईच्या परिसरांत दिसत आहेत.

हे तरुण उद्योजक मुख्यतः तंत्रज्ञ आहेत आणि इंजिनिअरिंग, रसायने, इलेक्ट्रॉनिक्स, यंत्रमाग, निरनिराळी शास्त्रीय उपकरणे, मशिन टूल्स इत्यादी उत्पादननिर्मितीच्या व्यवसायांत आहेत. साधारणपणे असे दिसते, की मराठी तरुण हा निर्मितिक्षम आहे, त्याला निर्मितीचा आनंद हवा असतो. त्यामुळे ताबडतोबीने काही उलाढाल करून ज्यात एकदम पैसे मिळतात अशा व्यवसायात त्याचे मन रमत नाही असे दिसते. त्यामुळे प्रिसिजन टूल्स, इलेक्ट्रॉनिक्सची उपकरणे, निरनिराळी नवनवी यंत्रसामग्री अशा कुशल वस्तू बनविण्याकडेच त्याचा कल दिसतो नि त्यामुळे अशा व्यवसायांत मोठ्या संख्येने मराठी तरुण शिरले आहेत. याचे आणखीही कारण असे आहे, की अशा काही उद्योगांना तंत्रकुशलतेची जोड आवश्यक असते. त्यांत पुरेसा फायदाही असतो. शिवाय इलेक्ट्रॉनिक्ससारख्या उद्योगात सुरुवातीला भांडवल कमी लागते; पण आपल्या तंत्रज्ञानाची भर टाकून पुरेसा फायदा मिळविता येतो. त्यामुळे इलेक्ट्रॉनिक्सच्या व्यवसायांत फार मोठ्या प्रमाणात मराठी तरुण शिरलेले दिसतात. येथेही इलेक्ट्रॉनिक्सला लागणाऱ्या सुटया भागांच्या उत्पादनात मराठी माणसे अभावानेच आहेत. कारण त्याला बरेच भांडवल लागते. पण असेंब्ली, डिझाइन या क्षेत्रांत मराठी माणसे पुष्कळच आहेत.

प्रादेशिक दृष्ट्या पाहिले तर असे दिसते, की पश्चिम महाराष्ट्र व मुंबई येथे मराठी तरुणांचे प्रमाण खूप आहे. अर्थात मुंबई शहर व परिसर येथे परप्रांतीय व बहुराष्ट्रीय मोठ्या कंपन्यांचे प्रमाण बरेच असल्याने मराठी तरुणांचे उद्योगांतील प्रमाण खूपच कमी आहे. तरी पण बहुतेक मराठी माणसांची वाढ मुंबईच्या परिसरात झाली आहे व पूर्वीपेक्षा खूपच मोठ्या प्रमाणात मराठी तरुण लहान व मध्यम उद्योगांत शिरत आहेत ही गोष्ट निर्विवाद.

मुंबईपेक्षा अशा तरुणांचे मोठे प्रमाण दिसते ते पुणे परिसरात नि पश्चिम महाराष्ट्रात– विशेषतः कोल्हापूर, इचलकरंजी भागात. सुशिक्षित मराठी तरुण, तंत्रज्ञ पुणे भागात मोठ्या संख्येने उद्योगात शिरले आहेत नि यशस्वीपणे उद्योग चालवीत आहेत. कोल्हापूर, इचलकरंजी भागात तर सर्वस्वी मराठी उद्योजकांचा किंबहुना मोठ्या प्रमाणात त्यांचा भरणा दिसतो. तेच कमीजास्त प्रमाणात सातारा, कराड, सांगली या भागांत. पण पश्चिम महाराष्ट्राचा हा भाग सोडला तर महाराष्ट्राच्या इतर भागांत मात्र अजून इतर मंडळींचे प्रमाण जास्त आहे व मराठी उद्योजक अभावानेच तेथे दिसतात.

यांपैकी काही मराठी तरुणांनी फार चांगले नाव मिळविले आहे. व्यवसायाची मोठ्या प्रमाणात वाढ केली आहे. निर्यातीच्या क्षेत्रात पाऊल टाकले आहे, परदेशात स्वतःचे प्रकल्प उभे केले आहेत. त्यांच्या कर्तबगारीला मोठे कार्यक्षेत्र मिळाले आहे.

याच बरोबरीने मराठी तरुण उद्योजकांचे कारखाने आजारी होणे किंवा ते बंद पडणे याचेही प्रमाण वाढते आहे व हे कारखाने एकापाठोपाठ परप्रांतीयांच्या हातांत जात आहेत हेही मान्य केले पाहिजे. आकडेवारीने ही गोष्ट सिद्ध करता येणे कठीण आहे. पण इतर परप्रांतीय भांडवलदारांपेक्षा मराठी उद्योजकांचे प्रकल्प फसण्याचे, ते तोटयात जाण्याचे प्रमाण वाजवीपेक्षा जास्त आहे हे मान्य केलेच पाहिजे. याची कारणे शोधून त्यांवर इलाज करणे आवश्यक आहे.

येथे दोन गोष्टी सांगता येतील. एक म्हणजे पैशाचे व्यवस्थापन कसे करावे, तो चांगल्या तऱ्हेने कसा वापरून फायदा मिळवावा हे जसे मारवाडी लोकांच्या रक्तात आहे तसे आपल्या रक्तात नाही. त्यामुळे अनेक ढोबळ, भोंगळ चुका होऊन कारखाना अडचणीत येतो, शेवटी तो दुसऱ्यांना विकावा लागतो. याचा तपशील खूप सांगता येईल. पण याबाबतीत बहुतेकांचे दुर्लक्ष झाल्याने ते शेवटी आर्थिक अडचणीत येतात नि मग कारखानाच विकावा लागतो ही वस्तुस्थिती आहे.

दुसरे कारण म्हणजे कारखान्याचे उत्पादन जरी या उद्योजकांच्या हाती असले तरी वितरण त्यांच्या हाती नाही. या वितरणात-व्यापारातच खरा फायदा असतो. अजूनही बऱ्याच मराठी कारखानदारांचे वितरण इतर प्रांतीयांच्या हातीच दिसते. याकडे दुर्लक्ष केल्यामुळे खरा मलिदा दुसऱ्याला, काम नि कष्ट मात्र मराठी उद्योजकाच्या वाटयाला अशी स्थिती झाली आहे. गोड बोलणे, विक्री करणे, त्यासाठी व्यावहारिक तडजोड करणे हे आपल्या मंडळींच्या स्वभावात नसल्याने व्यापाराचे क्षेत्र अजून मराठी माणसांकडून उपेक्षित आहे.

आणखी एक कारण म्हणजे बहुतेक मराठी माणसांची आत्मसंतुष्ट वृत्ती. थोडा पैसा मिळाला, स्वतःचा बंगला झाला, मोटार मिळाली की ते ढेपाळतात. पुढे कष्ट करण्याची उमेद नाहीशी झाल्याची ( नाटके, गाणी व इतर छंद यांच्याच मागे लागतात अशीही ) उदाहरणे अनेक दाखविता येतील. पण उद्योगाच्या क्षेत्रात 'थांबला तो संपला' असे आहे. काळाबरोबर तुम्ही पळाला नाहीत तर काळ तुम्हाला क्षमा करणार नाही. त्यामुळे गेल्या वीस वर्षांत जे मराठी तरुण उद्योगांत शिरले आहेत त्यांपैकी अगदी हाताच्या बोटांवर मोजता येतील अशा लोकांनी खऱ्या अर्थाने व्यवसायाची वाढ करून नाव मिळविले आहे. बाकीचे तेथेच थांबले आहेत किंवा त्यांच्या ऱ्हासास तरी सुरुवात झाली आहे. विशेषतः पहिल्या पिढीतल्या मराठी उद्योजकांनी कष्ट करून उद्योग उभे करावेत व पुढील पिढीतील तरुण मुलांनी दारूची एजन्सी मिळवून किंवा थिएटरे बांधून व्यवसायाचा विस्तार थांबवावा किंवा आहे त्यावर खूष असावे अशीही उदाहरणे आढळतात.

त्यामुळे मराठी तरुण जरी मोठया संख्येने लघु व मध्यम उद्योगांत आले असले, तरी ते स्थिर झाले आहेत असे म्हणता येणार नाही.

या सर्व विश्लेषणाचा अर्थ परप्रांतीय उद्योजकांचा दोष आहे असे नाही. उलट त्यांच्यातील गुणांचा, त्यांच्या व्यवस्थापनकौशल्याचा, त्यांच्या कारभारपद्धतीचा अभ्यास करून तरुण मराठी उद्योजकांनी आपले व्यवसाय सुधारले पाहिजेत, ते वाढविले पाहिजेत नि या क्षेत्रातील आपली कर्तबगारी दाखविली पाहिजे असेच म्हणता येईल. उद्योगाची नवी परंपरा आपल्या समाजात सुरू होते आहे. ती काळजीपूर्वक जोपासून वाढविणे ही काळाची गरज आहे.



अनुक्रमणिका

# महाराष्ट्रातील बदलता दलित तरुण

अर्जुन डांगळे

समाज हा नेहमी गतिशील असतो. काळानुसार समाजात बदल हा स्वाभाविक असतो. ती एक प्रक्रिया असते. नवे ज्ञानविज्ञान, नवी मूल्ये, चळवळी आणि समूहमनाचा सर्जनशील आविष्कार हे त्यातील काही घटक होत. ह्या पार्श्वभूमीवर माणूस जेव्हा व्यक्तिगत पातळीवर व्यक्तित्वाचा शोध घेतो आणि सामाजिक पातळीवर जेव्हा अस्मितेचा शोध घेतो, तेव्हा त्या व्यक्तीत किंवा समाजात बदलाच्या प्रक्रियेला प्रारंभ होतो. ह्या चिंतनाला जेव्हा वैचारिक बैठक मिळते आणि ही वैचारिकता जेव्हा समाजमनाची पकड घेते, तेव्हा ती ऊर्जेत रूपांतरित होऊन बदलाला एक वेग मिळतो.

भारताच्या किंवा महाराष्ट्राच्या सामाजिक इतिहासाचा मागोवा घेतल्यास ब्रिटिशांचे भारतात आगमन म्हणजे ह्या बदलाचा प्रारंभ होय. रानडे, फुले, लोकहितवादी, आगरकर ह्यांच्या परिवर्तनवादी विचारांवर ब्रिटिशांचा माणसाकडे पाहण्याचा जो दृष्टिकोण होता त्याचा परिणाम तर झालाच; परंतु त्यांच्या प्रतिपादनाला ह्यातूनच नैतिक बळ मिळाले. ब्रिटिशांच्या अगोदर महाराष्ट्रात बदलाचे विचार आलेच नाहीत, असे नाही. उदाहरणार्थ, संतांनी जी भूमिका घेतली होती ती आध्यात्मिक आणि धार्मिक पातळीवरची होती. धार्मिक, सामाजिक विषमतेच्या वरवंट्याखाली दडपल्या गेलेल्या प्रचंड जनसमूहाच्या भौतिक परिस्थितीत त्यामुळे काडीमात्र बदल झालेला दिसत नाही. तत्कालीन उत्पादन आणि उपजीविकांची साधने हे त्याचे एक कारण असले तरी अस्तित्वात असलेल्या राजेरजवाड्यांनी किंवा सरंजामदारांनी तो स्वीकारून दरबारात आणला नाही; तर तो देवळातच ठेवला. म्हणजे एखादा विचार जेव्हा सत्ताधारी वर्ग स्वीकारीत नाही तेव्हा मानसिक पातळीवर देखील रुजू होत नाही. एका अवस्थेत तो उच्च झालेला दिसतो. ह्याला जबाबदार जितके उच्चवर्णीय सामंतशाही, तितकेच दडपले गेलेले जनसमूहदेखील जबाबदार आहेत. विषमतावादी रूढी, परंपरा जोपासत जगणे म्हणजेच जीवनपद्धती हा त्यांचा दृष्टिकोण बंडास प्रवृत्त करू शकला नाही. ब्रिटिशांच्या आगमनामुळे झालेला उत्पादनसाधनांतील लक्षणीय बदल आणि नवी सामाजिक मूल्यजाणीव यांमुळे दडपल्या गेलेल्या जनसमूहाला एक भौतिक आणि सामाजिक दिलासा मिळाल्यासारखे झाले. त्यांच्या धोरणामुळे जे ज्ञान काही प्रमाणात मुक्त झाले त्यामुळे उच्च वर्गीयांच्या मक्तेदारीला निश्चितपणे खिंडार पडण्यास सुरुवात झाली.

या अगोदर महाराष्ट्रातील दलित समाज एका अभावपूर्ण अवस्थेत जगत होता. विशिष्ट ग्रामीण, आर्थिक आणि सामाजिक अवस्थेत एक लाचार मरगळ त्याच्या ठायी होती. जशा त्याला स्वावलंबनाच्या वाटा सापडू लागल्या, तसा त्याचा मानसिक विकास होत गेला. प्रश्न विचारण्याची आणि उत्तरे शोधण्याची ताकद त्याच्यामध्ये येऊ लागली. समाज, धर्मव्यवस्थेतील बदलाचा तीव्र स्वर उमटू लागला. महाराष्ट्रातील बदलाच्या परंपरेतील एक कुशल सेनानी म्हणून डॉ. भीमराव रामजी आंबेडकर ह्यांचे नाव घ्यावे लागेल. म्हणूनच दलित समाजातील क्रान्तिकारक बदल महाराष्ट्रात घडले आहेत.

या पार्श्वभूमीवर महाराष्ट्रातील बदलता दलित तरुण तपासावयाचा असेल, तर आजचा दलित तरुण आणि तत्कालीन दलित तरुण ह्यांचा दृष्टिकोण काय होता हे पाहणे आवश्यक ठरते.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर ह्यांची चळवळ जेव्हा जोमात होती त्या वेळचा तरुण एका विशिष्ट

भावनेने झपाटलेला होता. बाबासाहेबांच्या नेतृत्वाच्या ठायी त्याची ठाम श्रद्धा होती. त्या वेळचा दलित समाजातील सुशिक्षित तरुण शाळेतून शिकविणारा शिक्षक होय. आंबेडकरी चळवळीतील हा त्या काळातला बुद्धिजीवी वर्ग होय. त्यांच्याबरोबर सत्यशोधकी जलशाप्रमाणे आंबेडकरी जलसे करणारे तरुण हे त्या काळी चळवळीचे प्रचारक होते. बाबासाहेबांनी मांडलेले सामाजिक विचार जनतेपर्यंत पोहोचविण्याचे कार्य हे वर्ग करीत होते. त्या काळी शहरात असलेल्या दलित समाजातील भजनी मंडळचा, लेझीम पथके, आखाडे यांतील तरुणदेखील चळवळीत भाग घेत होते. बाबासाहेबांनी दिलेले लढ्याचे आदेश हे प्राणाची पर्वा न करता अमलात आणले जात होते. ज्यांच्या जवळ खेड्यात थोडेफार उपजीविकेचे साधन होते असा तरुण वर्ग वगळता बाकीचा तरुण शहरात आलेला होता. हा दलित तरुण गिरण्या, म्युनिसिपालिटी, रेल्वे, टांकसाळ, गोदी, सिक्युरिटी प्रेस इ. मध्ये कामगार म्हणून वावरत होता. त्या काळी त्याच्या पुढे माणूस म्हणून जगण्यासाठी दिला जाणारा लढा होता. हिंदुधर्माने, समाजव्यवस्थेने अस्पृश्य म्हणून दिलेली वागणूक आणि गावगाड्याबाहेर केलेली अमानुष हकालपट्टी त्याला सतत बोचत होती. बाबासाहेबांनी अनेक विद्वत्तापूर्ण ग्रंथ इंग्रजीत लिहिले. विद्वानांच्या जगात त्यांची चर्चाही होत होती. परंतु त्या वेळच्या दलित तरुणांनी बाबासाहेबांचे विचार, तत्त्वज्ञान उचलले ते त्यांनी सुरू केलेल्या ' मूकनायक', 'बहिष्कृत भारत', ' जनता ', 'प्रबुद्ध भारत' या नियतकालिकांतून व बाबासाहेबांनी वेळोवेळी दिलेल्या जाहीर सभांतील भाषणांतून. बाबासाहेबांचे व्यक्तिमत्त्व उत्तुंग होते. इतका आदर व प्रचंड निष्ठा क्वचितच कुणा नेत्याला लाभली असेल. सारांश, त्या वेळच्या तरुणांना बाबासाहेब जीव की प्राण होते. १९२७ साली महाड येथील चवदार तळ्याच्या सत्याग्रहप्रसंगी सनातन्यांनी जो हल्ला केला त्याची प्रतिक्रिया म्हणून ह्यात्र तरुणांनी ' समता सैनिक दल ' स्थापन केले. एकूण साहित्य, संस्कृती, तत्त्वज्ञान, इतिहास यांच्या विश्लेषणाशी किंवा अभ्यासांशी संबंध नसणाऱ्या त्या काळच्या अर्धशिक्षित आणि अशिक्षित तरुणांनी चळवळीत एक कामगिरी केलेली आहे. त्यांच्याच त्यागावर, कष्टांवर हा आंबेडकरी चळवळीचा डोलारा उभा राहू शकला.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे कृतिप्रवण, विधायक दृष्टी असलेले राजकारणी आणि समाजशास्त्रज्ञ होते. त्यांनी त्यांच्या सामाजिक जीवनात पदार्पण करताना १९२४ साली ' बहिष्कृत हितकारिणी सभा ' स्थापन केली होती. तिची घोषणा होती— ' शिका ', ' संघटित व्हा ', ' संघर्ष करा '. प्रत्येक सभेमधून ते शिक्षणाचे महत्त्व सांगत. दलित समाजात खऱ्या अर्थाने सुशिक्षित वर्ग बाहेर पडला तो १९५० च्या सुमारास. त्यांनी पीपल्स एज्यूकेशन सोसायटीची स्थापना १९४५–४६ च्या सुमारास केली. मुंबईत ' सिद्धार्थ कॉलेज ' निघाले. या अगोदर बाबासाहेबांच्या संदेशामुळे जिल्ह्या-जिल्ह्यांतून कार्यकर्त्यांनी वसतिगृह, जमल्यास शैक्षणिक संस्थांच्या वतीने शाळा सुरू केल्या होत्या. एकंदरीत बाबासाहेबांच्या चळवळीमुळे आणि इतर वातावरणामुळे दलित समाजाला शिक्षणाचे महत्त्व कळू लागले होते. शिवाय आपला मुलगा चांगला शिकून बाबासाहेबांसारखा मोठा व्हावा हे स्वप्न दलित पालकांपुढे होते.

बाबासाहेब असेपर्यंत दलित समाजातील सुशिक्षित तरुण हा बाबासाहेबांच्या सावलीत वावरत होता. चळवळीत सामील होत होता. झोपडपट्टीत, चाळीत राहणारा अशिक्षित, कामगार हा तरुण दलित चळवळीत सामील होत होता. या काळातील तरुण जो शिकून बाहेर पडला होता, तो साहित्यप्रांताकडे वळायला लागला होता. विशेषत: ' प्रबुद्ध भारत ' या नियतकालिकातून तो सामाजिक प्रश्नांवर कथा–कविता लिहीत होता. कथा–कवितांतील प्रश्न सामाजिक होते, तरी त्यांचे वळण फडकेखांडेकरीच होते. साधारणपणे चळवळीशी इमान राखून मध्यमवर्गीय राहणीमानाची मूल्ये स्वीकारण्याकडे ह्या तरुणांचा कल होता.

दलित तरुणाच्या बदलाचा प्रखर आविष्कार दिसला तो बाबासाहेबांच्या बौद्ध धर्म स्वीकारानंतर. शहरांतील अनेक तरुणांनी आपापल्या जिल्ह्याच्या, तालुक्याच्या ठिकाणी धर्मांतराचे

कार्यक्रम घडवून आणले. गावगाड्यातील जुन्या चाली-रीती, रूढी, देवधर्म सगळे ठोकरून द्यायला सांगून स्वाभिमान शिकविला. धर्मांतरानंतर जिथे गावकीची कामे सोडली गेली नाहीत अशा अनेक गावांत हा तरुण स्वकीयांविरुद्ध बंड करून उठल्याची उदाहरणे आहेत. विषमतावादी तत्त्वज्ञानाला नकार आणि विज्ञाननिष्ठ समतावादी तत्त्वज्ञानाच्या स्वीकाराचा परिणाम त्यांच्यावर निश्चितच झाला होता. नवी जीवनमूल्ये आणि अस्मिता त्याला प्राप्त झाली होती.

बदलत्या तरुण मनाचा आविष्कार राजकीय क्षेत्रात बाबासाहेबांनंतर रिपब्लिकन पक्षाच्या नेतृत्वाच्या संदर्भात झालेला दिसतो. बाबासाहेबांबरोबर काम केलेले जुने नेतृत्व हे चळवळ मन मानेल तशी चालविते, राजकीय पातळीवर तरुण सुशिक्षितांच्या बुद्धीचा वापर केला जात नाही, हेतुपुरस्सर डावलले जाते असे साधारणतः आरोप होते. शहर, जिल्हा, तालुकापातळीवर ह्या नवशिक्षित तरुण रिपब्लिकन नेतृत्वाला भरभक्कम पाठिंबा मिळाला. परंतु स्वतःच्या बुद्धिसामर्थ्यावर दिला गेलेला अवास्तव भर जन-सामान्यांच्या प्रश्नांना भिडून त्यांवर संघर्ष उभारण्या-ऐवजी त्यांच्याशी तोडलेली नाळ, पक्षीय राजकारणाच्या संदर्भात तांत्रिक मुद्द्यावर दिलेला निष्फळ भर आणि शब्दाचा काढला गेलेला कीस यामुळे हे नवनेतृत्व फार काळ तग धरू शकले नाही. १९५८ साली रिपब्लिकन पक्षात पहिल्यांदा फूट पडली. आणि 'दुरुस्त–नादुरुस्त' असे जे गट निर्माण झाले त्यांची पार्श्वभूमी ही होय. रिप. पक्षात पडलेल्या या फाटाफुटीत तरुणांनी हिरीरीने भाग घेतला. त्यासाठी दोन्ही गटांनी जिल्हावाद, उपजाती यांचा उपयोग करण्यास मागेपुढे पाहिले नाही. आजही विदर्भात रिपब्लिकन पक्षाच्या गटाच्या संदर्भात हे उपजातीचे किंवा स्पष्ट बोलायचे तर महाराष्ट्रातील पोटजातींचे राजकारण खेळले जाते. ही आंबेडकरी लढ्यातील एक व्याकुळमग्न शोकांतिका आहे. असो. १९५८ मध्ये झालेल्या ह्या फाटाफुटीचे वादळ १९६४ पर्यंत जोरात होते आणि याचे एकमेव कारण म्हणजे कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांच्या मुरब्बी नेतृत्वाखाली झालेला भूमिहिनांचा विराट, देशव्यापी सत्याग्रह होय. १९६४ नंतर नवनेतृत्वाचे पाय गाळात रुतल्या-सारखे वाटतात.

१९६० ते ७० च्या दरम्यान दलित तरुणांच्या विविध बदलत्या प्रवृत्ती आपणास बघावयास मिळतात. केवळ रिपब्लिकन पक्षनेत्याचे आदेश पाळणे हे गटबाजीमुळे अनेक दलित तरुणांनी सोडून दिले होते. सुशिक्षितांची संख्या वाढत होती. राखीव जागांवर सरकारी नोकरीत चांगल्या पदावर अनेकांची वर्णी लागत होती. शहरांच्या ठिकाणी राहत्या घरांचा प्रश्न बिकट होता. आपल्याला राहायला चांगले घर असावे यासाठी या काळात दलित तरुणांनी शेकडो गृहनिर्माण संस्था स्थापन केलेल्या आढळतात. तसेच नोकरीच्या ठिकाणी असलेले आपले प्रश्न सोडविण्यासाठी मागासवर्गीय कर्मचारी संघटनाही याच काळात उदयाला आलेल्या दिसतात. स्थानिक पातळीवर तो एखादे मंडळ किंवा संस्था स्थापन करून त्यामार्फत आंबेडकर जयंती, फुले जयंती, बुद्ध जयंती, या सारख्या उत्सवांतून सामाजिक जाण व्यक्त करताना आढळून येतो. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या काळात सर्वसाधारणपणे एकाच स्तरावर, एकाच पातळीवर एक प्रश्न आणि एक लढा घेऊन जग-णाऱ्या समाजात स्तर किंवा वर्ग आता निर्माण झालेले ह्या काळात स्पष्ट जाणवतात. उच्च अधिकारी, कारकून ह्यांचा निर्माण झालेला मध्यम-वर्ग, झोपडपट्टीत किंवा चाळीत राहणारा कष्टकरी आणि ग्रामीण पातळीवर असलेला भूमिहीन शेत-मजुरांचा व अल्पभूधारकांचा वर्ग अस्तित्वात आलेले दिसतात.

रिपब्लिकन पक्षात फूट पडली होती तरी संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनात आणि इतरत्र रिपब्लिकन पक्षाची ताकदही प्रत्ययात आलेली होती. त्या वेळचे कुशल व धोरणी असलेले महाराष्ट्रातील काँग्रेस नेतृत्व ह्या ताकदीचा उपयोग सावधपणे करू इच्छित होते. याच धोरणातून सामाजिक अभिसरणाच्या नावाखाली काँग्रेस–रिपब्लिकन युती १९६७ साली घडवून आणली गेली. सामाजिक अभिसरण कितपत घडले हे बाजूला ठेवले तरी दलित सुशिक्षित तरुणांना प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष जे काही फायदे मिळाले, त्यांमुळे दलित तरुणांमधील सत्ताधाऱ्यांच्या विरुद्ध

संघर्ष करण्याची प्रवृत्ती होती, ती काही काळ मंद झालेली दिसते.

दलित तरुणांच्या सामाजिक, साहित्यिक व सांस्कृतिक आणि राजकीय बदलांची जाणीव व्यक्त करणारी प्रारंभी दोन केंद्रे होती. ती म्हणजे मुंबई व नागपूर होत. औरंगाबाद येथे बाबासाहेबांनी स्थापन केलेल्या मिलिंद महाविद्यालयामुळे इथेही हे केंद्र निर्माण झाले होते. आजही ह्या तिन्ही ठिकाणी घडलेल्या वैचारिक खळबळीचे पडसाद महाराष्ट्रातील दलित तरुणांवर अपरिहार्यपणे उमटतात. ह्या तीनही दलितांच्या सांस्कृतिक केंद्रांतून दलितांच्या सांस्कृतिक जीवनाचा एक क्रान्तिकारक आशय शब्दबद्ध करणारी चळवळ उदयाला आली. आणि तिचे नाव दलित साहित्य चळवळ होय.

दलितांच्या, तरुणांच्या राजकीय आणि सामाजिक पातळीवर असलेली मरगळ ही दलित साहित्य चळवळीमुळे दूर झालेली वाटते. दलित साहित्याची चळवळ ही एका अर्थाने तत्कालीन झापडबंद, संकुचित आणि सौदेबाज दलित नेतृत्वाविरुद्धचा एक सांस्कृतिक उठाव होता. मराठी साहित्याला ह्या चळवळीने हादरा दिलाच; पण एवढेच करून ही थांबली नाही, तर ती दलितांच्या राजकीय चळवळीचे मूल्यमापन व विश्लेषण करू लागली. एकजातीय बिंदूवर थबकलेल्या चळवळीने व्यापक पायावर उभी राहण्याची मागणी करू लागली. दलित साहित्य चळवळीमुळे बौद्धिक, सांस्कृतिक, सामाजिक व राजकीय पातळीवरदेखील कोंडी झालेल्या सर्जनशील तरुण व्यक्तिमत्त्वाला व्यक्त होण्यास मार्ग सापडला. इथले तत्त्वज्ञान, इथल्या डाव्या चळवळी, दलित नेतृत्व, इथली संस्कृती यांची निर्भयपणे समीक्षा व आत्मपरीक्षणदेखील करू लागला.

दलित साहित्य चळवळीचा कृतिशील आणि प्रखर आविष्कार म्हणजे ७३ साली झालेला 'दलित पँथर' या संघटनेचा उदय होय. अतिशय आक्रमक आणि जहाल भाषेत हा तरुण रिपब्लिकन गटबाज नेतृत्वाविरुद्ध, हिंदुधर्मावर आणि राज्यकर्त्यांवर टीकेचा भडिमार करू लागला. शिवराळ भाषाही वापरली जाऊ लागली. दलित तरुणांना आणि जनतेला पँथरने एक दिलासा दिला. पँथरचे सगळ्या थरांत भव्य स्वागत केले गेले. 'दलित पँथर' मध्ये २–३ वर्षांत फूट पडली. ही फूट अपरिहार्य आणि अटळ अशी होती. एक तर 'दलित पँथर'ची रीतसर बांधणी होऊन संघटना जन्माला आली नव्हती. तो एक उद्रेक होता. कार्यकर्त्यांचा शिस्तबद्ध संच नव्हता. 'दलित पँथर' ला लोकप्रियता होती तरी तिच्या भोवती असलेला जमाव गर्दीतला होता. ती गटबाज रिप. नेतृत्वाविरुद्धची जनतेची प्रतिक्रिया होती. आणि महत्त्वाचे कारण म्हणजे वैचारिक आणि व्यक्तिगत दृष्टया अतिशय भिन्न प्रवृत्ती असलेल्या दोन व्यक्तींच्या ठायी पँथरच्या नेतृत्वाचा बिंदू होता. पँथर एक शक्ती म्हणून जास्त दिवस जरी टिकली नाही तरी एकूण मरगळलेल्या दलित तरुणांच्या ठायी असलेली सामाजिक जाणिवेची ज्योत प्रज्वलित केली गेली. आणि आंबेडकरी चळवळीतल्या तिसऱ्या पिढीच्या नेतृत्वाच्या आगमनाची चाहूल वर्तविली.

आज विद्यमान घडीला दलित तरुणांचे छोटे-मोठे गट वा संघटना अस्तित्वात आहेत. रिप. पक्षाचे जे विविध गट आहेत, ते कसेबसे तग धरून आहेत. तरुण कार्यकर्त्यांचा पूर्ण अभाव त्यांच्याजवळ आहे. ह्या व्यतिरिक्त 'भारतीय दलित पँथर', 'दलित मुक्ती सेना', 'मास मुव्हमेंट', 'डीलस कोअर' ह्या काही संघटना होत. पैकी 'भारतीय दलित पँथर' ह्या संघटनेला 'दलित पँथर' या संकल्पनेचा थोडाफार उपयोग ग्रामीण भागात होतो. त्यामुळे मराठवाड्यातील दोन तीन जिल्ह्यांत या संघटनेचे अस्तित्व आणि प्रभाव जाणवतो. अर्थात नामांतर, मंडल आयोग असे काही प्रश्न सोडले तर मूलगामी विचार करण्याची आणि त्यानुसार संघटनेला वळण देण्याची कुवत नेतृत्वात नाही. 'दलित मुक्ती सेनेची' अलगतावादी भूमिका, वांझ आक्रमक घोषणा आणि स्वच्छ अश्लील भाषा यांमुळे दलित मुक्ती सेना कितपत टिकाव धरू शकेल हे सांगता येत नाही. शिवाय मुक्तिसेनेजवळ आज एकही प्रभावी संघर्षकेंद्र नाही. नामांतरापलीकडे तरी अजून सेनेचा कार्यक्रम गेलेला नाही. 'मास मुव्हमेंट' या संघटनेचे अस्तित्व जाणवत नसले तरी ज्या ठिकाणी महाराष्ट्रात अस्तित्व आहे त्या ठिकाणी तिचे स्वरूप एखाद्या

'सांस्कृतिक मंडळा' प्रमाणे आहे. डीलस कोअरची बांधणी आणि यंत्रणा चांगली असली तरी त्यांच्या ठायी आंबेडकरी चळवळीच्या परंपरेविषयी जो तुच्छतावाद जाणवतो त्यामुळे महाराष्ट्रातील दलित तरुण मनाची पकड घेण्यास डीलस कोअर असमर्थ ठरली आहे. ही चळवळ अजून शिबिरात आणि सरकारी कार्यालयातच घोटाळत असून रस्त्यात किंवा जनतेत उतरण्याची क्षमता असलेले नेतृत्व अजून तयार झालेले नाही. आणि ह्यामुळेच कदाचित डीलस कोअरचे आजचे स्वरूप हे तळगाळात खळबळ निर्माण करू शकत नाही. आज डीलस कोअरची कार्यपद्धती बघता ती एखाद्या 'चॅरिटेबल ट्रस्ट'-पेक्षा वेगळी नाही.

ह्या छोटयामोठ्या संघटना अस्तित्वात असल्या-तरी दलित पँथर आणि रिप. पक्षातील फाटाफूट आणि नवनवीन संघटनांचा होणारा उदय यामुळे असंख्य दलित तरुण आज चळवळीपासून अलिप्त आहेत. विद्यमान नेतृत्व त्यांच्या आदराचा विषय होत नाही. अर्थात जोपर्यंत प्रश्न असतात तोपर्यंत संघर्ष हा अटळ असतो. संघर्षासाठी संघटना आणि तत्त्वज्ञान हे आवश्यक असते. विशेष म्हणजे भारतासारख्या देशात संघटनेसाठी प्रभावी आणि आदर्शवत देखील नेतृत्व आवश्यक असावे लागते. बाबासाहेबांनंतर दलित चळवळीची जी शोकांतिका झाली त्याचे एक महत्त्वाचे कारण म्हणजे सर्व-सामान्य जनतेला हे प्रभावी आणि आदर्शवत नेतृत्वच दिसले नाही.

चळवळीतील नेतृत्वाच्या संदर्भात बाबासाहेबां-नंतरच्या २६-२७ वर्षांतील दलित तरुणांच्या बद-लत्या प्रवृत्तींचा मागोवा घेतल्यास माझ्या मते थोडा-फार स्वरूपात्मक बदल सोडल्यास गुणात्मक फरक नेतृत्वशैलीत फारसा आढळत नाही. सवलती, अन्याय–अत्याचाराविरुद्धची प्रतिक्रिया किंवा भाव-नात्मक प्रश्नावर चळवळी करून गट किंवा संघटना टिकविण्याची धडपड या पलीकडे नेतृत्व जाऊ शकले नाही. उद्योग आणि जमिनींचे राष्ट्रीयीकरण, भाषा-वार प्रांतरचना, शिक्षण, बौद्ध तत्त्वज्ञान, लोकशाही, अल्पसंख्याक, अर्थरचना, निवडणूकपद्धती इ. अनेक प्रश्नांवर बाबासाहेबांनी जे विचार ग्रंथांतून मांडले आहेत, त्यांचा सद्यः परिस्थितीत अन्वयार्थ लावून तो विचार सर्वसाधारण माणसापर्यंत पोहोचवून त्याला राजकीयदृष्टया सजग किंवा प्रशिक्षित करण्याचे काम अजूनपर्यंत केले गेले नाही. किंबहुना आज असा अन्वयार्थ लावण्याची ज्यांची क्षमता आहे असे जे थोडेफार दलित तरुण विचारवंत आहेत, त्यांची आणि ह्या विद्यमान नेतृत्वाच्या विचाराची तार कधी जुळलीच नाही. जनतेच्या चळवळीत हा समन्वय विधायक आणि निर्मितिशील असतो ह्याचा नम्रपणे विचार दोन्हीही बाजूने आज होताना दिसत नाही. बाबासाहेबांचे राजकीय विचार सोडाच, परंतु बेकारी, महागाई, भ्रष्टाचार, झोपडपट्टी या प्रश्नांवर उठाव केले जात नाहीत. राष्ट्रीय किंवा आंतरराष्ट्रीय प्रश्नांबद्दल आपलीही काही भूमिका असू शकते याची दलित नेतृत्वाला तर कल्पनाच नाही. एकूण राष्ट्राच्या राजकीय जीवनात आजचे दलित तरुण नेतृत्व आपली राजकीय प्रतिमा उभी करण्यास असमर्थ असे ठरले आहे. ह्या पार्श्वभूमीवर डॉ. बाबासाहेब आंबेडकर ह्यांचे नातू प्रकाश आंबेडकर या तरुण नेतृत्वाने राष्ट्रीय पातळीवर रिपब्लिकन पक्षाची जी पुनर्बांधणी सुरू केली आहे, एक व्यापक डावी भूमिका घेऊन, एक-जातीय राजकारणाचा त्याग करून बाबासाहेबांच्या संकल्पनेतील रिपब्लिकन पक्ष नव्या जोमाने उभा करण्याची जी जिद्द बाळगली आहे, तिला प्रचंड पाठिंबा सर्वत्र थरांतून मिळतो आहे. तरुण नेतृत्वाच्या आणि चळवळीच्या दृष्टीने ही दिलासा देणारी घटना ऐतिहासिक असली तरी ती प्रक्रिया नुकतीच सुरू झाल्याने तिचे मूल्यमापन आताच करणे योग्य ठरणार नाही.

महाराष्ट्रातील तरुणांमध्ये आणखी एक प्रवृत्ती वाढीला लागल्याचे दिसते. अर्थात ह्या प्रवृत्तीचा गट अल्पसा असा आहे. शहर, जिल्हा, तालुकापातळीवर हा वावरत असतो. सत्ताधारीवर्गातले खासदार, आमदार, मंत्री, नगरसेवक किंवा नोकरशाहीतील छोटेमोठे अधिकारी यांच्याशी संधान बांधून गरजू लोकांची कामे करताना आणि त्या बदल्यात आर्थिक मोबदला घेताना तो आढळतो. हा तरुण छोट्या-मोठ्या सहकारी संस्था, पतपेढ्या स्थापन करून आपल्या आधिपत्याखाली कारभार ठेवतो. १९६७ मध्ये झालेली काँग्रेस–रिपब्लिकन युती आणि अनेक

दलित नेत्यांनी केलेला काँग्रेसप्रवेश यानंतरच ही प्रवृत्ती दलित तरुणांमध्ये वाढीला लागलेली दिसते. ह्या प्रवृत्तीचा तरुण दलितांतील सगळ्याच छोट्या-मोठ्या संघटनांना वेळोवेळी आर्थिक सहकार्य करून सगळ्यांशीच चांगले 'रिलेशन्स' ठेवतो. आजच्या आर्थिक अरिष्टामुळे निर्माण झालेले बेकार तरुणांचे गट, जे साधारणतः अर्धशिक्षित असतात, त्यांच्यामधील प्रवृत्ती ही आक्रमक आहे. शहरांतून होणाऱ्या मारामाऱ्या, दारूचे गुत्ते, स्मगलिंग, मटका ह्या व्यवसायांत तो गुंतलेला दिसतो.

दलित साहित्य किंवा दलित रंगभूमीच्या चळवळीत अनेक नवीन चेहरे येत आहेत. काही सर्जनशील आहेत. दलितांच्या व्यथा–वेदनांवर ते कलाकृती निर्माण करतात. हे स्तुत्य असले तरी दलित चळवळीला ते काही मूल्यगर्भ जाणीव किंवा दिशा त्यांच्या कलाविष्कारातून देताना दिसत नाहीत. उलटपक्षी काही नाटककार आपल्या नाटकांतून जातीय संघर्षाचे इतके ढोबळ व बटबटीत चित्रण करताना आढळतात. यात कलात्मक जाणिवेचा अभाव तर असतोच; पण ह्या संघर्षापाठीमागचे सामाजिक–सांस्कृतिक–आर्थिक तणाव, त्यांचा कार्यकारणभाव ह्या गोष्टींचा विचार करताना दिसत नाहीत. ब्राह्मण विरुद्ध महार, मराठा विरुद्ध महार, सवर्ण विरुद्ध दलित अशी लढाई उभी करून चित्रण करणारे आणि 'साडेतीन टक्के संस्कृती'ला वारेमाप शिव्या मोजणारे कळत-नकळत एका जातीय अहंकारालाच खतपाणी घालत असतात 'विद्रोह' या संकल्पनेबद्दल असलेली अतिशय तोकडी समजूत या प्रवृत्ति-पाठीमागे असते किंवा शास्त्रशुद्ध मांडणी न करण्याच्या कुवतीतून हे निर्माण होते.

महाराष्ट्रातील दलित तरुणांच्या बदलाचे अनेक चढउतार आपणाला पाहायला मिळतात. शिक्षणाच्या प्रगतीमुळे राखीव जागा आणि आर्थिक व्यवस्था ह्या सगळ्यांमुळे दलित समाजात आज उच्च मध्यमवर्ग, मध्यमवर्ग, गरीब कष्टकरी आणि ग्रामीण भागात आजही दारिद्र्यरेषेखाली जगणारा भूमिहीन शेत-मजूर असे वर्गीकरण करता येईल. सांस्कृतिकदृष्ट्या भिन्न अशा जगात जरी हे थर वावरत असले तरी आंबेडकरी चळवळीशी कोणत्या ना कोणत्या प्रकारे असलेले नाते हे त्यांच्या जगण्यातील सामाजिक सूत्र होय. यामध्ये श्रद्धेचा आणि निष्ठेचा थोडाफार फरक करता येईल. ह्याचे कारण म्हणजे आज ह्या सगळ्या थोरांना त्यांच्या त्यांच्या पातळीवर प्रति-गामी आणि जातीयवादी संघटनांकडून अपमानित होण्याचे प्रसंग ओढवत असतात. शिवाय महा-राष्ट्राच्या आजच्या सामाजिक जीवनात हिंदू एकता आंदोलन, मराठा महासंघ, पतित पावन संघटना, विश्व हिंदू परिषद यांसारख्या प्रतिगामी प्रतिक्रिया उमटत आहेत. त्या निमित्ताने महाराष्ट्रातील दलित तरुणांमध्ये विविध प्रकारचे प्रवाह चर्चिले जाताना दिसतात.

पैकी पहिली म्हणजे या अन्याय अत्याचाराला तोंड द्यायचे असेल तर आपण 'जशास तसे' ही भूमिका घेऊन त्यासाठी सशस्त्र तयारी ठेवली पाहिजे. मिळमिळीत व लाचारीचे मार्ग सोडून दिले पाहिजेत. आणि यातूनच 'दलितस्थान'ची मागणी पुढे येताना दिसते.

दुसरा प्रवाह म्हणजे लोकशाही मार्गाने जाण्याचा. त्यांच्या मते बाबासाहेब आंबेडकर हे लोकशाही-वादी होते. आपणाला जर आपले प्रश्न सोडवून घ्यायचे असतील तर लोकशाहीचे प्रतिनिधित्व करणाऱ्या ज्या संस्था आहेत– म्हणजे लोकसभा, विधानसभा इ.– त्या ठिकाणी आपण आपले प्रतिनिधी जास्तीत जास्त पाठवले पाहिजेत. त्यासाठी आपण बहुसंख्याक झाले पाहिजे. या पाठीमागे समग्र दलित घटकांची एकजूट आणि शासनकर्ती जमात बनणे हे सूत्र आहे.

तिसरी भूमिका आहे ती वर्गलढ्याची. केवळ जातीय पक्ष वा लढा उभारून दलितांचे शोषण थांबणार नाही. शुद्धवर्गीय भूमिका घेऊन तमाम शोषितांच्या बाजूने उभे राहून वर्गलढा उभारल्या-शिवाय शोषणाचा अंत होणार नाही.

चौथा विचारप्रवाह म्हणजे बाबासाहेबांनी आपल्याला जो बौद्ध-धम्म दिला आहे तो समतेचा पुरस्कार करतो. त्या धम्माचा आणि तत्त्वज्ञानाचा प्रसार आणि प्रचार आपण केला तर जातिभेद नष्ट होऊन संघर्ष होणार नाहीत.

पाचवा विचारप्रवाह म्हणजे सध्याचा जो सत्ताधारी इंदिरा काँग्रेस पक्ष आहे, तो लोकशाही समाजवाद मानतो. दलितांच्या उद्धाराच्या अनेक योजना तो राबवीत आहे. खुद्द इंदिरा गांधींच्या मनात दलितांच्या कल्याणाचा विचार आहे. आपण

अनुक्रमणिका

त्यांच्याशी सहकार्य करून त्यांचे हात बळकट केले पाहिजेत.

हे चर्चिले जाणारे विविध मतप्रवाह असले तरी बहुसंख्याक दलित तरुणांचा कल हा दलितांच्या प्रश्नासाठी वेगळ्या दलित संघटनांची किंवा पक्षाची आवश्यकता प्रतिपादन करणारा आहे. याचे कारण देताना तो सतत मांडत असतो की, डावे पक्ष किंवा सत्ताधारी पक्ष सामाजिक प्रश्नांवर सतत उदासीन असतात. अलीकडेच तरुण दलित कार्यकर्त्यांच्या शिबिरात चर्चा करीत असता एका तरुण कार्यकर्त्याने व्यथा मांडली की, उरणच्या शेतकऱ्यांवर शासनाने दडपशाही केली. शासनाच्या पोलिसांनी शेतकऱ्यांचे बळी घेतले, अत्याचार केला. त्या निषेधार्थ मुंबई बंदची हाक देणारे डावे पक्ष आणि त्यांच्या संघटना, मराठवाड्यातील दलित जनतेवर झालेल्या अत्याचाराच्या निषेधार्थ मुंबई बंद'ची हाक देऊ शकत नाहीत; पण कामगारांचा निषेधमोर्चादेखील काढू शकले नाहीत.

इंदिरा काँग्रेस या पक्षाबद्दल जरी दलित तरुणांना विशेष आस्था नसली तरी भारतीय जनता पक्ष किंवा राष्ट्रीय स्वयंसेवक संघ यांसारख्या निखालस प्रतिगामी संघटना राष्ट्रीय पातळीवरून धार्मिक किंवा सामाजिक प्रश्नांवर उठाव करून, विशेषतः लोकांच्या धार्मिक भावनेला आवाहन करून त्यांचा राजकीय फायदा राष्ट्रीय पातळीवर घेण्यासाठी जेव्हा पुढे सरसावतात, तेव्हा ह्या शक्तींना नामोहरम करणारा एक पक्ष म्हणून दलित तरुण इंदिरा काँग्रेस या पक्षाकडे पाहत असतो. डावे पक्ष किंवा जनता पक्ष यांना राष्ट्रीय पातळीवर भाजपला किंवा आरएस्एस्ला पर्याय म्हणून आज तरी दलित तरुण मानत नाही ही वस्तुस्थिती आहे.

महाराष्ट्रातील दलित तरुणमनाचा आलेख हा अनेक पद्धतीने मांडता येईल. बदलता दलित व्यक्तिगत पातळीवरून मांडताना त्याच्या आयुष्यातील काही प्रसंग घेऊन त्याला भाबड्या किंवा रोमँटिक पद्धतीने उभे करणे योग्य नव्हे. शेवटी दलित असला तरी त्याला माणूस म्हणून विकार-वासना असणे स्वाभाविक आहे. त्याचे व्यक्तिगत पातळीवर असलेले वासना-विकाराचे आविष्करण हे प्रातिनिधिक असूच शकत नाही. आज दलित समाजातील जे वर्ग आहेत त्यांच्यामध्ये सामाजिक, सांस्कृतिक, कौटुंबिक पातळीवर अंतर्गत तणाव जाणवतात. हा बदलाचाच एक अपरिहार्य आणि अटळ असा भाग आहे. आणि हे तणाव निर्माण होतात म्हणून बिचकून जाण्याचे काही एक कारण नाही. हा प्रक्रियेचा एक भाग असतो.

हा आलेख मांडताना प्रामुख्याने मी चळवळीचाच विचार केला आहे. कारण दलित तरुणांना चळवळीपासून अलग काढून तपासणे योग्य ठरणार नाही आणि मला अभिप्रेत असलेला तरुण म्हणजे बौद्ध तरुण आहे. आंबेडकरी चळवळींचा वारसा, विचारांचा वारसा असलेला हा तरुण आजच्या महाराष्ट्रातील दलित तरुणांच्या चळवळीचा नायक आहे असे मी मानतो. बौद्धेतर जे दलित घटक आहेत– उदा. मांग, चांभार, भटक्या जाती इ.– ह्यांचेही प्रश्न हा तरुण आपापल्या परीने मांडत असतो. ह्या घटकांनी बौद्ध धर्म स्वीकारला तरच आपण त्यांच्यासाठी लढले पाहिजे. अशी भूमिका असणारा एक गट काही वर्षांपूर्वी दलित पँथरमध्ये होता किंवा असाही विचार प्रचलित होता की केवळ महार तरुण लढतो आहे आणि इतर त्याचा फायदा उठवत आहेत. हे विचार आज मागे पडत आहेत. समग्र दलितांच्या एकजुटीची भाषा दलितांच्या संघटना करीत आहेत. ग्रामीण भागात ही एकजूट अनेकदा जमिनीच्या प्रश्नाव्र लढताना अनुभवायला मिळाली आहे.

शहरात आज ज्या बौद्धेतर दलित तरुणांच्या संघटना आहेत त्यांना सामाजिक-सांस्कृतिक प्रश्नांची यूलगामी जाण आहे असे म्हणता येणार नाही, हे अनेकदा चर्चा करताना आढळून आले आहे. निवडणुकीच्या वेळी ही संघटना ज्याला मदत करीत असते तो त्यांना उत्सवासाठी काही अर्थसाहाय्य करतो. नळ, संडास याची सोय बघतो. शिवाय अशा संघटनांचे जे चालक असतात, त्यांना स्थानिक पातळीवर व्यक्तिगत फायदेही होत असतात. वास्तविक समाज म्हणून सामाजिक, सांस्कृतिक व शैक्षणिक पातळीवरचे कितीतरी प्रश्न आज बौद्धेतर दलित घटकांचे आहेत. या घटकांतील जागरूक आणि डोळस तरुणांनी ह्या प्रश्नांचा दूरगामी विचार करणे अत्यंत आवश्यक आहे. आणि ते व्हावे हीच एक अपेक्षा.

○ ○ ○



# महाराष्ट्रातील कृषि-औद्योगिक विकास : काही नव्या प्रयोगदिशा

श्री. अ. दाभोलकर

अनियमित पाऊस आणि ऐन मोसमातील पिकाच्या दृष्टीने असणारे प्रतिकूल हवामान, जेमतेम राखीव पाणीपुरवठा, खडकाळ निकस, भारी करळ अगर निकस उताराच्या जमिनी यांसारख्या बिकट परिस्थितीतून महाराष्ट्राची कृषिविकासाची आजची वाटचाल चालू आहे तशातच महाराष्ट्रातील बहुतेक शेतकरी असलेच तर एकदोन एकर बागायती नाहीतर फक्त जिरायतीच क्षेत्र असणारे अल्पभूधारक शेतकरी आहेत.

अशा परिस्थितीतही तासगाव, सांगली, सोलापूर यांसारख्या दुष्काळी, निमदुष्काळी प्रदेशांतही आर्थिक सुबत्तेचा नवा पूर उभा करण्याचे श्रेय महाराष्ट्रातील अनेक यशस्वी प्रयोगप्रेमी द्राक्षउत्पादकांनी मिळवलेले आहे. द्राक्षापाठोपाठ कोकणचा कल्पतरू आंबा आता देशावरील छोट्या शेतकऱ्यांचा कल्पतरू बनणार आहे. हापूस व त्याबरोबरीच्याच केशर आंब्याची लागवड हळूहळू देशावर यशस्वी होत आहे, स्थिरावत आहे. आंब्यापाठोपाठ गणेश डाळींब, कागदी लिंबू यांचे पडीक जागेवर हुकमी विक्रमी पीक मिळविण्यात या क्षेत्रातील आघाडीचे प्रयोगवीर आता यशस्वी ठरत आहेत. प्रथमदर्जाची एकरी चाळीस हजार डाळिंबफळे अगर १४′ × १४′ अंतराच्या लावणीत लिंबाच्या एका रोपाला एका बहरात पाच हजार लिंबे घेण्याचे तंत्रविज्ञान त्यांनी आता विकसित केले आहे. या पाठोपाठच चिकू, केळी, नारळ, गुलाब, पानवेल, बोर, टोमॅटो, स्ट्रॉबेरी यांसारख्या विविध पीकलावणीत किंवा कोंबडी, शेळी, मेंढीपालन यासारख्या उत्पादनाच्या नवनव्या क्षेत्रांत आपापल्या परिसरात यशस्वी ठरणारी तंत्रविद्या (टेक्नीरसी) उभी करण्याची ऊर्मी ठिकठिकाणी वाढीला लागत आहे. यशस्वीही होत आहे.

शासकीय वा कृषी-विद्यापीठांच्या मदतीखेरीज स्वतःच्या प्रयोगताकदीवरच, कोणत्याही कृषी-उत्पादनक्षेत्रातील पायाशुद्ध आर्थिक विकास उभा करता येतो असा नवा आत्मविश्वास महाराष्ट्रात आज जागोजागी अंकुरित होत आहे व झपाट्याने बहरात येत आहे. महाराष्ट्रातील या सर्व प्रयोग-धडपडीशी ‘प्रयोगपरिवार’चा अगदी सुरुवातीपासून घनिष्ठ संबंध आहे असंस्थात्मक स्वरूपात विविध प्रयोगगटांना (वैज्ञानिक कार्यकुलांना) स्वायत्त स्वरूपाचा विकेंद्रित सहयोग देत हे प्रयोगविस्ताराचे कार्य चालू आहे. हा संबंध साखळी प्रक्रियेने गोफ गुंफत आज विविध अंगांनी विविध स्तरांवर विस्तारत आहे.

प्रयोगपरिवारच्या या यशाचे आर्थिक शैक्षणिक रचनात्मक अंगाने मूल्यमापन करणारी एक नवी पिढी आज उदयाला येत आहे. पडीक क्षेत्राचा विकास, आदिवासी विभागातील विकासकार्य, वनशेतीबाबतचे नवे प्रयोगपर्याय, सार्वजनिक कार्य करणाऱ्या कार्यकर्त्यांसाठी त्यांना आर्थिक स्वायत्तता मिळवून देणारे स्वयंरोजगारीचे उत्पादक विधायक कार्यक्षेत्र; ग्रामीण पातळीवरची तेथील समग्र लोकजीवनाला स्पर्श करील अशी स्वयंपूर्ण आत्मनिर्भर पायाशुद्ध आर्थिक पायाभरणी हे चालू प्रस्थापितास न सोडवता आलेले विविध जटिल प्रश्न आहेत. प्रयोगपरिवार कार्यपद्धती अधिक व्यापक केली तर वरील परंपरागत आव्हानांवर मात करणे कठिण पडू नये असे या कार्यउभारणीसाठी धडपडणाऱ्या प्रयोगवीरांना आज जाणवू लागले आहे. परिसर-पर्यावरणाला धरून एक नव्या स्वरूपाची सर्वांगीण मूलभूत कृषिक्रांती चालू विज्ञानाच्या बळावर यशस्वी करता यावी व त्यातून तळागाळातील व्यक्तीपर्यंत पोहोचणारी, नित्य ग्राहकोपयोगी

वस्तूंचे वैविध्य असणारी विकेंद्रित आर्थिक सुबत्ता प्रस्थापित करता यावी असा प्रायोगिक विश्वास आता क्रमाने वाढत आहे.

उच्च पदवीपरीक्षानावे अगर संशोधनसंस्था यांत अभ्यासले जाणारे उच्च पातळीवरचे कृषि-विज्ञान जनसामान्यांना खुले करता येते याचा पहिला अनुभव प्रयोगपरिवाराला महाराष्ट्रातील चालू द्राक्षक्रांतीच्या संदर्भात आला. द्राक्षविज्ञानाच्या अशा विरहस्यीकरण (डीमिस्टीफिकेशन) प्रक्रियेतून, द्राक्षावरील अनेक नवनवे प्रयोग महाराष्ट्रातील काही द्राक्षउत्पादकांनी सुमारे दीड तपापूर्वी आपापल्या शेतांवर व परिसरांत पुरे केले. त्यातून द्राक्षलागवडीतील अनेक नवनवीन तंत्रे त्यांनी विकसित व प्रस्थापित केली. या विविध प्रयोगधडपडींना धरून 'वैज्ञानिक द्राक्षकुल तासगाव' या सार्थ नावाचे कार्यकुल उभे केले. १९७९ मध्ये पश्चिम जर्मनीतील कासेल युनिव्हर्सिटीतील 'ग्रामीण विकासासाठी विज्ञान' या परिसंवादात विज्ञानाचे मुक्त विद्यामंच कसे उभे करता येतात याचे मी विवेचन केले होते. या परिसंवादाचे सूत्रविवरण (की नोट अेक्स्पोझिशन) करण्याचे व वेळोवेळी नवे भाष्य पुरवण्याचे काम माझे होते. माझ्या बरोबरच या सूत्रसंचालनात पददलितांचे शिक्षण हा विचार मांडणारे जागतिक कीर्तीचे शिक्षणतज्ज्ञ पाव्हली फ्रेरे हेही सहभागी होते. विविध देशांतील विविध विज्ञानविषयांतील तज्ज्ञ या चर्चेला उपस्थित होते. प्रस्थापिताला मिंधे नसलेले, उच्च विज्ञानाशी प्रायोगिक सलगी करून त्या बळावर आपल्या प्राप्त परिस्थितीत पायाशुद्ध आर्थिक विकास साधलेले, स्वतःच्या प्रयोगताकदीवर विश्वास असलेले, ग्रामीण विकासाचा झेंडा स्वतःच्या खांद्यावर घेऊन नेतृत्व देणारे गट तळागाळातून कसे उभे राहतात याची मीमांसा मी त्या परिसंवादात केली होती. त्याचे समग्र इतिवृत्त आता जर्मन भाषेत प्रकाशित झाले आहे. या इतिवृत्ताला दुजोरा देणारा एक अगदी ताजा दाखला या इथे देत आहे. त्यामुळे ते इतिवृत्त न वाचताही त्यातील मथितार्थ स्पष्टपणे समजून येईल.

७ एप्रिल १९८४ च्या माणूसच्या अंकात 'दुष्काळी भागाचा कायापालट घडवून आणणारा एक कृतिशील परिसंवाद' या शीर्षकाखाली २१ फेब्रु. १९८४ ला जत येथे आयोजित केलेल्या एका परिसंवादाचे इतिवृत्त आले आहे. जत हा खडकाळ, बिनपावसाचा प्रदेश आहे. या परिसंवादाला वैज्ञानिक द्राक्षकुल तासगावचे श्री. गणपतराव म्हेत्रे व नामदेव बापू माने यांना आवर्जून बोलावले होते. नामदेव बापू हे एके काळी दुसऱ्यांच्या शेतावर व दुकानात पोटार्थी जीवन जगण्यासाठी राबत होते. आज मात्र ते व गणपतराव म्हेत्रे हे महाराष्ट्रातील आंबाक्रांतीचे अध्वर्यू समजले जातात. द्राक्षलागवडीतील प्रयोगयशानंतर कृषिउत्पादनाची इतर क्षेत्रे म्हणून गुलाब, केळी, आंबालागवड यांवरही त्यांनी यशस्वी प्रयोग केले व उच्च प्रकारचे यश संपादन केले. महाराष्ट्राचे कृषिमंत्री नुकतेच सुमारे एक दिवस नामदेव बापूंकडे मुक्काम टाकून आंब्यावर कलमे भरण्याचे शिक्षण व आंबालागवडीचे त्यांचे तंत्र त्यांच्याकडून घेत होते ही एकच गोष्ट या संदर्भात पुरेशी बोलकी आहे.

जतच्या या परिसंवादात नामदेव बापू ज्या तडफेने व विश्वासाने आपले विचार मांडीत आहेत, त्यावरून महाराष्ट्रात जागे झालेले यशस्वी कृषिप्रयोगवीर चालू परिस्थितीचे किती मूलग्राही भेदक व मार्मिक विवेचन करू शकतात ते लक्षात येईल. **'आम्ही प्रयोग केले, आपण प्रयोग करू या व निर्विवादपणे यशस्वी होऊ या'** हा त्यांच्या विवेचनातला हुंकार कोणत्याही जाणकार मनाला सुखावणारा व दिलासा देणारा आहे. या परिसंवादात बोलताना नामदेव बापू म्हणतात* –

"मी व माझे गुरुजी श्री. गणपतराव म्हेत्रे असे दोघेजण जतच्या दुष्काळी शेती परिसंवादासाठी मुद्दाम उपस्थित राहिलो आहोत. आमचा मणेराजुरीभाग जत तालुक्यापेक्षा अधिक बिकट परिस्थितीत होता. **आम्ही मार्गदर्शन घेतले. परंतु स्वतः प्रयोग व कष्ट यांची जिद्द धरली.** पाटाच्या पाण्याशिवाय शेती पिकत नाही ही कल्पना चूक आहे, हे मी अनुभवांनी सांगतो. तेव्हा पाटाचे पाणी मागू

---

* संदर्भ : माणूस, ७ एप्रिल १९८४, पृष्ठ ६–७.

नका, साखर कारखाना काढू नका, ऊसपिकाने जमीन बाद होते हे मी व गणपतराव म्हेत्रेंनी अनुभवले आहे. म्हणून गेल्या १८ वर्षांपासून आम्ही ऊस लावणे बंद केले आहे. **आम्ही कष्टाने द्राक्षाचे प्रयोग केले, गुलाबशेतीचे प्रयोग केले आता केसर आंबा व इतर फळे यांचे प्रयोग चालू आहेत.** जत भागात पडणारा पाऊस जमिनीत मुरवला व तेवढ्या पाण्यावर येणाऱ्या पिकाची योजना केली तर शेती यशस्वी होऊ शकते. द्राक्षाच्या वेलाला घातलेले पाणी दोन दिवसात संपू लागले, तेव्हा आम्ही आळ्यामध्ये हुलग्याचे भूस टाकले व पाणी दिले. ती ओल आठ दिवस टिकली ... "

" **प्रयोग आपले आपण करावे लागतात.** जतच्या शेतकऱ्याला मी आव्हानपूर्वक सांगतो, की या माळावर काय पिकणार ? अशा नुसत्या विचाराने हताश होऊ नका. बोर, केसर आंबा, चिंच, पेरू, चिक्कू, कवठ, आवळा, डाळींब ही फळझाडे तुमच्या या जमिनीत उत्तम प्रकारे येऊ शकतील हे तुमची जमीन पाहून मी सांगू शकतो. **अशी फलोद्याने व वनशेती करण्याची जिद्द तुम्ही धरलीत तर तासगावची द्राक्षकुलसंघटना तुम्हाला प्रयोग करण्यास व नंतर बाजारपेठ उपलब्ध करून देण्यासाठी सर्वतोपरी सहकार्य करील ... सरकार काय करणार** आहे ? **बँका काय करणार आहेत ? याची वाट न** पाहता, **तुम्ही प्रयोगाला सुरुवात करा. मनगटात रग असेल तर योजना तुमच्या मागे धावू लागतील. आम्ही तासगावच्या लोकांनी कुणाच्याही मदतीची अपेक्षा न धरता द्राक्षाचे प्रयोग यशस्वी केले आहेत. तुमच्या जतसारख्या माळरानात कमीत कमी पाण्यावर उत्तम द्राक्षबाग कशी येईल यासाठी आमचे आता प्रयोग चालू आहेत.** काळीभोर जमीन हीच शेतीला उपयुक्त, ही परंपरागत समजूत अनुभवाने चुकीची ठरली असून तुमची जतची खडकाळ जमीन हीच अधिक संपन्न व तुम्हाला सुखी करणारी आहे. "

श्री. नामदेव बापू शेवटी म्हणाले, " शेतकरी बंधूंनो, तुम्ही–आम्ही आज एकत्रित आलो आहोत. आम्ही दोघेजण आज येथे केवळ परिसंवादातील भाषणासाठी आलो नसून तुम्ही जतच्या या माळरानावर प्रयोग करण्याचे ठरवले तर तुम्हाला सर्व योजना आखून देऊन त्या यशस्वी करण्यासाठी व सल्लामसलत करण्यासाठी प्रत्येक महिन्यातून एकदा जतला यायला आम्ही तयार आहोत, असे आश्वासन देतो. "

" सरकारला माझी एक विनंती आहे. योजनेच्या नावाखाली प्रत्येक शेतकऱ्यापुढे तुकडा टाकण्याऐवजी पाच-पंचवीस गावांतून सरकारने हुशार व प्रयोगशील शेतकरी निवडावेत. या एकाच ठिकाणी सर्व तऱ्हेची मदत द्यावी व प्रायोगिक प्रकल्प उभे करावेत. व्याख्याने देऊन माझा शेतकरी बदलणार नाही. पण त्याच्या भागात फलोद्यानाचा एखादा प्रकल्प उभारलेला त्याने पाहिला तर सरकारच्या मदतीची वाट न पाहता तो आपले काम चालू करेल. "

कोणत्याही शाळेतून अगर विश्वविद्यालयातून कोणतेही शिक्षण न झालेले, पण पुरेसे उच्च बुद्धिदर्शकांक असणारे व स्वतःच्या प्रयोगशक्तीच्या व विज्ञानव्यासंगाच्या बळावर स्वतःचे दारिद्र्य घालवण्यात यशस्वी ठरलेले श्री. नामदेव बापूंसारखे नेतृत्व हे जनसामान्यांत एका ज्योतीने दुसरी ज्योत लागावी तसे सार्वत्रिक होत जाते. अशा बापूंना शोधत आम्हीपण तुमच्यासारखे प्रयोग करतो, नवे परिसरयशस्वी तंत्रविज्ञान आत्मसात करतो, यशस्वी होतो असे म्हणणारे अनेक गट (सेल्फ-सँपलिंग) व व्यक्ती पुढे येतात. अशा रीतीने उच्चविज्ञानाचा वापर करत, स्वतःच्या प्रयोगशक्तीवर चालू परिस्थितीला वळण लावणारे नवनवे यशस्वी आर्थिक वैज्ञानिक अभिक्रम निर्माण करणारे विविध कृषि–विज्ञानक्षेत्रातील नवे नेतृत्व, प्रयोगपरिवाराच्या गोफप्रक्रियेतून ( नेटवर्क ) आज महाराष्ट्रात तळागाळातून पुढे येत आहे. उच्चदर्जाच्या विज्ञानाचे जनसामान्यांसाठी विरहस्यीकरण (डीमिस्टीफिकेशन) करता येते. त्यामुळे विज्ञानाची संगत धरत व नित्य नव्या प्रयोगक्रमांचा पाठपुरावा करत सर्वांगीण विकासाचा नवा राजमार्ग ते स्वतःच बांधू शकतात व 'तळातून विकास' (बिल्डिंग फ्रॉम बिलो) ही आजपर्यंत काव्यात्मक वाटणारी कार्यकल्पना वास्तवात उभी करतात.

बहुजनसमाजाचे दारिद्र्य व अज्ञान नष्ट करणे हे चालू काळातील सर्वांत अधिक भरभराटीला

आलेले धंदे आहेत असे उपहासाने म्हटले जाते. जनतेच्या शैक्षणिक व आर्थिक विकासाचे नित्य नवनवे उपक्रम आज हाती घेतले जातात व राबवले पण जातात. पण ज्या जनतेसाठी ते कार्यक्रम असतात, ती मात्र अशा कार्यक्रमांकडे पाठ फिरवून घुम्म बसलेली असते. अशा उपक्रमांमुळे आपले दारिद्र्य व अज्ञान हटत जाण्याऐवजी आपला कर्जबाजारीपणा व आपले खर्चिक तंत्रविज्ञानावरील परावलंबित्व वाढतच जाते असा दाहक अनुभव आल्याने जनसामान्य आज शासनातर्फे वा कृषिविद्यापीठातर्फे पुढे येणाऱ्या सर्वच विकासकार्यक्रमांबाबत कमालीचा उदासीन बनला आहे.

लोकांचे मूलभूत प्रश्न त्यांच्या परिसरमर्यादेतच तेथील परिस्थितीत योग्य वैज्ञानिक कार्यपर्याय वापरून सोडवता येतात असे लक्षात आले तर असे ज्ञानविज्ञान शिकण्यास व युक्तअंगी तंत्रविद्या विकसित करून आत्मसात करण्यास ठायी ठायीचे प्रयोगगट उत्स्फूर्तपणे पुढे येतात. त्यासाठी कोणत्याही शासकीय-निमशासकीय देणगीवर अवलंबून न राहता, अंतर्गत खर्चवेच उभा करत, विज्ञानाच्या निखळ उपासनेचे विविध स्वरूपांचे 'मुक्त विद्यामंच' ठायी ठायी उभे होतात. त्यातून एक नव्या स्वरूपाचा प्रायोगिक, वैज्ञानिक सुसंवाद साधला जातो. एक नव्या स्वरूपाची वैज्ञानिक साक्षरता सार्वत्रिक होते. अत्याधुनिक जीवरसायनशास्त्र, जीवशास्त्र, वनस्पतिविज्ञान, वनस्पती-इंद्रीय विज्ञान, मृदशास्त्र व यांसारख्या चालू विज्ञानशाखांतील तपशीलांचा अशा अभ्यासातून "रहस्यभेद" होताच जीवनाच्या विविध क्षेत्रांत प्रगती करू पाहणाऱ्या या प्रयोगवीरांना आपापल्या प्रश्नांच्या सोडवणुकीसाठी नेमका निर्णय घेण्याबाबत लख्ख वैज्ञानिक दृष्टी प्राप्त होते. त्या पाठोपाठ विविध स्वरूपाची ही 'वैज्ञानिक कार्यकुले' आपापल्या परिसरातील दारिद्र्याचा ऱ्हास करणारी प्रयोगविद्या प्रमाणित करण्यात यशस्वी होत जातात. आपले नित्य प्रश्न सोडवणारी व आपल्या नित्य गरजा समर्थपणे भागवणारी समृद्धीची कवाडे सताड उघडण्याचे बळ देणारे; चालू परिस्थितीला हितकारक वळण लावणारे; व साक्षात्कारी वैज्ञानिक अभिक्रम (व्हेंचर्स) निर्माण करणारे जे शिक्षण असते तेच खरे शिक्षण होय. असे हे शिक्षण ते स्वतःच्याच ताकदीवर पुरे करतात.

दुर्दैवाने अशा वैज्ञानिक शैक्षणिक कार्यप्रक्रियेवर 'विज्ञानाच्या अशा विरहस्यीकरणावर' चालू शिक्षणव्यवस्थेचा विश्वास नाही. शाळांमध्ये जाऊ न शकलेली अगर शाळांतून मध्येच या नाही त्या कारणाने बाहेर फेकलेली व्यक्ती प्रथमश्रेणीचे उच्च दर्जाचे ज्ञानविज्ञान संपादन करू शकणार नाही व वापरू शकणार नाही, अशी चालू शिक्षणव्यवस्थेची धारणा आहे. उच्चविज्ञानाचा वापर हा फक्त तज्ञांचा राखीव अधिकार आहे, अशा उच्च विज्ञानाच्या वापराबाबतचे परावलंबित्व जनसामान्यांनी निमूटपणे मान्य केलेच पाहिजे, हे चालू शिक्षणव्यवस्थेने प्रस्थापित केलेले एक कुटिल व्यावसायिक ब्राह्मणी नीतिमूल्य आहे. येथील विकास कार्यानावे परदेशातून पुरेसे विज्ञान आयात करून त्या जोरावर येथील प्रश्न सोडवण्याची दिशाहीन धडपड त्यामुळे चालू विकासकार्यावर अद्याप पकड ठेवून आहे.

ग्रामीण पातळीवरील कोंबडीपालन, डुक्करपालन, सोयाबीनलागवड यांसारखे विकासकार्यक्रम यामुळे पूर्णपणे फसले आहेत. तर येथील पर्यावरणाला (इकॉलॉजीला) चुकीचे वळण देणारे सुबाभूळलागवड, संकरित परदेशी वाणाच्या गाईंपासून दुग्धविकास हे कार्यक्रम आज फसण्याच्या मार्गावर आहेत. दुधाचा महापूर आला असे एका बाजूला म्हटले जाते, तर खुद्द हा दुधाचा महापूर करणाऱ्या दूधउत्पादकाला स्वतःच्या घरच्या वापरासाठी ते दूध वापरणे महाखर्चिक ठरते. अशा चुकीच्या विकासपद्धतीचा अवलंब केल्याने आज या विकासकार्यात अनेक गुंते निर्माण होऊन त्यांच्या आता निरगाठी बनल्या आहेत.

साधनांचे व उत्पादित वस्तूंचे ध्रुवीकरण, वाहतूकव्यवस्थेवरील व बाजारपेठांवरील परावलंबित्व, आर्थिक पतपुरवठ्यातून वाढणारा कर्जबाजारीपणा, परिसराचे व पर्यावरणाचे (नेबरहुड व इकॉलॉजी) झपाट्याने चालू असलेले गुणात्मक अवमूलन असे अनेक नवे प्रश्न आज उपस्थित झाले असून विकसनशील देशांत त्यांनी आता अक्राळविक्राळ रूप धारण करण्यास सुरुवात केली आहे.

अनुक्रमणिका






आज औद्योगिक प्रक्रियेनावे कार्यान्वित झालेल्या साखरकारखान्यातून नवे साखरसम्राट निर्माण झाले आहेत. पण ऊस पिकवणारे लहान शेतकरी मात्र आता रसातळाला चालले आहेत. एकेकाळी महाराष्ट्राची भाग्यलक्ष्मी गुळाच्या ढेपेवर बसून आली असे अभिमानाने म्हटले जाई, त्याच ठिकाणी आजची उसाची शेती ही पाचटाची शेती बनली आहे याची अनेक जाणकारांना खंत आहे. बहुतेक ऊसशेतकऱ्याच्या शेतजमिनी आता झपाट्याने क्षारयुक्त व नापिक बनत चालल्या आहेत. महाराष्ट्रातील ऊसशेतीला असे दुर्दिन येण्याचे प्रमुख कारण ऊस या पिकाचा उच्च पातळीवरचा वैज्ञानिक तपशील जनसामान्यापर्यंत पोहोचवण्यात कोणीच रस घेतला नाही हे आहे. मोठमोठे साखर कारखाने या साठी उच्च संशोधन पातळीपर्यंतचे सर्व ते कार्य करू शकले असते; पण याबाबत आजपर्यंत परिपूर्ण उदासीनताच आढळते. सर्वांत कमी दगदगीची सुलभ पैसे देणारी शेती या नावे ते ऊस पिकाबाबत काही साचेबंद कार्यक्रम सार्वत्रिक झाले व या अशा आंधळ्या उत्पादनतंत्रामुळेच ऊस पिकाची आज महाराष्ट्रातच नव्हे तर देशात झपाट्याने पीछेहाट होत आहे.

या उलट ऊस या पिकाबाबतचा पदवी व उच्च पदवीपातळीवरचा शास्त्रशुद्ध अभ्यास सुरुवातीपासूनच सार्वत्रिक केला असता तर आज महाराष्ट्रातील द्राक्षोत्पादकांनी दाखवली त्या तऱ्हेची नव्या वळणाची नित्य नवोन्मेशी आर्थिक क्रांती ऊस उत्पादकांनी पण उभी केली असती मूलभूत द्राक्षविज्ञान व तत्संबंधीच्या शास्त्रांचा **सखोल** समग्र प्रयोग अभ्यास यामधून महाराष्ट्रातील चालू द्राक्षक्रांतीची पायाभरणी झालेली आहे. या अभ्यासातून स्वतःच्या प्रयोगताकदीवर उभे राहिलेले व प्रस्थापितांचे कोणत्याही रीतीने मिंधे नसलेले 'वैज्ञानिक द्राक्षकुल तासगाव'चे द्राक्षलागवडीतील नवे नेतृत्व जनशक्तीतून उभे राहिले. या द्राक्षउत्पादकांनी स्वतःची अशी द्राक्षलागवडीची हक्काची पद्धती विकसित केली. द्राक्षलावणीनंतर पूर्वी तीन वर्षांनी पहिले पीक हातात पडत असे; ते पीक पहिल्या वर्ष-दीड वर्षात मिळू शकेल असे क्रांतिकारक तंत्र प्रमाणित केले. बिनबियाची द्राक्षलागवड महाराष्ट्रात होणार नाही हा कृषितज्ञांचा पूर्वीचा रिपोर्ट खोटा पाडून बिनबियाची द्राक्षलागवड यशस्वी करून सार्वत्रिक केली व आर्थिक विकासाचे एक नवे क्षेत्र महाराष्ट्राला खुले करून दिले. आकर्षक दर्जेदार गुणवत्तेचे हुकमी द्राक्षपीक मिळण्यासाठी जिब्रेलिक ॲसिड वापराचा, गर्डलींग व विरळणी तंत्राचा सर्वांगाने सखोल प्रयोग-अभ्यास करून ती कला हस्तगत केली. नवीन गुणाच्या व अधिक उच्च दर्जाचे पीक देणाऱ्या आपापल्या द्राक्षबागेतील उत्परिवर्तित जातींचा (म्युटॅंटस) शोध घेऊन त्यांचे प्रमाणीकरण केले. त्यांचे राजेशाही नामकरणविधी करून त्या जाती प्रसारात आणल्या. बाजारातील चढउतार आपल्या हातात ठेवता यावेत म्हणून शीतसाठवण तंत्राचा तसेच भारतात व भारताबाहेर दूरवर माल पाठवताना माल पेटीत भरल्यावर दीर्घकाळ आहे त्याच स्वरूपात ताजा राखण्याच्या तंत्रांचा परिचय करून घेऊन त्याचा वापर केला. तसेच त्यात नवीन सुधारणा पण सुचवल्या व अमलात आणल्या, प्रथमदर्जाचे बेदाणे बनवण्याचे स्थानिक परिस्थितीला परवडणारे तंत्र विकसित करून उत्पादित मालावरील नव्या प्रक्रियाकार्याला चालना दिली. द्राक्षपिकांना अतिघातक अशा केवडा भुरी यासारख्या रोगाशी निकराची झुंज देत त्याबाबतच्या उपाययोजनांचा आज उपलब्ध असलेला सर्व अभ्यास आत्मसात केला. आज महाराष्ट्रातील सर्व द्राक्षउत्पादकांत एक पारिवारिक भावना व जिज्ञासू अभ्यासवृत्ती वाढीला लागलेली दिसून येते व ठायी ठायी द्राक्षअभ्यास करणारी वैज्ञानिक द्राक्षकुले उभी राहिली आहेत. शासनाच्या व कृषिविद्यापीठाच्या मदतीशिवाय त्यांनी हे विकासकार्य करून दाखवले. त्यांच्या या पराक्रमामुळे सुरुवातीला एकरी ५०० रु. बँकपत नसलेला द्राक्षव्यवसाय एकरी पन्नास हजारपर्यंत पतपुरवठा होण्याएवढा स्थिरावला आहे.

महाराष्ट्रातील ऊसउत्पादकानादेखील असेच सर्वांगीण यश स्वबळावर हस्तगत करता आले असते; पण त्यासाठी ऊस-लागवडीची पायाभरणी तत्कालीन आर्थिक व राजकीय कारणांपेक्षा ऊस उत्पादनाची चिरंतन शास्त्रीय परंपरा उभी करत व्हावयास हवी होती. चालू लेखाच्या संदर्भात,



अनुक्रमणिका

महाराष्ट्रातील ऊस व द्राक्ष पिकामधील ही तुलना, विकासाबाबतच्या प्रयोगपरिवारच्या कार्यकल्पनेचे नेमके स्वरूप अधिक स्पष्ट करेल व चालू लेखाच्या मर्यादेत थोडक्यात संकलित केलेले पुढील विवेचन समजण्यास अधिक मदतही मिळेल.

कृषि-उत्पादनाचे खरे शास्त्रीय परिमाण स्वच्छ सूर्यप्रकाश आहे. भूमी पाणी, खत, या त्या दृष्टीने अगदी गौण गोष्टी आहेत. किंबहुना आपल्या परिसरमर्यादेतच भूमीचा विकास करता येतो व खताचे पण अनेक पर्यायी शास्त्रीय तपशील प्रमाणित करता येतात. पाणी व त्याची वनस्पतींना असणारी खरी गरज लक्षात आली तर पाणीपुरवठ्याच्या तंत्रात आश्चर्यकारक सुधारणा करता येते व पाण्याची बचत पण साधते. यामुळे द्राक्षाच्या ६'×४' अंतरावरील एका रोपाला थेंबपद्धतीने रोज फक्त चार लीटर पाणी पुरू शकते व दहा किलो द्राक्षे घेता येतात. २०'×२०' अंतराच्या लागवडीतील एका लिंबाच्या झाडाला ऐन उन्हाळ्यात फक्त २० लीटर पाणी रोजी पुरवून रोपाला दहाहजार लिंबे घेता येतात, उलट कोकणसारख्या डोंगर-उताराच्या जागेत शास्त्रीय पद्धतीने आंबालागवड केली तर ३०'×३०' अंतरावरील हापूस आंबा-लागवडीतील आंब्याचे झाड तिसऱ्या वर्षीच आपला लागवडखर्च भरून काढण्याएवढे एक पेटीचे आंबाउत्पादन देते व पुढे तीनचार वर्षांतच ३० पेट्या म्हणजे सुमारे हजार बाराशे आंबे नियमितपणे ( एक वर्षाआड नव्हे ) देऊ लागते असे झाड वाढण्यास पहिली चार वर्षे एकदिवसाआड दोन घागरी पाणी पुरे ठरते. एकरामध्ये अशी चाळीस झाडे उभी करण्यास यामुळे किती कमी पाण्याची जुळणी हवी ते आपणास समजू शकेल. पाण्याचे दुर्भिक्ष हा खरा महाराष्ट्रातील शेतीला शाप नसून पाण्याचा नेमका योजनापूर्वक वापर होण्यासाठी त्यामागील सखोल शास्त्रीय मीमांसा सार्वत्रिक होत नाही ही खरी आजची सर्वांत मोठी दुःखाची बाब आहे. खत ही झाडांना सततची असणारी गरज नसून फक्त झाडांच्या नवीन वाढीपुरतीच व तेव्हा तेवढीच खताची गरज असते. इतर खत जमिनीतून वाहून जाऊन अगर वर येऊन प्रदूषणाचे प्रश्न निर्माण करत असते. शिवाय अशी खते रासायनिक स्वरूपाची न वापरता स्थानिक परिसरातून जैविक प्रक्रियांचे विविध पर्याय उभे करून वापरणेच अधिक हितकारक व कमी खर्चिक ठरते. पण त्याचे उच्च दर्जाचे पायाशुद्ध विज्ञान आज आपण प्रसारात आणत नाही. कारण रासायनिक खत कारखान्यांचे जनसामान्यांच्या पिळवणुकीचे हितसंबंध त्यात खोलवर रुजलेले असतात. डेअरीनावे पशुखाद्याचे कारखाने काढणे हे आपण आज औद्योगिक प्रगतीचे लक्षण समजतो. पण उच्च उत्पादनातील सर्वांत खर्चिक भाग हा या पशुखाद्याचा आहे व स्थानिक परिसरातच अगदी नाममात्र खर्चात त्याहून सरस दर्जाचे पशुखाद्य दूधउत्पादक बनवू शकेल असे शास्त्र आज उपलब्ध आहे पण ते त्या अशिक्षित दूधउत्पादकांना समजू शकणार नाही म्हणून आज गुलदस्तांत ठेवले जाते. विज्ञानाच्या विरहस्वीकरणाची प्रक्रिया विविध स्वरूपाचे विज्ञानाचे मुक्त विद्यामंच उभे करून आपण उभे केले तर आपापल्या पाच गुंठ्याच्या पडीक परसदारांचा विकास करून अन्न, वस्त्र, जळण, निवारा, फळे, फळभाज्या, उच्च दर्जाचे प्राणिज अन्न पुरवणारे कोंबडी-शेळी-मेंढी-मत्स्य पालन व या उत्पादनासाठी लागणारे खत या सर्व खऱ्या सुबत्तेच्या सुविधा सार्वत्रिक करता याव्यात, असे प्रयोगपरिवारला आता अनेक प्रयोगनिष्कर्षांतून दिसून आले आहे. किंबहुना त्यासाठी आजपर्यंत एकाच ठिकाणी पाय रोवून वाढणारी स्थिर शेती विविध स्वरूपांत चल शेती करून सार्वत्रिक करता यावीच असे कार्यपर्याय अनेकांच्या प्रयोगसहकार्यातून प्रयोगपरिवार आज पुरे करीत आहे. वर्षभर अतिउत्तम सूर्यप्रकाश हे महाराष्ट्राचे सर्वांत मोठे वरदान आहे. या जोरावर महाराष्ट्राचे बघता बघता सवाई कॅलिफोर्नियात रूपांतर होण्यासारखे आहे.

" वैज्ञानिक कार्यकुले ' या बाबत थोडक्यात अधिक विवरण करून या लेखाचा समारोप करता येईल. जत येथील परिसंवादात सरकारला विनंती करताना नामदेव बापूंनी हा विचार पुसटता व ओझरता मांडल्याने त्यांना अभिप्रेत असणारा मूळ तपशील त्यात स्पष्ट झालेला नाही. पाच-पंचवीस गावांतून सरकारने हुशार व प्रयोगशील शेतकरी निवडावे ही भूमिका मांडताना त्यांच्या नजरेसमोर महा-



अनुक्रमणिका

राष्ट्रातील आपापल्या उत्पादनक्षेत्रात आपापल्या हिमतीवर पुढे येण्यासाठी धडपडणारा ठायी ठायी विखुरलेला जिज्ञासू, अभ्यासू, प्रयोगप्रेमी तेवढाच व्यक्तींचा गट नजरेसमोर होता. फुलेप्रगतीच्या वा एसबी ११ च्या भुईमुगाच्या एका दाण्यापासून चाळीस ते पन्नास शेंगा मिळत असतील, तर एका बी पासून ८० पट बिया बनतात; मग एक एकरात ४० किलो बीचा पेरा केला तर ३–३॥ टन हुकमी भुईमुग का घेता येऊ नये म्हणून धडपडणारे बार्शी तालुक्यातील ६५ वर्षाचे वयोवृद्ध यावळीचे श्री. घाटे, अगर वाई भागात अगर नाशिक-हडपसर भागात टोमॅटोचे एकरी साठ टन पीक घेणारे प्रयोगवीर अथवा स्ट्रॉबेरीसारख्या पिकात पहिल्याच वर्षीच्या लागवडीत रेकॉर्ड पीक घेणारे श्री. नलवडे यांसारखे प्रयोगवीर, डाळींबात यशस्वी ठरलेले सांगोल्याचे श्री. चांदणे व श्री. बेंद्रे व संगमनेरचे श्री. देशमूख, आंबा लागवडीत आपली नवीन पद्धती प्रमाणित करणारे वेंगुर्ल्याचे श्री. चमणकर यांसारखे वयोवृद्ध चिकूलागवडीत नवे पर्याय शोधण्यात रमलेले डहाणूचे बाफना पितापुत्र अथवा लिंबाच्या लागवडीत नव्याने यशस्वी पाऊल रोवलेले मोडलिंबचे थोरात अगर बार्शीतील कारीचे अनिल दबडे, केळी पिकाबाबत व भुसार पिकावर सखोल अभ्यास असलेले श्री. सकळे व श्री. विभाकर पाटील तर बोरलागवडीचा ध्यास घेतलेले श्री. बाबूलाल गांधी अथवा सलगरे, कवठे महांकाळ येथील भोगनुळीचे बोरलागवड व शेळीपालन यात यश मिळवणारे अजित घोरपडे, आय. आय. टी. चा रसायनशास्त्रातील उच्च अभ्यासक्रम पुरा केल्यावर नोकरीकडे पाठ फिरवून कृषि-विकासानावे पडीक जागेवर गुलाबलागवड करणारे व कोंबडीपालन व फळबागविकास यांचे पर्याय शोधण्यास धडपडणारे यतीन शहा किंवा ऊसलागवडीचे एकडोळा-तंत्र पुढे आणणारे श्री. बाबुराव फाळके अशा व्यक्तींचा शोध घेऊन त्यांना त्या त्या क्षेत्रांतील व त्या त्या क्षेत्रांशी संबधित असणाऱ्या विषयांतील आजवरचे उपलब्ध असणारे ज्ञानविज्ञान शासनाने वा कृषिविद्यापीठांनी उपलब्ध करून द्यावे. मग त्या बळावर आपल्या प्रयोगशक्तीने ते जे जे प्रायोगिक प्रकल्प उभे करतील ते त्या परिसरातील मर्यादेत यशस्वी ठरलेले प्रायोगिक प्रकल्प ठरतात, व यामुळे ते पाहून त्यांचे नेतृत्व घेत इतर शेतकरी तो विकासकार्यक्रम आपला म्हणून स्वीकारतात व त्यात पारिवारिक भावनेने सहभागी होतात.

अशा रीतीने फक्त ५/२५ प्रयोगवीर आपापल्या क्षेत्रात उभे राहिले तरी त्यांना मिळालेल्या सघन वैज्ञानिक बैठकीवर ते 'मुक्त विद्यापीठवजा' जन सामान्यांना मार्गदर्शन करू शकतात. एवढेच नव्हे तर त्यांनी त्याबाबतचा जो यशस्वी प्रत्यक्ष अनुभव उभा केलेला असतो तो अधिक प्रत्ययकारी ठरतो. त्यामुळे विविध उत्पादनक्षेत्रांत निवडक २५–२५ व्यक्ती हाताशी धरून उभी राहणारी वैज्ञानिक कार्यकुले महाराष्ट्रातील त्या त्या क्षेत्रातील विकासकार्यात प्रभावी कार्य करून दाखवतील. प्रयोगपरिवार आज या रीतीने द्राक्ष, आंबा, लिंबू, केळी, नारळ, डाळींब या क्षेत्रात यशस्वीपणे वाटचाल करीत आहे व नजीकच्या भविष्यकाळात या लेखाच्या सुरुवातीस नमूद केलेल्या जटिल प्रश्नांची पण यशस्वी सोडवणूक करण्यासाठी अनेक वैज्ञानिक तपशील आता प्रमाणित करत आहे.










# कॅस्टफोर्डचे महाराष्ट्रातील विज्ञान–विनियोगकार्य

अनुराधा चौधरी । रामचंद्र द. हणबर । बाळ द. टिळक

भारतातील सर्वांगीण ग्रामीण विकास हा विषय म्हणजे आपल्या देशापुढे असलेलं एक आव्हान आहे. एकीकडे विज्ञानक्षेत्रातली आघाडी, नवनवीन तंत्रज्ञानामुळे उजळलेलं झगझगीत आणि सुखमय जीवन आणि दुसरीकडे खेडयांमध्ये त्याच परंपरागत अंधारमय जीवनात बुडलेली जनता ! देशातलं आजचं शास्त्रीय संशोधन आणि तंत्रज्ञान शहरी जनतेच्या जीवनात दरदिवशी नवनवीन सुखसोयी निर्माण करुन त्यांचे जीवन केवळ अडचणींपासून मुक्तच नव्हे तर सुखासीनतेकडे झुकण्यास हातभार लावते आहे आणि खेडयात मात्र तेच पिण्याच्या पाण्याचे प्रश्न, लाकूडफाटयासाठी तीच वणवण, तेच अज्ञान दारिद्र्य, अंधश्रद्धा, रोगराई, कष्टाचं अवमूल्यन आणि आधुनिक साधनांची कमतरता……

शहरी आणि ग्रामीण जीवनांतली ही प्रचंड दरी मिटवली गेली पाहिजे. विज्ञान व तंत्रज्ञानाचा उपयोग ग्रामीण जनतेचं दैनंदिन कष्टप्रद जीवन सुखकारक बनविण्यासाठी, त्यांचं जीवनमान उंचविण्यासाठी होणे आवश्यक आहे. देशातल्या ग्रामीण आणि अविकसित भागातल्या खऱ्याखुऱ्या समस्या सातत्याने समजून घेणारी आणि त्या त्या समस्यांना योग्य ते शास्त्रीय आणि तांत्रिक उपाय सुचवणारी एखादी यंत्रणा किंवा संस्था असणे आवश्यक आहे. अशा प्रकारे कार्य करण्यासाठी एक छोटी यंत्रणा डॉ. बी. डी. टिळकांनी भारत सरकारच्या शास्त्र आणि तंत्रज्ञान विभागाच्या आर्थिक पाठिंब्याने पुण्याला कॅस्टफोर्ड ( सेंटर फॉर ॲप्लिकेशन ऑफ सायन्स अँन्ड टेक्नॉलॉजी फॉर रूरल डेव्हलपमेंट ) किंवा ग्राम विज्ञान विनियोग केंद्र या नावाने १९७८ साली सुरू केली. संस्थेच्या कार्यांची चार प्रमुख अंगे आहेत :

१. नैसर्गिक साधनसंपत्तीचा विकास.
२. सार्वजनिक उपयोगिता व समाजसेवा.
३. ग्रामीण भागात लघुउद्योगांचा विकास.
४. देशातील शास्त्रज्ञ, उद्योजक, सामाजिक संस्था व कार्यकर्ते यांमध्ये सुसंवाद निर्माण करणे व ग्रामीण विकासाच्या विविध उपक्रमांना प्रोत्साहन देणे.

कॅस्टफोर्डच्या यंत्रणेच्या माध्यमातून ग्रामीण विकासासाठी काही प्रयत्न हाती घेतलेले आहेत, त्यांतील काही प्रकल्पांचा येथे थोडक्यात उहापोह करत आहोत.

## १. इंधनबचतीची साधने

खेडेगावांतून घरगुती जळणासाठी मुख्यतः लाकडे, काटक्याकुटक्या, गोवऱ्या इ. वापरल्या जातात. त्यासाठी मोठ्या प्रमाणावर झाडाझुडपांची तोड केली जाते. दिवसेंदिवस इंधन मिळविणे फार कष्टकारक व जिकिरीचे होऊ लागले आहे. पुरेसे जळण मिळविण्यासाठी ग्रामीण जनतेला मैला–मैलाचा परिसर तुडवावा लागतो. आणि ह्याच वेगाने जंगलतोड, झाडतोड होत राहिली तर ही समस्या इतकी गंभीर होत जाणार आहे, की येत्या दशकात लोकांना अन्न शिजवायला इंधनच राहणार नाही. ह्या समस्येवर उपाय म्हणून देशभर पर्यायी इंधने वापरण्याचे, तसेच वनीकरणाचे प्रकल्प राबविले जात आहेत. त्याबरोबरच इंधनबचत करणारी साधनेही वापरल्यास देशाची इंधनसमस्या सोडवण्यास हातभार लावला जाईल ह्या उद्देशाने कॅस्टफोर्डने खालील इंधनबचत करणारी साधने पुढे आणली आहेत.

### अ) कॅस्टफोर्ड लक्ष्मी चूल

तीन दगडांच्या चुलीपासून ते वेगवेगळया संशोधकांनी तयार केलेल्या नव्या व सुधारित चुलींचा अभ्यास करून, प्रत्येक चुलीची वैशिष्टये तपासून, त्यांतील फायदे लक्षात घेऊन, प्रचलित चुलींमध्ये

अनुक्रमणिका

आवश्यक तेवढे बदल केलेले आहेत व सध्याच्या चुलीतील तोटे कमीत कमी करण्याचा व चुलीची कार्यक्षमता वाढविण्याचा प्रयत्न केला आहे.

चूल बरीचशी प्रचलित चुलीसारखीच आहे. मात्र त्यात, चुलीच्या तोंडाशी भांडे ठेवण्याच्या जागी खोबण, जळण ठेवण्याच्या जागी लोखंडी जाळी, चूल व वैल यांना जोडणारा तिरका रस्ता, वैलाचे आतील भागात उंचवटा, एक झडप, चिमणी ह्या योजना नवीन आहेत. ह्या प्रत्येकाचा स्वतंत्र फायदा आहे. जाळीमुळे इंधन जळताना होणारी राख खाली पडल्याने व ज़ाळीचे खालून मोकळी हवा मिळाल्याने इंधन व्यवस्थित जळते. चिमणीमुळे हवा खेचली जाऊन हवेचा प्रवाह खेळता राहतो व जळणाला चांगली मदत होते. वैलाच्या येथील उंचवटचाच्या रचनेमुळे चुलीतील गरम हवा उंचवटचाभोवती फिरवली जाते व तिथे काही काळ रेंगाळल्यामुळे त्या हवेतील उष्णतेचा पूर्ण उपयोग वैलावरील पदार्थ शिजवण्यालाही होतो. झडपेच्या कमीअधिक उघडण्यामुळे चुलीमध्ये घातलेले इंधन, जलद किंवा मंद वेगाने जळण्याची क्रिया नियंत्रित करता येते. चुलीच्या तोंडाची रचना विशिष्ट आहे. चुलीच्या तोंडावर भांडे पक्के बसत असल्याने भांडे व तोंड ह्यामधून उष्णता बाहेर वाया जात नाही त्यामुळे कार्यक्षमता वाढते. अशा प्रकारच्या चुली कुंभारांना व्यावसायिक उत्पादनाचे दृष्टीने फायदेशीर व्हाव्यात व बनविन्यास सुलभ जाव्यात, म्हणून चुलीचे साचे (मोल्ड) तयार करण्यात आले आहेत

**चुलीचे फायदे :–**१) कमीत कमी धूर म्हणून भांडी काळी कमी होतात. फुंकणी लागत नाही. २) प्रचलित चुलीपेक्षा २५% (रुपयात चार आणे) अधिक कार्यक्षमता. ३) शेतकरी जीवनात सहज उपलब्ध होऊ शकणारे टाकाऊ पदार्थ तसेच बारीक ढलप्या, बुरखुंडे, काटक्याकुटक्या, पालापाचोळा इ. सुद्धा इंधन म्हणून जळू शकते. ४) इंधन (लाकूडफाटा, जळण) नेहमीपेक्षा खूप कमी लागते. अर्थात गोळा करण्यासाठी लागणारा वेळ, कष्ट, पैसा या सर्वांत बचत होते.

## ब) उकडी:

स्वयंपाकात सर्वसामान्यपणे तांदूळ, तूर, मूग, मसूर इ. डाळी, फळभाज्या, पालेभाज्या, कडधान्ये, काही कंद एवढी सामग्री इच्छित पदार्थ तयार होण्यापूर्वी शिजविली जाते. वास्तविक पाहता शिजणाऱ्या पदार्थाला एकदा कढ आला की नंतर कितीही जास्त वेळ आच दिली तरी त्याचे तपमान वाढत नाही. याचाच अर्थ असा की उकळी फुटल्यानंतर कोणताही पदार्थ आपण जितका वेळ शिजविण्यासाठी ठेवतो तेवढी उष्णता वापरली जात नाही. या जादा दिल्या जाणाऱ्या उष्णतेची बचत करण्याचे "उकडी" हे एक सोपे साधन आहे.

उकडीमध्ये पदार्थांचे तपमान काही काळापर्यंत टिकवून ठेवले जाते. आपण शिजवीत असलेल्या पदार्थाला उकळी आल्यावर पाचएक मिनिटेच तो उकळत ठेवावा. त्यामुळे शिजणाऱ्या पदार्थाचे तपमान व पाण्याचे तपमान एकच होईल. यानंतर पदार्थ उकडीमध्ये झाकून ठेवावा. एक तासानंतर पदार्थ शिजून तयार असतो. उकडीमध्ये तासाभरात तपमान ७८° सें. पर्यंतच खाली येते. या तपमानाला तासाभरात बहुतेक सारे पदार्थ शिजतात. डाळ, तांदूळ आणि भाजी असे तीन पदार्थ उकळल्यानंतर एकदम किंवा एकानंतर एक उकडीत ठेवता येतात. मात्र शेवटचा जिन्नस ठेवल्यावर एक तासाने उकडी उघडावी. ३–४ तासानंतरही पदार्थ खाण्याजोगा गरम राहतो. [ तूर, हरभरा डाळ व वाटाणा इ. पदार्थ अगोदर ५–६ तास भिजत ठेऊन १५ मिनिटे उकळून मग उकडीत ठेवल्यास नीट शिजतात. ] शिजविण्यास ठेवलेला जिन्नस व उकडीच्या आतल्या टोपलीचे घनफळ हे प्रमाणात असावे लागते. ४–५ माणसांच्या स्वयंपाकासाठी बनविलेल्या उकडीत फार थोडा पदार्थ शिजावयास ठेवला तर तो शिजायचा नाही. पदार्थ थोडा असल्याने उरलेल्या मोकळ्या जागेत पदार्थाची उष्णता पसरून पदार्थाचे तपमान एकदम खाली येते. अर्थातच पाऊण तासाच्या आतच ते ७८° सें. चे खाली आल्याने पदार्थ शिजत नाही. उलट जिन्नस जेवढा अधिक तेवढा उष्णता पसरायला वाव कमी मिळून पदार्थाचे उष्णतामान पाऊण तास ७८° सें. पर्यंत टिकून राहते व जिन्नस जास्त असूनही तेवढ्या अवधीत शिजतो.

एकात एक बसणाऱ्या, आवळ तोंडाच्या दोन अशा टोपल्या घ्याव्यात की आतील टोपली बाहे-

अनुक्रमणिका

ऱ्या टोपलीपेक्षा एक ते दीड इंचाने सर्व बाजूने लहान असेल. दोन टोपल्यांच्या मधल्या जागेत कडबाकुट्टी / गवतकुट्टी / भाताचे तूस / लाकडाचा भुसा / शेंगांच्या फोलपटांची पूड अशा प्रकारचा कोणताही उष्णतारोधक पदार्थ सैलसर भरावा बाहेरची टोपली गोणपाटाने शिवून घ्यावी. तोंडावर घट्ट बसणारी बुरडी पालथी घालावी. बुरडीला गोणपाटाचे अस्तर लावावे. बुरडी आणि अस्तर यामध्ये उष्णतारोधक पदार्थ घालावेत. हे झाले झाकण.

अशी "उकडी" बुरडाकडून अगर कैकाडयाकडून मापाच्या टोपल्या व झाकण करून आणून घरीही बनविता येते. बुरडाकडून दोन टोपल्या विकत घेतल्यास खेडेगावामध्ये १० ते १५ रुपयांमध्ये सहज उपलब्ध होतील. बाकी सर्व आपल्या घरचेच असल्यामुळे काहीही खर्च करावा लागत नाही. शहरामध्ये अशा प्रकारची उकडी तयार होण्यास २५ ते ३० रुपये खर्च होतो. गोणपाटाऐवजी टोपलीच्या बाहेरून शेणाने लिंपून वर गेरूचा रंग लागल्यास खर्च कमी येऊन उकडी शोभिवंत दिसते. आपण स्वयंपाकासाठी कोणत्याही प्रकारचे इंधन वापरीत असलात तर केवळ या उकडीच्या उपयोगाने आज खर्च करीत असलेल्यापेक्षा १५ ते २०% इंधनाची बचत करता येते असे आम्ही केलेल्या प्रयोगातून दिसून आले आहे. विशेषत: ज्यांना प्रेशरकुकर घेणे शक्य नाही अशा लोकांना तर "उकडी" फारच फायदेशीर ठरणार आहे.

## क) कडे

स्वयंपाक व चहापाण्यासाठी आपण चूल, शेगडी, साधा अगर वातीचा स्टोव्ह, गॅसची शेगडी वापरतो. पदार्थ शिजविण्यासाठी लहान मोठ्या आणि वेगवेगळ्या आकाराची भांडी वापरली जातात. भांड्यांचे विविध प्रकार आणि चुलीचे तोंड ( चूल ही संज्ञा वरील सर्व प्रकारच्या साधनांसाठी वापरली आहे. ) या दोहोंमधल्या फटीमधून वास्तविक जी धग भांड्याला मिळायला पाहिजे ती बाजूला पसरत राहते आणि वाया जाते. ही वाया जाणारी उष्णता थोपवून उपयोगी आणण्यासाठी एक सुटसुटीत पत्र्याचे कडे बनविले आहे. हे कडे भांड्याच्या आकारापेक्षा (व्यास) अर्ध्या इंचाने तरी मोठे व उंचीला जरा लहान असावे. कडे आपल्या वापरातल्या चुलीवर बसण्यासाठी योग्य जागी त्याला खाचा पाडणे जरूर आहे. तसेच कड्यामधील भांडे सांडशीने उचलण्यासाठी कड्यास वरच्या बाजूसही एक खाच पाडणे सोईचे राहते. दांडीच्या भांड्यासाठीही या खाचेचा उपयोग होतो. वापरात असणाऱ्या लहान मोठ्या भांड्याच्या आकारानुसार दोनतीन कडी बनवावी लागतील.

घरातील रिकाम्या होणाऱ्या तेलाच्या व तुपाच्या डब्याची अशी कडी बनवून घेणे सहज शक्य आहे. कोणी उद्योजकाने अशी कडी बनविली तर १० ते १५ रुपयांत वेगवेगळ्या आकाराची दोनतीन कडी तयार होऊ शकतात.

प्रयोगामध्ये असे लक्षात आले आहे की, कडे वापरल्याने १५ ते २० टक्के पर्यंत उष्णतेची बचत होते. चुलीभोवती वारा खेळत असल्यास स्टोव्ह भडकतो, ज्योत हेलावते व जळण जास्त लागते. तथापि कड्याचा उपयोग केला तर वाऱ्यामुळे जळणाचा होणारा अपव्यय टाळता येतो. जिन्नस लवकर तापविता येतो, शिजतो. तेव्हा कडे आपण वापरल्यास वाऱ्याची खिडकी उघडी ठेवून आरामात हवेशीर वातावरणात स्वयंपाक करूनही जळणाची आपण बचत करू शकाल. उष्णता किती वाचते हे ठरविण्याचा प्रयोग अगदी सोपा आहे. घरतल्या स्टोव्ह/गॅस/शेगडी/चूल यांवर एक लिटर पाणी तापत ठेवले आणि उकळी फुटण्यासाठी त्याला किती वेळ लागला हे पाहिले. एवढेच पाणी कडे ठेवून उकळविले असता पूर्वीपेक्षा २० टक्के कमी वेळेत पाण्याला उकळी फुटली.

उकडी व कडे या दोन इंधनबचतीच्या साधनांचा वापर खेड्यापासून शहरापर्यंत सर्वांना चूल (मातीची अथवा गॅस अगर स्टोव्ह) कोणतीही असो, करणे सहज शक्य आहे. केवळ या दोन साधनांच्या वापराने आपण घरगुती इंधनाची ३० ते ४० बचत करु शकतो.

वरील तिन्ही इंधनबचतीच्या साधनांचा प्रसार महाराष्ट्रामध्ये खेडोपाडी होण्यासाठी शासनाकडून योजना नुकतीच मंजूर होऊन आलेली आहे. या योजनेमध्ये १२०० ग्रामीण व ३०० शहरी कुटुंबां-

मध्ये वरील साधनांचा स्वयंसेवी संस्थांच्या सहकार्याने प्रसार करावयाचा आहे. या उपक्रमामध्ये ग्रामीण परिसरातील कुंभार, बुरुड, पत्रेकारागीर यांना वरील साधने तयार करण्याचे प्रशिक्षण देण्यात येणार आहे.

याशिवाय पुणे जिल्ह्यात "एकात्मिक ग्रामीण ऊर्जा" प्रकल्पामध्ये संपूर्ण भोर तालुक्यात 'कॅस्टफोर्ड लक्ष्मी चुली' बसविण्याचा उपक्रम सुरू आहे. सदर उपक्रम जिल्हाधिकारी, पुणे यांच्या नियंत्रणाखाली राबविला जात असून कॅस्टफोर्ड या उपक्रमात तांत्रिक जाणकारी देत आहे व भोर येथे या संदर्भात कॅस्टफोर्ड सक्रीय सहकार्य करीत आहे. अशाच प्रकारे नाशिक जिल्ह्यातील सिन्नर तालुक्यामध्येही चुली बसविण्याचा कार्यक्रम लवकरच सुरू होत आहे.

## २. इमल्शन ११० आर रसायनाच्या साहाय्याने भाताचे पीकचक्र कमी करून उत्पादन वाढविणे :

रब्बी भाताचे पीक तयार होण्यास खरीप पिकापेक्षा जास्त कालावधी लागतो. त्यामुळे खरिपातील पिकासाठी जमिनीची मशागत करण्यास अवधी मिळत नाही. या समस्येचा विचार करून हायको कंपनीने तयार केलेल्या रसायनाच्या साहाय्याने भातपिकाचे आयुष्यमान ७ ते १० दिवस कमी करता येते व उत्पादनामध्ये १८ ते २०% वाढ होते. हा प्रकल्प गेली ३ वर्षे खोपोली, कर्जत, खुरसुंडी परिसरामध्ये चालू आहे. हैद्राबाद येथील आय.सी.ए.आर. (ICAR) च्या भात पीकसंशोधन संस्थेमध्ये (AICRIP) १९८३–८४ मध्ये या प्रकल्पासंबंधी प्रयोग हाती घेण्यात आलेले आहेत.

इमल्शन ११० आर या रसायनाचा खोडवा ऊस या पिकाच्या उत्पन्नावरती काही परिणाम होतो का याचे प्रयोग महाराष्ट्र शेती महामंडळाच्या सहकार्याने चालू आहेत. तसेच या रसायनाचा उपयोग इतर पिकांवरती उत्पादन वाढविण्यासाठी होतो का हे पाहण्यासाठी निंबकर कृषिसंशोधन संस्था, फलटण यांच्याकडे प्रकल्प देण्यात आला आहे. या संस्थेने मका, भेंडी, गहू, सूर्यफूल, करडई या पिकांवरती वरील रसायनाचा वापर केल्यामुळे उत्पादनामध्ये २० ते २५% वाढ होते हे १९८३–८४ मध्ये केलेल्या प्रयोगाने सिद्ध केले आहे.

देशात आजवर हरितक्रांती गव्हापुरती मर्यादित राहिली आहे. आता हायको इमल्शन ११० आर (HICO Emulsion 110 R) च्या उपयोगाने इतर पिकांतही अशी उत्पादनक्रांती घडवून आणण्याची शक्यता निर्माण झाली आहे. विशेषतः भारताप्रमाणेच सगळ्या जगातही भात खाणाऱ्यांची संख्या सर्वांत अधिक असल्याने भारताचे उत्पादन वाढविता येण्याच्या दृष्टीने जागतिक पातळीवर प्रयत्न चालू आहेत. त्या दृष्टीने कॅस्टफोर्डचे भाताच्या उत्पादनात भरीव वाढ करण्याचे हे आजचे प्राथमिक स्वरूपाचे प्रयोग जागतिक दृष्टचाही लक्षवेधी ठरण्याचा संभव आहे.

## ३. इमल्शन ११० आर या रसायनाच्या साहाय्याने बाष्पीभवनामुळे वाया जाणारे पाणी वाचविणे :

पाझर तलाव व इतर लहान बंधाऱ्यांतील पाणी बाष्पीभवनाने वाया जाते व त्यामुळे उन्हाळ्यामध्ये शेतीला व पिण्यास पाणी कमी पडते. ही समस्या लक्षात घेऊन राष्ट्रीय रासायनिक प्रयोगशाळा, पुणे ह्यांनी संशोधन केलेल्या रसायनाचा "हायको" कंपनीच्या साहाय्याने प्रथम पुणे जिल्ह्यातील "इंदिरा तळ्यावरती" प्रयोग करून या तळ्यातील बाष्पीभवनाने वाया जाणारे ३० ते ३५% पाणी वाचवून त्याचा उपयोग उन्हाळी पिकासाठी व पिण्यासाठी करण्यात आला होता. तसेच झाशी येथील तळ्यावरती या रसायनाचा वापर करून १९७९–८० च्या दुष्काळामध्ये पिण्यासाठी पाणी उपलब्ध झाले होते. महाराष्ट्र शासनाच्या पाटबंधारे खात्याच्या विनंतीवरून मे १९८३ मध्ये औरंगाबाद जिल्ह्यातील ढेकू व अंबाडी या तळ्यांवरती वरील रसायनाचा प्रयोग करून अनुक्रमे ते २९ व १९ टक्के पाणी वाचविण्यात आले होते.

महाराष्ट्र शासनाच्या साहाय्याने महाराष्ट्रातील १३ जिल्ह्यांमध्ये हा प्रकल्प मोठ्या प्रमाणात सुरू करण्याचा प्रयत्न कॅस्टफोर्डच्या प्रेरणेने "हायको" कंपनी करीत आहे.

अनुक्रमणिका

**४. बंद पडलेल्या कूपनलिका "सल्फामिक ॲसिड" या रसायनाच्या साहाय्याने पूर्ववत चालू करणे :**

गुजराथ, उत्तर प्रदेश, पंजाब, बिहार व हरियाणा येथील जमिनीमध्ये अल्युव्हिअल मातीचे प्रमाण जास्त आहे. येथील शेतीच्या पाण्यासाठी खोदलेल्या कूपनलिका जमिनीतील कॅल्शियम व मॅग्नेशिअम क्षारांच्या आधिक्यामुळे काही काळानंतर बंद पडून शेतकऱ्यांचा लाखो रुपयांचा खर्च वाया गेला आहे. या विहिरी पूर्ववत चालू करण्यासाठी कॅस्टफोर्डने गुजराथ अभियांत्रिकी संशोधन संस्था, बडोदा व राष्ट्रीय रासायनिक प्रयोगशाळा, पुणे यांच्या सहकार्याने गुजराथमधील सिनोर तालुक्यातील बवालिया खेड्यातील एका विहिरीवर प्रयोग करून ती विहीर पूर्ववत चालू केली आहे. यासाठी फक्त रु. १२००/– पर्यंत खर्च आला होता. उत्तरप्रदेश व हरियाणा शासनाच्या पाटबंधारे खात्याच्या विनंतीवरून कॅस्टफोर्डच्या प्रेरणेने धरमजी मोरारजी केमिकल कंपनीने तेथील विहिरी वरील रसायनाच्या साहाय्याने पूर्ववत चालू केल्या आहेत. रसायन वापरण्यापूर्वी येथील विहीरीतून ताशी ३००० गॅलन पाणी बाहेर पडत होते. रसायन वापरल्यानंतर हेच प्रमाण ताशी २९००० गॅलनवर गेले. यावरून या प्रयोगाचे महत्त्व लक्षात येण्यासारखे आहे.

वरील रसायन धरमजी मोरारजी केमिकल कंपनी, मुंबई सध्या तयार करत आहे. या कंपनीच्या सहकार्याने नॉर्थ ईस्ट रेल्वेच्या बंद पडलेल्या कूपनलिका पूर्ववत चालू करण्याची योजना सुरू होत आहे.

**५. अग्निरोधक व जलनिरोधक गवताचे छप्पर :**

उन्हाळ्यामध्ये डोंगरभागात तसेच आदिवासी भागामध्ये असणाऱ्या झावळ्यांच्या किंवा गवताच्या छप्परांना आग लागण्याचा संभव जास्त असतो. आदिवासी भागामध्ये तर सर्रास झोपड्या या गवताच्या किंवा झावळ्यांच्या असतात. एक झोपडी पेटली तर संपूर्ण वस्तीच आगीच्या आहारी जाते.

वरील समस्येचा विचार करून केंद्रीय भवन अनुसंधान संस्थान, रुरकी ( उत्तरप्रदेश ) यांच्या सहकार्याने ठाणे जिल्ह्यातील देवबांध येथे, त्या परिसरातील साधनसामग्रीचा उपयोग करून अग्निरोधक व जलनिरोधक छप्पर बांधले आहे. गेली ३ वर्षे ठाणे जिल्ह्यातील १२५ इंच पावसामध्ये ते छप्पर अगदी उत्तम राहिले आहे. छपराची आयुष्यमर्यादा ७–८ वर्षांची असेल असा अंदाज आहे. अशा छपरात ४० स्वेअर मीटरला ६०० ते ८०० रु. खर्च येतो.

या उपक्रमाचा प्रसार सर्वत्र होण्यासाठी अशा प्रकारच्या झोपड्या तलातरी, खानापूर, भुकूम येथे तयार करण्याची योजना नुकतीच शासनाकडे पाठविलेली आहे.

**६. एक नवी पौष्टिक भाजी–चौधारी घेवडा :**

ग्रामीण परिसरातील गरीब जनतेच्या आहारामध्ये प्रोटीन्सचे [ प्रथिने ] प्रमाण वाढविण्यासाठी कॅस्टफोर्डने या वेलवर्गामधील फळभाजीचा गेली ५ वर्षे प्रसार चालविला आहे.

हा घेवडा वेलवर्गातील असून याच्या कोवळ्या पानांची, फुलांची, कोवळ्या शेंगांची भाजी करता येते. तसेच जून दाण्यांची उसळ करता येते. एकदा लावलेल्या बियांचा वेल तीन वर्षांपर्यंत राहतो. मुळांना रताळ्यासारखे कंद वाढलेले असतात. तेसुद्धा रताळ्यासारखे उकडून किंवा भाजून खाता येतात.

चौधारी घेवड्यापासून विविध पाककृती बनवून त्यांद्वारे चौधारी घेवडा ग्रामीण व शहरी भागांत लोकप्रिय करण्याचा उपक्रमही कॅस्टफोर्डने एस्. एन्. डी. टी. कॉलेज ऑफ होमसायन्स, पुणे ह्यांच्या सहकार्याने पार पाडला. या उपक्रमामध्ये चौधारी घेवड्याच्या पाने, फुले, शेंगा, दाणे यांपासून वेगवेगळे पदार्थ– उदा. कोशिंबिरी, उसळी, भाज्या, इ. बनविले गेले. तसेच चौधारी घेवड्याच्या दाण्याचे पीठ काही लोकप्रिय पदार्थांमध्ये उदा. ढोकळा, म्हैसूरपाक, मुठीया, ठेपले इत्यादींमध्ये चण्याच्या डाळीच्या पिठाऐवजी वापरून पाहिले व हे पदार्थ कॉलेजच्या उपहारगृहामध्ये विक्रीस ठेवून त्यांना मिळणारा प्रतिसाद अजमाविण्यात आला.

ग्रामीण भागात, आदिवासी भागात व शहरांतूनही चौधारी घेवड्याचे बी पुरविण्यात आले व सर्व भागांतून त्यांच्या प्रतिक्रिया व अहवालही मागवून घेतले गेले. या अहवालांवरून कॅस्टफोर्ड अशा निष्कर्षाप्रत आले आहे, की आदिवासी भागातील लोक चौधारी घेवडा परसातील भाजी म्हणून नियमितपणे लावतात. परसभाजी म्हणून ग्रामीण व शहरी भागांतही याचा उपयोग लोक करतात. मात्र याची मर्यादा तेवढीच राहील. व्यापारी तत्त्वावर ही भाजी काढणे फायदेशीर ठरत नाही.

### ७. भारतीय खेड्यातील पिण्याच्या पाण्याचे गुणधर्म आणि त्यामुळे होणारा आतड्यांच्या रोगाचा प्रादुर्भाव :

दुषित/अशुद्ध पाणी पिण्यामुळे होणाऱ्या रोगांवर काही प्रतिबंधक उपाय सुचविता येतील का या उद्दिष्टाने जामखेड येथे ग्रामीण आरोग्य प्रकल्प (कॉम्प्रिहेन्सिव्ह रूरल हेल्थ प्रॉजेक्ट) व विज्ञान-वर्धिनी [ MACS ] पुणे यांच्या सहकार्याने कॅस्टफोर्डने एक प्रकल्प १९८१ मध्ये हाती घेतला. नेमके कोणते पाणी पिण्याने रोगांचा प्रादुर्भाव अधिक होतो याचा शोध घेणे यासाठी आवश्यक होते. म्हणून जामखेड व आसपासच्या परिसरातील ९ खेड्यांतील पिण्याच्या पाण्याचे नमुने घेण्यात आले. दर महिन्यास पिण्याच्या पाण्याच्या उघड्या विहिरी, कूपनलिका, घरातील साठविलेले पिण्याचे पाणी अशा निरनिराळ्या प्रकारे पिण्याच्या पाण्याचे नमुने घेण्यात आले. तसेच जामखेड येथील आरोग्य-केंद्रामध्ये येणाऱ्या रोग्यांचे रोगाविषयीचे अहवाल व सांख्यिकी माहिती आणि पाण्याचे विश्लेषण यांवरून प्रयोगाचे उद्दिष्ट सिद्ध झाले. हाती आलेल्या अहवालांच्या तौलनिक निरीक्षणावरून असा प्राथमिक निष्कर्ष निघाला, की जेथे उघड्या विहिरीतील पाणी पिण्यासाठी वापरले जाते, तेथे पाण्यापासून होणाऱ्या रोगांनी आजारी असलेल्या रोग्यांची संख्या अधिक आढळली व जेथे कूपनलिका आहेत तेथे अशा रोग्यांची संख्या कमी होती. घरातील साठवलेले पाणी पिण्यामुळेही बऱ्याच जणांना अशा रोगाची लागण झाली होती. पाण्याच्या नमुन्यांच्या विश्लेषणावरून असे सिद्ध झाले, की उघड्या विहिरीतील पाणी कचरा व धूळीमुळे दूषित होते, कूपनलिकेतील पाणी झाकलेले असल्याने बऱ्याच अंशी शुद्ध राहते. मात्र घरातील साठवलेले पाणी झाकलेले असूनही हातांच्या व अस्वच्छ भांड्यांच्या संपर्कामुळे दूषित होते व अशा रीतीने दूषित पाण्यापासून रोगांचा प्रादुर्भाव होतो.

वरील प्रकल्पाबरोबरच कॅस्टफोर्डचे अजून काही उपक्रम आहेत. उदा. वनीकरण, मशरूम (आळंबी) लागवड, पाणी शुद्धीकरण, आधुनिक तंत्रज्ञानाने जास्त ताकदीच्या मातीच्या विटा तयार करणे, मत्स्योत्पादन, ग्राम विज्ञान मंडळे इत्यादी.

वरील प्रकल्पांच्या विवेचनावरून हे लक्षात येईल, की कॅस्टफोर्ड देशातील ग्रामीण आणि अविकसित भागांतल्या खऱ्याखुऱ्या समस्या जाणून घेऊन त्यांची शास्त्रीय व तांत्रिक बाजू समजावून घेऊन योग्य त्या शास्त्रज्ञांबरोबर अगर तंत्रज्ञांबरोबर विशिष्ट परिभाषेत मांडून, देशातील विविध क्षेत्रांतले तज्ञ लोक आणि ग्रामीण भागांतील लोक यांच्यामध्ये सातत्याने संपर्क साधण्याचा प्रयत्न करीत आहे, जेणेकरून ग्रामीण जनतेचा विकास होऊन त्यांचे रोजचे जीवनमान अधिक समृद्ध होईल.





अनुक्रमणिका








# महाराष्ट्रातील जातीय हिंसाचार : सैद्धांतिक व व्यावहारिक स्वरूप

सुनिल शंकरराव आडगांवकर

स्वातंत्र्योत्तर काळात, महाराष्ट्रातही जातीय हिंसाचाराचे प्रसंग वेळोवेळी उद्‌भवले आहेत. अर्थात हे सर्व प्रसंग परिस्थितीनुरूप घडले. महात्मा गांधी-वधानंतर महाराष्ट्रात राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या ब्राह्मण नेत्यांवर व कार्यकर्त्यांवर हल्ले झाले. त्या वेळी जाळपोळीचे व लुटालुटीचे प्रयत्न झाले. त्यानंतर मराठवाडा विद्यापीठाच्या नामांतराच्या प्रश्नावर जातीय हिंसाचाराचे उग्र सार्वजनिक स्वरूप प्रत्ययास आले. ह्या दोन प्रसंगांचा अपवाद वगळता जातीय हिंसाचार कधी व्यक्तिगत पातळीवर तर कधी दोन जातींच्या गटांत नेहमी पाहवयास मिळतो. कधीकधी एकाच जातीतील दोन गटांत विविध कारणांमुळे हिंसाचाराचे प्रसंग उद्‌भवतात. ग्रामीण राजकारणात तर जातीय हिंसाचार वेळोवेळी पाहवयास मिळतो. या जातीय हिंसाचाराच्या मागे पद्धतशीर तत्त्वप्रणाली आहे का? या जातीय हिंसाचाराची पाळेमुळे येथील स्वातंत्र्यपूर्व काळातील हिंसाचाराच्या तात्त्विक समर्थनात सापडतात का? महाराष्ट्रातील दहशतवादी क्रांतिकारकाच्या व जहालवादाच्या प्रतिकाराच्या तत्त्वज्ञानाचा या जातीय हिंसाचाराला वारसा लाभला आहे का? जातीय व सांप्रदायिक शक्तिप्रवाहाचा परिणाम म्हणून हा जातीय हिंसाचार प्रभावी ठरत आहे का? आदी प्रश्नांचा विचार करणे येथे सयुक्तिक ठरेल. स्वातंत्र्यपूर्व काळात मुंबई प्रांतातील जहालवादी गटाचे नेते लोकमान्य टिळक यांनी प्रतिकाराच्या तत्त्वज्ञानाला सैद्धान्तिक आधार म्हणून मराठी इतिहासाच्या काही घटनांचा आणि महाभारत–गीतेच्या तत्त्वज्ञानाचा उपयोग करून घेतला व हिंसाचाराचे तात्त्विक समर्थन केले. लोकमान्य टिळकांच्या मते, निःस्वार्थ वृत्तीने व आदर्श उद्दिष्टांच्या प्रेरणेने केलेला हिंसाचार समर्थनीय ठरतो. त्यांच्या मते, शिवाजीने अफजलखानाचा वध केला यात शिवाजीने पापकर्म केले असे म्हणता येईल का? गीतेमध्ये श्रीकृष्णाने अर्जुनाला उपदेश केला की, जर निःस्वार्थ वृत्तीने व दुष्टाचा नायनाट करण्यासाठी आप्तजनांचा व गुरुजनांचा संहार केला तर कोणताही दोष नाही.[1] सारांश, टिळकांनी प्रथम दुष्ट प्रवृत्तीच्या प्रतिकारासाठी व आदर्श ध्येयासाठी केलेल्या प्रयत्नात हिंसाचाराचे तात्त्विक समर्थन केले व प्रतिकाराचे शस्त्र वापरताना सर्वसामान्य नीतितत्त्वे आणि साधनशुचितेच्या तत्त्वांना दुय्यम स्थान दिले. अर्थात लोकमान्य टिळकांना दहशतवादी क्रांतिकारांचे मार्ग मान्य नव्हते. परंतु प्रतिकाराचे शस्त्र वापरताना हिंसाचार समर्थनीय ठरतो, असे त्यांनी सूचित केले. त्यानंतर महाराष्ट्रातील हिंदुत्ववादी क्रांतिकारकांनी आदर्श ध्येयासाठी (स्वातंत्र्यासाठी) हिंसाचार समर्थनीय ठरतो असे स्पष्ट केले. अर्थात सामाजिक गुलामगिरीतून मुक्त होण्यासाठी हिंसाचाराचा मार्ग स्वीकारावा असे कोणीही सांगितले नाही.

## सांप्रदायिक हिंसाचाराचे समर्थन

महाराष्ट्रातील बहुसंख्याक हिंदू संप्रदायात व मुस्लिम संप्रदायात प्रतिकारासाठी हिंसाचार समर्थनीय ठरतो अशी शिकवण देणारी सांप्रदायिक परंपरा आहे. या परंपरेला धर्मतत्त्वाचा आधार देण्यात आला आहे. त्यामुळे हिन्दु-मुस्लिम समाजात हिंसाचाराच्या तत्त्वज्ञानाचा आधार सांप्रदायिक गटाचे नेते घेतात. उदा. गीतेतील तत्त्वज्ञानानुसार अन्याय, जुलूम आणि दुष्टपणा यांसारख्या अधर्म प्रवृत्तीविरुद्ध सशर्त संघर्ष करणे हे दैवी कर्तव्य आहे असे सूचित करण्यात आले आहे. तर मुस्लिम समाजातील लोकांना असे आवाहन करण्यात येते की, दरूल अमान हे इस्लामी राज्य असून येथे कुराणच्या आदेशानुसार राज्यकारभार चालतो म्हणून या राज्यातील लोकांनी राज्याशी एकनिष्ठ










राहिले पाहिजे तर दरुल हर्ब हे इस्लामविरोधी राज्य असल्यामुळे मुसलमानांनी अशा राज्यांविरुद्ध संघर्ष दिला पाहिजे.[२] अशा प्रकारे हिंसाचाराला धार्मिक अधिष्ठान प्राप्त झाले असल्यामुळे हिंसाचाराने पवित्र स्वरूप धारण केले आहे. त्यातूनच लोकांचा हिंसाचाराकडे पाहण्याचा मानसिक दृष्टिकोन तयार झाला आहे.

## राजकीय हिंसाचार

जातीयवादी राजकारणात "राजकीय हिंसाचार" टाळता येणे शक्य नाही अशा प्रसंगी, सर्वसाधारणपणे राजकीय हिंसाचार हा हेतुपूर्ण असतो. जनता विशिष्ट उद्दिष्टांची पूर्तता करण्यासाठी हिंसाचार करते. जनतेला असे वाटत असते की, हिंसाचाराशिवाय इतर अन्य मार्गाने ही उद्दिष्टये गाठता येणार नाहीत.[३] हिंसाचाराने काही गोष्टी साध्य करता येतील असे गृहीत धरून स्थानिक राजकारणात तसेच जातीय राजकारणात हिंसाचाराचा मार्ग अवलंबला जातो. अनुसूचित जातिजमाती, विशेषत: वन्य जमातीतील लोक राजकीय क्षेत्रात हिंसाचाराचे समर्थन करताना दोन मुद्दे उपस्थित करतात.

एक– दडपशाहीला विरोध करण्यासाठी, तक्रारीचे निवारण करण्यासाठी आणि सामाजिक न्याय प्रस्थापित करण्यासाठी हिंसाचाराचे तंत्र वापरणे आवश्यक ठरते. दुसरा–आपले भवितव्य सुधारण्यासाठी हिंसाचार समर्थनीय ठरतो म्हणून हिंसाचार विध्वंसक असला तरी हिंसाचाराला विधायक बाजू असते.[४] अर्थात राजकीय हिंसाचाराची किंमत मोजूनही त्यातून निश्चित फायदे मिळतील अशी खात्री नसते.[५] जातीय राजकारणात हिंसाचार करणाऱ्यांना राजकीय फायदे मिळतातच असे नाही. अनेकदा या फायद्यांपेक्षा जास्त किंमत त्यांना मोजावी लागते. जातीय राजकारणात हिंसाचाराचे लक्ष्य मालमत्तेऐवजी व्यक्ती किंवा व्यक्तिसमूह हे असते. राजकीय हिंसाचाराचे तंत्र नेहमी कोणा एकाविरुद्ध किंवा गटाविरूद्ध किंवा एका लोकसमूहाविरुद्ध वापरले जाते.[६] मराठवाडा विद्यापीठ नामांतरावर झालेल्या हिंसक आंदोलनात दलित जातीतील लोकांवर मोठ्या प्रमाणावर हल्ले झाले.

ग्रामीण भागातील जातीय राजकारणात प्रभावी गटाचे नेते राजकीय हिंसाचाराचे तंत्र वापरतात. राजकीय विरोध नष्ट करणे, विरोधकांचे मतभेदांचे मुद्दे दडपून टाकणे किंवा विरोधी मतप्रणाली निष्प्रभ करण्यासाठी हिंसाचाराचा वापर केला जातो.[७]

## पुरोगामी शक्तिप्रवाहाची दुर्बलता

जातिव्यवस्थेतील सामाजिक संरचना बदलण्यासाठी परिवर्तनाचे साधन म्हणून सामाजिक चळवळीत हिंसाचाराचा वापर झाला आहे असे म्हणता येत नाही. मंदिरप्रवेश, सामुदायिक विहिरीवर अस्पृश्यांना पाणी भरण्याची समान संधी अशा सामाजिक प्रश्नांवर कधीकधी शारीरिक हल्ले करणे, धमक्या देणे व इतर शिक्षा देणे हे प्रकार खेड्यांत घडून येतात. सामाजिक दर्जा व प्रतिष्ठेबाबतची श्रेष्ठत्वाची भावना, सत्ताकांक्षा या प्रेरणेने दलित जातीतील लोकांवर अत्याचार करण्याची प्रवृत्ती आढळून येते. अशा हिंसाचाराचा वापर दलित जातीतील लोकांना धडा शिकविण्यासाठी केला जातो. अर्थात त्यातून सामाजिक व राजकीय वर्तनावर प्रभाव पडू शकतो. राजकीय क्षेत्रात दलित नेते व कार्यकर्ते स्पर्धा करताना विशेष काळजी घेतात. विशेषत: प्रभावी जातीच्या गटाच्या निहित स्वार्थाला एकदम धोका निर्माण करण्याचे धाडस अनुसूचित जातिजमातीचे लोक करू शकत नाहीत. सारांश, महाराष्ट्रातील जातीय हिंसाचार परिवर्तनाचे साधन तर बनत नाहीच; परंतु जुन्या व्यवस्थेचे संवर्धन करण्यासाठी व पुरोगामी शक्तिप्रवाहांना निष्प्रभ करण्यासाठी जातीय हिंसाचाराचा वापर केला जातो समाजव्यवस्थेतील वरचढ जातीचे वर्चस्व कायम रहावे म्हणून जातीय राजकारणात हिंसक कृत्यांना प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे प्रोत्साहन दिले जाते. वरचढ जातीतील लोकांच्या वर्चस्वाला कंटाळून किंवा त्यांनी केलेल्या अत्याचाराला प्रतिउत्तर म्हणून अनुसूचित जाती किंवा वन्य जमाती बंडखोर वृत्ती दाखवतात. ही त्यांची बंडखोर वृत्ती प्रभावी नसली तरी मधून मधून या वृत्तीतून उद्रेक होतात. कारण अरेन्ड यांनी म्हटल्याप्रमाणे जुलमाविरुद्ध आणि मुक्ततेसाठी बंड अथवा उठाव होण्याची शक्यता असते.[८] अर्थात अशा प्रकारचे उठाव वन्यजमातीच्या प्रदेशात जितक्या

अनुक्रमणिका

मोठ्या प्रमाणावर झाले तितक्या मोठ्या प्रमाणावर हे उठाव येथे झालेले नाही (उदा. मिझोराम, नागालँड, आसाम). परंतु कधी कधी जातीय राजकारणात हिंसक कृत्ये घडतात अथवा घडवून आणली जातात. परंतु त्यातून मोठी हिंसक चळवळ निर्माण होत नाही. कारण या हिंसाचारात सहभागी झालेल्या लोकांनी गुप्त संघटना उभारलेल्या नसतात. तसेच गनिमी युद्धाचे तंत्र सातत्याने वापरलेले नसते. म्हणून जातीय हिंसाचार हा येथे व्यापक स्वरूप अथवा गंभीर स्वरूप धारण करू शकत नाही.

जातीय हिंसाचार भिन्न स्वरूप धारण करू शकतो. विन्टर आणि वेलोस यांनी म्हटल्याप्रमाणे, हिंसाचार म्हणजे केवळ शारीरिक इजा पोहोचविणे अथवा शिक्षा करणे असे नाही. त्यात अहिंसक म्हणजे प्रत्यक्ष शरीरावर हल्ला न करता मानसिक यातना देणे हाही उद्देश असतो. त्यामुळे शारीरिक हल्ल्यापेक्षा जास्त इजा अथवा हानी करणे शक्य होते. परिणामत: लोकांना अधिक दुबळे बनविता येते दहशत, धमक्या, अनिश्चिततेचे वातावरण आणि मानवी प्रतिष्ठा नाकारणे आदी मार्गांनी शारीरिक इजेपेक्षा जास्त हानी पोहोचविता येणे शक्य आहे.[९] जातीय हिंसाचारात प्रत्यक्ष हिंसेपेक्षा इतर मार्गांनी दलितांना त्रास देण्याचा प्रयत्न केला जातो.

जातिव्यवस्थेतील जातीय संघर्षाची आर्थिक बाजू लक्षात घेणे योग्य ठरेल. कारण जातीय हिंसाचार जसे राजकीय हिंसाचाराचे रूप धारण करू शकतो, त्याचप्रमाणे या राजकीय हिंसाचारात आर्थिक पिळवणूक हा उद्देश असू शकतो. कारण विषम व्यवस्थेवर आधारित जातिसंघटनेत वरचढ व आर्थिकदृष्ट्या संपन्न जाती आर्थिकदृष्ट्या दुर्बल जातींतील लोकांचे शोषण करतात व त्यातून संघर्ष उद्भवतात. कार्ल मार्क्सने आर्थिक परिस्थिती आणि आर्थिक बदल ही राजकीय हिंसाचाराची प्रमुख कारणे म्हणून सांगितली होती.[१०] जातीय संघर्षाचा आर्थिक संदर्भ लक्षात घेताना दलित जातीचे होणारे आर्थिक शोषण व त्यातून निर्माण होणारा असंतोष याची दखल घ्यावीच लागते. कारण राजकीयदृष्ट्या वरचढ जाती राजकीय सत्तेच्या जोरावर आर्थिक सत्ता प्राप्त करतात व आर्थिक सत्तेच्या बळावर दलित जातीचे शोषण करतात.

महाराष्ट्रातील जातीय हिंसाचारात दहशतवादी नेते व कार्यकर्ते सक्रीय असले तरी, या हिंसाचाराला दहशतवादी चळवळीचा एक भाग म्हणून मान्यता देता येणार नाही. अर्थात हिंसाचार ही प्रतीकात्मक कृती असते. हिंसाचाराची धमकी देऊन अथवा हिंसक कृती करून राजकीय वर्तणुकीवर प्रभाव टाकता येतो.'' परंतु महाराष्ट्रातील जातीय हिंसाचारामागे फार मोठे उदात्त तत्त्व नाही अथवा फार मोठ्या सार्वजनिक उद्दिष्टांसाठी हिंसाचाराचा मार्ग स्वीकारला जातो असे म्हणता येत नाही. व्यक्तिगत हेवेदावे, सत्ताकांक्षा व निहित स्वार्थ यांसाठी हिंसक कृत्ये केली जातात.

## हिंसक कृत्याचे लक्ष्य

महाराष्ट्रात तरी अलीकडे मराठवाडा विद्यापीठ नामांतर आंदोलनातच जातीय हिंसाचार प्रादेशिक पातळीवर दिसून आला. मराठवाड्याचे पाच जिल्हे व महाराष्ट्रात या मोहिमेला सक्रीय पाठिंबा दाखविणाऱ्या इतर गटांनी आंदोलनात हिंसक कृत्ये केली. अशा प्रसंगी सार्वजनिक व्यक्ती आणि स्थळे ही हिंसेची लक्ष्य बनतात. रेड रॉबर्ट गुरू यांनी स्पष्ट केल्याप्रमाणे आंदोलनातील दहशतवादी गट, सार्वजनिक इमारती, खाजगी व्यापारी-उद्योगसंस्था, सार्वजनिक क्षेत्रातील नेते, पोलीस आणि राजकीय शत्रू यांनाच आपल्या हिंसक कृत्याचे लक्ष बनवितो.[१२] मराठवाडा विद्यापीठ नामांतर मागणीसाठी झालेल्या आंदोलनात नामांतरवादी व नामांतरविरोधी गटांनी राजकीय नेत्यांपेक्षा सार्वजनिक मालमत्तेवरच हल्ले केले. कारण या काळात काही प्रमुख आमदार व खासदार हेतुपुरस्सर मराठवाड्याबाहेर राहिले. ज्या वेळी आंदोलनाने गंभीर स्वरूप धारण केले, त्या वेळी मंत्री व पक्षसंघटनेतील नेते यांनी या विभागाला भेट देण्याचे टाळले व इतर नेत्यांनी पडद्याआड राहून या आंदोलनाला विरोध व साहाय्य केले.

## मागण्यांच्या पूर्ततेसाठी आखलेले डावपेच

सार्वजनिक प्रश्न अथवा सार्वजनिक मागणीसाठी ज्या वेळी आंदोलन उभारले जाते, त्या वेळी राजकीय पातळीवरून प्रयत्न केले जातात. आंदोलनाला वैध

अनुक्रमणिका

स्वरूप प्राप्त व्हावे म्हणून एका बाजूने वैधानिक स्वरूपात मागण्यांची पूर्तता व्हावी म्हणून प्रयत्न केले जातात, तर दुसऱ्या बाजूने मागणीच्या मागे राजकीय शक्तिप्रवाह उभा करण्याचा प्रयत्न केला जातो. अशा वेळी विधिमंडळाची कृती आणि लोकमताचा दबाव यांत सांगड घालण्याचा प्रयत्न केला जातो. जातीय वा सांप्रदायिक मागण्या व तत्संबंधीची आंदोलने यांत वैशिष्ट्यपूर्ण डावपेच आखले जातात. याचे एक चांगले उदाहरण म्हणून मराठवाडा विद्यापीठ नामांतराचा प्रश्न सांगता येईल. मराठवाडा विद्यापीठ नामांतराला अनुकूल असा ठराव महाराष्ट्राच्या विधिमंडळात सर्वसंमतीने मांडण्यात आला व त्यानंतर नामांतरवादी व नामांतरविरोधी नेत्यांनी लोकमताचा दबाव आणण्यासाठी जातीयवादावर आधारित आंदोलन उभारले. वेनर मॅरान यांनी अशा प्रकारच्या डावपेचाचे विश्लेषण करताना निष्कर्ष काढला होता की, सत्याग्रह आणि आंदोलन हे विधिमंडळाच्या कृतीबाबत अधिक प्रभावी ठरतात. विधिमंडळातील युक्तिवादाला आंदोलनाची किंवा सत्याग्रहाची जोड दिल्याशिवाय विधिमंडळाची कृती प्रभावी (अथवा निष्प्रभ) बनविता येत नाही. अशा प्रसंगी शासनाचा अनुनय करण्यापेक्षा शासनावर लोकमताचा दबाव आणण्याचा प्रभावी मार्ग अवलंबला जातो.[१३] मराठवाडा विद्यापीठ नामांतराच्या प्रश्नाबाबत अशाच प्रकारचे डावपेच खेळण्यात आले. सामाजिक प्रबोधनाची घोषणा करणाऱ्या शासनाला लोकमतापुढे वाकावे लागले.

## तरुण पिढीचा सक्रीय सहयोग

हिंसक चळवळीकडे तरुण पिढीतील लोक स्वाभाविकपणेच आकर्षित होतात. कारण सामाजिक–राजकीय परिवर्तनाची आकांक्षा व अन्यायाविरुद्धची चीड या दोन प्रेरणा तरुण पिढीत प्रभावीपणे अस्तित्वात असतात धाडस व उन्मेष या दोन वृत्तींचे प्राबल्य असलेला विद्यार्थिवर्ग व युवावर्ग अशा प्रकारच्या आंदोलनांत प्रमुख शक्तिप्रवाह म्हणून कार्य करतो. ही वैशिष्टये बंगालमधील दहशतवादी तरुणवर्गांत आढळतात,[१४] तशी ती महाराष्ट्रातील युवावर्गात आढळतात. हा युवा–वर्गच आंदोलनात प्रभावी ठरतो. महाराष्ट्राच्या बाबतीत तर असे म्हणता येईल की, येथे विद्यार्थी व युवावर्गाने आंदोलनाच्या राजकारणात महत्त्वाचे योगदान दिले आहे. मराठवाडा विद्यापीठ नामांतराच्या प्रश्नावर उभारलेल्या आंदोलनात विद्यार्थी कृती समिती, दलित पँथरचे नेते व नामांतरवादी विद्यार्थी संघटना अग्रभागी होत्या.

## हिंसाचारामागील कारणपरंपरा

कोणत्याही आंदोलनातील हिंसाचाराचे विश्लेषण करताना आंदोलनाच्या उद्दिष्टांशी सुसंगत व विसंगत व दूरान्वयाने संबंधित अशा कारणांचा विचार करावा लागतो. विशेषत: जातीय हिंसाचाराच्या बाबतीत भिन्न जातीय उपजातीय गटातील अनेक प्रश्नांचा विचार करणे सयुक्तिक ठरते. राजकीय पातळीवर सवर्ण हिंदू आणि दलित जातिजमातींच्या संघर्षाला राखीव जागा आणि सवलती ही दोन प्रमुख कारणे आहेत. दलित जातींना जोपर्यंत आपल्या पायावर स्थिरपणे व खंबीरपणे उभे राहता येणार नाही, तोपर्यंत राखीव जागा व सवलती या कुबड्यांचा त्यांना त्याग करता येणे शक्य नाही. राखीव जागा (व इतर सवलतींचा) त्याग केल्यानंतर इतर सवर्ण जातींच्या तुलनेत त्यांना समान फायदे मिळविता येणे शक्य होईल का? हा प्रश्न आहेत. अर्थात असे समान फायदे त्यांना मिळविता येणार नाहीत. जात, संप्रदाय आणि संपत्तिधारकवर्गाचे निहित स्वार्थाशी संबंधित गटात निवडणूक आणि निवड या क्षेत्रातील स्पर्धेत टिकून राहण्यासाठी दलित समाजाला स्थिर स्थान प्राप्त करून घ्यावे लागेल. समाजातील सर्व घटकांचा विश्वास संपादन करावा लागेल आणि सरतेशेवटी तुल्यबळ सामर्थ्य प्राप्त करून घ्यावे लागेल.[१५] अर्थात सवर्ण जमातीतील नेत्यांना व कार्यकर्त्यांना सत्तास्थानांच्या जागांसाठी आपल्यापेक्षा कमी प्रभावी जातीतील लोकांशी तडजोड करावी लागते. ही तडजोड स्वेच्छेने व सद्हेतूने करावयास उत्सुक नसतात. राजकीय सत्तेतील ही भागीदारी, शिक्षणक्षेत्रातील त्यांच्या संधी आणि शासकीय सेवेतील त्यांच्या राखीव जागा यांमुळे तथाकथित उच्च जातीतील लोकांना सत्ताप्राप्तीच्या, प्रगतीच्या व नोकरीच्या संधीस काही प्रमाणात मुकावे लागते. त्यामुळे निर्माण झालेला

अनुक्रमणिका

असंतोष व द्वेषभाग जातीय चळवळीत उफाळून वर येतो.

## जमीनसुधारणा कायदा

ग्रामीण भागात जमिनीची मालकी हेच स्थानिक सत्तेचे साधन मानले जाते.[१६] जमीनसुधारणा कायद्यामुळे उच्च जातीतील व राजकीय दृष्टचा वरचढ जातीतील लोकांच्या अतिरिक्त जमिनी भूहीन दलित जातीच्या लोकांना मिळण्याची शक्यता निर्माण झाली. तसेच शासनाकडून दलित जातीच्या लोकांना जमिनी मिळाल्या. त्यामुळे ग्रामीण भागातील सत्तेची संरत्रना बदलण्याची आशा निर्माण झाली. ही सत्तेची संरचना वदलण्यास जमीनदारी जातीचा विरोध आहे. भूमिहीन शेतकऱ्यांना जमिनी दिल्या तर स्थानिक राजकारणात हा शेतकऱ्यांचा वर्ग प्रभावी ठरेल अशी भीती जमीनदारी जातीतील लोकांना वाटते. जमिनीच्या वाटणीवरून भावाभावांत हिंसक संघर्ष होतात. अशा वेळी "कसेल त्याची जमीन" या तत्त्वानुसार जमीनदारजातीच्या हिताला धक्का पोहोचला तर संघर्ष निर्माण होणे स्वाभाविक ठरते. यातून दलित जातीबद्दल द्वेषभावना वाढते. त्याची परिणती जातीय हिंसाचारात होते.

## असंघटित दलित समाज

उच्च जातीच्या तुलनेत, महाराष्ट्रातील खेड्यांत व शहरांत दलित जातीच्या लोकांची संख्या प्रमाणशीर रीतीने विभागली गेलेली नाही. याला अपवाद एखादे खेडे वन्य जमातीचे असेल किंवा संमिश्र स्वरूपाचे म्हणजे वन्य जमाती व दलित सवर्ण जातीचे असेल. हा अपवाद वगळता दलित जातिजमातींचे लोक उच्च जातीच्या तुलनेत अल्पसंख्य असून ते ग्रामीण व शहरी भागांत विखुरले गेले आहेत. त्यांतील मध्यमवर्गीय लोकांत शिक्षणाचे प्रमाण वाढत असले तरी बहुसंख्य अज्ञान व दारिद्रयात चाचपडत वाटचाल करीत आहेत. या सर्व लोकांना संघटित करण्याचे कार्य अनुसूचित जातिजमातीच्या अभिजनवर्गाने पार पाडले नाही. या दलित जातीतील जमीनधारी लोक इतर जमीनधारी शेतकरीवर्गाशी हितसंबंधाने बांधले गेले आहेत; तर दलित जातिजमातीतील भूमिहीन शेतमजूर जमीनदार शेतकऱ्यांवर अवलंबून असल्यामुळे त्याच्यावर जमीनधारी जातीचे वर्चस्व प्रस्थापित झालेले आहे. अशा प्रकारे त्यांचे सामाजिक संबंध स्थानिक असलयामुळे त्यांच्यात प्रादेशिक पातळीवर एकजूट घडवून आणणे अवघड झाले आहे.[१७] दक्षिण भारतात ही स्थिती आहे. महाराष्ट्रातही असेच चित्र असल्याचे आढळून येते. दलित समाज असंघटित व असहाय बनल्यामुळे या समाजातील लोक शोषणाला व अत्याचाराला सरळ बळी पडतात. कायदा व शासन ह्या दोन्ही साधनांचा वापर त्यांना आपल्या हिताचे रक्षण करण्यासाठी करता येत नाही. कारण कायदा व शासनयंत्रणा जमीनदारीयुक्त वरचढ जातीच्या लोकांना अनुकूल असते. अशा वेळी आंदोलनाच्या मार्गाने दलित जातिजमातीचे लोक आपल्या भावनांना वाट मोकळी करून देतात. आणि आंदोलन करण्याचे स्वातंत्र्य त्यांना लोकशाही व्यवस्थेत वापरता येते. कारण भारतात तरी आंदोलन ही नेहमी वाईट गोष्ट मानली जात नाही. आपल्यासारख्या देशात जनतेच्या भावनांना प्रतिबंध घालणे धोक्याचे ठरते दोन निवडणुकांच्या काळात सार्वजनिक पातळीवरील भावनांचे प्रश्न केवळ अर्जविनंत्यांच्या संविधानिक पद्धतीनुसार मर्यादित ठेवणे धोक्याचे ठरते.[१८] अशा आंदोलनांतूनच जातीय हिंसाचाराला प्रोत्साहन मिळण्याची शक्यता निर्माण होते.

## मूल्यमापन

महाराष्ट्राच्या राजकारणातून सर्व प्रकारच्या हिंसाचाराचे निर्मूलन करता येणे शक्य नाही. कारण वाढते दारिद्रय, असंतोष, अन्याय, ताठर स्वरूपाचे बदल आणि ध्येयवादी विचारसरणीतील संघर्ष आदी कारणे जोपर्यंत अस्तित्वात असतील तोपर्यंत म्हणजे भविष्यकाळातही हिंसाचार समूळ नष्ट करणे अशक्य आहे.

हा राजकीय हिंसाचार प्रस्थापित व्यवस्थेतील दोष व उणिवा दर्शवितो.[१९] महाराष्ट्रातील जातीय हिंसाचाराला आळा घालण्यासाठी दुर्बल घटकांच्या संघटना उभारून त्यांना सामर्थ्यवान बनविणे हा एक उपाय ठरू शकेल. अर्थात या दुर्बल व दलित वर्गांच्या संघटनांनी संयमाने व विधायक वृत्तीने

शक्तिप्रवाहाचा वापर केला पाहिजे. आज महाराष्ट्रात दलित पँथर आणि रिपब्लिकन पक्षातील गट नव्या सामाजिक-राजकीय शक्तिप्रवाहाचे प्रतिनिधित्व करतात ही स्वागतार्ह गोष्ट आहे. परंतु सामाजिक बदलाचे व प्रबोधनाचे साधन म्हणून या संघटनांनी विधायक कार्य केले पाहिजे. स्थानिक राजकारणात सत्ताप्राप्तीच्या राजकारणापासून त्यांनी स्वतःला दूर ठेवले पाहिजे.

जातिव्यवस्थेत परस्परविरोध असल्यामुळेच संघर्ष व हिंसाचार टाळणे अवघड होते. असा संघर्ष व हिंसाचार टाळणे आवश्यक आहे. जातिव्यवस्थेतील परस्परविरोधी दर्जा आणि नागरिकत्वाचे तत्त्व यांनी जोडणारी कृती करणे शक्य आहे. कारण परिस्थितीनुरूप स्वहिताला अनुकूल असे तत्त्व म्हणून दोन्ही तत्त्वांना महत्त्व दिले जाते. भारतीय समाजाच्या संरचनेत परस्परविरोध असल्यामुळे नागरिकत्व हा निमंत्रक घटक ठरू शकतो. नागरिकत्व आणि गुणवत्ता–कामगिरी हे दोन निकष सर्व क्षेत्रांत निवडीचे निकष म्हणून मान्य करावयाचे की पूर्वनियोजित जातीचा दर्जा सत्ता, संपत्ती व संधीच्या क्षेत्रांत निवडीचा निकष मानावयाचा यासंबंधी निर्णय घ्यावा लागेल.[२०] जातीनुसार प्राप्त होणारा दर्जा हा सत्ता, संपत्ती रोजगार, शिक्षण आणि प्रगतीच्या संधी या क्षेत्रांत मान्य करता कामा नये. गुणवत्ता, विशिष्ट क्षेत्रातील कामगिरी आणि समान नागरिकत्व या निकषांनुसार सर्वांना सर्व क्षेत्रांत प्रगतीच्या संधी दिल्या तर जातीय संघर्षाची व हिंसाचाराची बीजे नष्ट करता येथील. अर्थात जे घटक समान पातळीवर स्पर्धेत टिकू शकत नाहीत, त्यांना खास सवलती काही काळ देणे सयुक्तिक ठरेल. परंतु येथेही दलित समाजातील दुर्बल घटकांची नेहमी वर्गवारी करावी लागेल.

जातीय हिंसाचारामागे पूर्वग्रहदूषित विचारसरणी, भ्रामक कल्पना व अंधश्रद्धा हे प्रभावी घटक असतात. जातीय हिंसाचाराचा प्रश्न शास्त्रीय दृष्टिकोनातून सोडविता येईल. विज्ञाननिष्ठ दृष्टिकोन आणि विवेकबुद्धीची प्रेरणा यांचा आधार घेऊन जातीय हिंसाचाराची समस्या सोडविता येईल. कारण मानवी व्यवहाराचे शास्त्रीय पद्धतीने जाणीवपूर्वक नियमन करून निश्चितपणे चांगल्या गोष्टी घडवून आणता येतील, यातना कमी करता येतील, अन्यायाचे निर्मूलन करता येईल. अर्थात त्यासाठी पोथीनिष्ठ तत्त्वप्रणालींचा त्याग करावा लागेल आणि पूर्वग्रहदूषित दृष्टिकोन आणि अंधश्रद्धा नष्ट कराव्या लागतील.[२१] जातीय हिंसाचाराचे समर्थन करताना नेहमी उदात्त तत्त्वाचा आश्रय घेतला जातो. अशा उदात्त तत्त्वामागे निहित स्वार्थ व घाणेरडे राजकारण दडलेले असते. म्हणूनच जातीय हिंसाचाराचा निषेध केला पाहिजे व हिंसाचारापेक्षा अन्य मार्गाने जातिव्यवस्थेतील प्रश्न सोडविण्याचे बौद्धिक आव्हान स्वीकारले पाहिजे.

## References :


1) Chirol, Valentin, Indian Unrest, London, 1910, PP 46–47.
2) Seshadri, K., Indian Politics, Then and Now. Essay in Historical Perspective, 1976, PP 53–54.
3) Winter R. Herbert and Bellows Thomas, People and Politics. 1977, P. 420.
4) Ibid P. 420.
5) Ibid P 422.
6) Ibid P 422.
7) Ibid P 422.
8) Arendt, On Revolution. P. 140.

9) Winter R. Hewbert and Bellows J. Thomas op. cit. P. 383.
10) Ibid P. 390.
11) Thorton, T. P. Terror as a Weapon of Political Agitation in Harry Eckstein (ed.), Internal War Problems and Approaches, Glencoe, 1964, P. 73.
12) Stohl Michael (ed.), The Polities of Terrorism, New York, P. 36.
13) Weiner, Miron. The Politics of Scareity (Bombay : 1963) PP 219–220.
14) Agnew, Vijay, Elite Women in Indian Politics, New Delhi, 1979, P. 69.
15) Murphy, B. and Depressed and Oppressed ( Forever in Agony ), New Delhi, P. 95.
16) Rao M. S. A. Tradition, Rationality and Change, Essays in Sociology of Economic Development and Social change, 1972, P. 61.
17) Moffatt, Michael, An Untouchable Community in South India, New Jersey, 1979, P. 57.
18) Cited in Aiger S. P. (ed.), The Polities of Mass Violence in India 1967, P. 108.
19) Winter R. Herbert and Bellows J. Thomas. People and Politics. 1977, P. 423.
20) Lynch, M. Owen. The Politics of Untouchable Social Mobility and Social Change in a of India, 1974, PP. 213–214.
21) Isiah Berlin, The Age of Enlightenment, New York– 1956, P. 20.



अनुक्रमणिका

# महाराष्ट्रातील मत्स्योद्योग

चं. वि. कुलकर्णी

समुद्र व नदीकाठचा मत्स्यव्यवसाय हा महाराष्ट्रातला फार पुरातन कालापासून चालू असलेला जीवितोपयोगी व्यवसाय. तसेच मत्स्यसेवनदेखील प्राचीन कालापासून प्रचलित होते असे दिसते. गौतमधर्मसूत्रांत तर श्राद्धप्रसंगीही शिजविलेल्या माशाचा वापर केला जात असे, असे नमूद केले आहे. पराशर स्मृतीत मात्र मत्स्यसेवन निषिद्ध मानले गेले होते. सातवाहन काळात (ख्रिस्तपूर्व २००–३००) मात्र महाराष्ट्रात मांस व मासे आहारात प्रचलित होते असे पुरातत्त्वतज्ञांनी प्रतिपादित केले आहे. महिकापतीच्या बखरीत इ. स. ११०० च्या सुमारास सोनकोळी ही मासेमारी करणारी जमात मुंबईच्या परिसरात चांगली भरभराटीस आलेली जमात होती असे नमूद केलेले आहे. यावरून त्या काळातही सागरी मत्स्योद्योग भरभराटीत होता असे दिसते आणि आजदेखील सबंध महाराष्ट्रात, सागरी व देशांतर्गत गोड्या पाण्याच्या मासेमारीचा व्यवसाय सुमारे ४॥ लाख जनसंख्येच्या चरितार्थाचा आधार झाला असून त्यांचे एकंदर उत्पन्न सध्याच्या बाजारभावात १३४ कोटी रुपयांपर्यंत पोचले आहे. परंतु त्यांच्या समस्याही तितक्याच अवाढव्य झाल्या आहेत यात शंका नाही.

## मत्स्योद्योगाचा अर्वाचीन इतिहास

इंग्रजांच्या (ईस्ट इंडिया कंपनीच्या) काळात, विशेषत: मुंबई बेटाच्या आसपास सागरी मत्स्यव्यवसायाकडे इंग्रजांचे लक्ष होते; कारण मच्छीमारांच्या होड्या त्यांच्या जहाजांना नेहमीच भेटत असत १६८८ साली तर या व्यवसायापासून काही उत्पन्न मिळविता येईल का, असे पाहण्यासाठी एक समिती नेमण्यात आली व तिने प्रत्येक मच्छीमारांवर एक कर लादला. परंतु त्यापासून फारसा फायदा झाला नाही. १७४४ सालच्या शिफारशीने तो बंद करण्यात आला. १८८४ सालच्या पाहणीसमितीने मात्र काही सुधारणा सुचविल्या व त्यान्वये सुके मासे जास्त काळ टिकविण्यासाठी रत्नागिरी व सालसेट (उत्तरमुंबई व वसई) जिल्ह्यांत मासे खारविण्याची आवारे उघडण्यात आली व तेथे पुरेसे मीठ वापरले जावे म्हणून त्या मिठावरील करही माफ करण्यात आला. हीच या व्यवसायातली सुधारणेची पहिली पायरी. नंतर १९१० सालचा ल्यूकस रिपोर्ट, १९२२ साली 'विल्यम गॅरिक' नावाच्या ट्रॉलरमार्फत केलेला खोलसमुद्रातल्या मासेमारीचा पहिला प्रयोग व त्यानंतर १९३२ सालचा डॉ. सोर्ले यांचा रिपोर्ट या अलीकडील घटना. परंतु या सर्व शिफारशींतून एक गोष्ट मात्र स्पष्ट झाली, की हा व्यवसाय मोठमोठ्या जहाजांच्या मदतीने न करता साध्या मच्छीमारांकरवीच व त्यांच्या प्रचलित मचव्यांच्या यांत्रिकीकरणाने केला तरच किफायतशीर होईल. हीच विचारधारा कमीअधिक स्वरूपात पुढे १९३४ साली 'मच्छीमारी अधिकारी' (फिशरीज ऑफिसर) नेमल्यावर व त्यापुढे १९४५ साली मासेमारी व्यवसायासाठी स्वतंत्र विभाग (खाते) निर्माण केल्यानंतरही चालू राहिली.

## नैसर्गिक मत्स्यसंपदेचे क्षेत्र

कोणत्याही व्यवसायाच्या व्याप्तीची कल्पना येण्यासाठी प्रथम त्या क्षेत्रातल्या निसर्गसंपदेचा आढावा घेणे आवश्यक असते. त्या दृष्टीने पाहता महाराष्ट्रात भौगोलिक परिस्थितीमुळे अरबी समुद्रकिनाऱ्यावरची सागरी मासेमारी व त्याचप्रमाणे देशांतर्गत असलेल्या नदी-तलावांतील गोड्या पाण्यातली मासेमारी यांचा समावेश होत असस्यामुळे या दोन्ही क्षेत्रांतील मत्स्यसंपदा आपणास उपलब्ध आहे. तसेच नद्यांच्या मुखाजवळच्या खाडी प्रदेशांतला निमखाऱ्या-



अनुक्रमणिका

गोड्या (मचूळ) पाण्याचा विस्तीर्ण भाग व त्यांतील माशांच्या जातींचीही त्यात भर पडते.

सागरी क्षेत्राचा विचार केल्यास असे दिसून येईल की, महाराष्ट्राच्या सुमारे ७२० कि. मि. लांबीच्या किनारपट्टीवर समुद्रात ८० मी. खोलीपर्यंतचा विभाग सुमारे ४४३६७ चौ. कि. मी. इतका विस्तृत आहे व तो सर्व मासेमारीसाठी वापरण्याजोगा आहे. त्या पुढच्या खोल समुद्राचा २०० मी खोलीपर्यंतचा आणखी ४४,७२९ चौ. कि. मी. भाग म्हणजे एकंदर ८९,०९६ चौ. कि. मी. परिसर ज्याला तटवर्ती खंड (कॉन्टिनेंटल शेल्फ) म्हणतात, तो अवाढव्य भाग महाराष्ट्रातील मच्छीमारांना मासेमारीकरिता उपलब्ध आहे. या तटवर्ती समुद्राच्या तळावर पुष्कळ ठिकाणी काळसर हिरवट रंगाचा सपाट चिखल तर काही ठिकाणी वाळू, शिंपलेआच्छादित तळ आढळून येतो. किनाऱ्याच्या काही भागावर खडकाळ भाग असतात. अशा तऱ्हेच्या विविधतेमुळे निरनिराळ्या स्वभावधर्मांचे मासे या भागात वास करू शकतात व हा समुद्रतळ निरनिराळी जाळी वापरण्यास योग्य असल्यामुळे त्यांना मासेमार पकडूही शकतात. शिवाय या समुद्रात विविध तऱ्हेचे सागरी प्रवाहही असल्यामुळे व भरती ओहोटीचे प्रमाणही चांगले असल्यामुळे समुद्री जीवजंतू, जे माशाचे अन्न असते, त्यांचा फैलावदेखील चांगल्या प्रमाणात होतो व त्यामुळे नाना तऱ्हेचे मासेही आकर्षित होतात व मच्छीमारांना मिळू शकतात.

## सागरी मासेमारी

मत्स्यक्षेत्राबरोबरच मत्स्योत्पादनास आवश्यक बाब म्हणजे त्या पाण्यात उपलब्ध असणाऱ्या माशांच्या जाती. या बाबतीत महाराष्ट्र भाग्यवान आहे असेच म्हणावे लागेल. कारण भारतात इतरत्र मिळणाऱ्या सर्व जातींची मासळी आपल्या किनाऱ्यावर कमीजास्त प्रमाणात मिळू शकते. या बाबतीत मत्स्यव्यवसायाचा विचार करताना मत्स्योत्पादन म्हणजे फक्त माशांचेच उत्पन्न किंवा उत्पादन याचा विचार न करता एकंदर 'मासळी' म्हणजे ज्यामध्ये कोलंबी, चिंबोरी (खेकडे), माकुल, कालवे, तिसऱ्या किंवा शिवळ्या, की जे शास्त्रीयदृष्ट्या मत्स्यवर्गात मोडत नाहीत, त्यांचाही समावेश होतो. हे सर्व प्राणी सागरी जीवान्न म्हणजे मासळी या सदरात येतात. यात नानाविध जातींचा समावेश आहे; परंतु त्यांपैकी व्यावसायिकदृष्ट्या महत्त्वाच्या ज्या जाती आहेत त्यांची मराठी व इंग्रजी नावे खाली दिली आहेत.

| मराठी नाव | इंग्रजी नाव |
|---|---|
| १. बोंबील | बॉम्बेडक |
| २. सरंगा | पॉम्फ्रेट |
| ३. हलवा | ब्लॅक पॉम्फ्रेट |
| ४. सुरमई (तोवर) | सीअर फिश |
| ५. करली (दाताळ) | सिल्व्हर बार |
| ६. वाम | ईल |
| ७. रावस | बामीन |
| ८. घोळ | घोळ, ज्युफिश |
| ९. दाढा | मंक फिश, जायंट थ्रेडफिन |
| १०. ढोमा | ढोमा |
| ११. मांदेली | गोल्डन अंचोव्ही |
| १२. बांगडा | इंडियन मॅकेरेल |
| १३. तारली | सारडीन |
| १४. शिंगाली | कॅटफिश |
| १५. मुशी | शार्क |
| १६. पाकट | रे फिश |
| १७. नाली | स्केट |
| १८. खाडा | लिटल कॉड |
| १९. वाकटी बले | रिबन फिश |
| २०. काट बांगडा | हॉर्स मॅकरेल |
| २१. करंदी | असीटीस |
| २२. कोलंबी | प्रॉन्स |
| २३. चिंबोरी | क्रॅब |
| २४. कालव | ऑइस्टर |
| २५. माकुल | स्क्वीड, सेदिया |

## मासेमारी-साहित्य

किनाऱ्याजवळच्या उथळ पाण्यात गुडघाभर पाण्यात उभे राहून लहान हातजाळ्याने थोडथोडे मासे पकडता येतात. थोड्या जास्त पाण्यात फेकजाळ्यासारख्या, एका माणसाने फेकावयाच्या वाटोळ्या जाळ्याने काही मासे पकडता येतात; परंतु त्या पलीकडे दूरवर पसरलेल्या समुद्रात निरनिराळ्या स्तरांतले मासे पकडण्यासाठी योग्य तऱ्हेच्या साधनांची, म्हणजे

जाळ्यांची व दूर स्थळी पोचण्यासाठी लहानमोठ्या नौकांची आवश्यकता असते. किनाऱ्याजवळच्या व्यवहारासाठी लहान होड्या वापरतात. त्या एखाद्या मोठ्या झाडाचा ओंडका खोदून तयार करतात. त्याना 'पगार'ही म्हणतात. काही ठिकाणी या खोदलेल्या होडीच्या दोन्ही कडांवर फळ्या वसवून ती मोठी करतात त्याला 'डोणी' म्हणतात. अशी होडी एका बाजूला कलंडू नये म्हणून त्या बाजूला, परंतु होडीच्या बाहेर दोन आडवे वासे बांधून त्यांच्या दोन टोकांना एक होडीच्या लांबीच्या समांतर असा हलक्या लाकडाचा ओंडका बांधतात. त्याला 'उलांडी' म्हणतात (आ. १). असली होडी साधारणपणे उलटत नाही. यापेक्षा मोठ्या नौका मात्र बुंधापासून चांगल्या फळ्यांच्या बनविलेल्या असतात. ज्या नौका मासेमारीसाठी वापरतात त्याना 'मचवा' (मत्स्य + वाह) म्हणतात. (आ.२) त्यातही शिदिल, नरछडी, कोथा, बल्याव असे प्रकार आहेत. बल्याव कोथा हे मोठे मचवे असतात व त्याची लांबी १५–१६ मी., रुंदी ३–४ मी. व खोली १–१॥ मी. असू शकते हे मचवे बहुधा चांगल्या सागवानी फळ्यांचे व आडाथाचे बनविलेले असतात. परंतु सागवानी लाकडांची किंमत सध्या फारच वाढलेली असल्यामुळे पाण्यावर राहणाऱ्या काही फळ्या ऐन, उडी, सीसम या लाकडांच्याही केलेल्या



आ. १ : उलांडी होडी
१. उलांडी (ओंडका); २. वासा; ३. होडीची कडा.



आ. २ : मचवा
१. सुकाणू; २. आडाथ; ३. डोलकाठी; ४. नाल.

असतात. या मचव्यांची बांधणी चांगली शास्त्रशुद्ध असून त्यांची देखभाल चांगली ठेवली तर ते ३०–४० वर्षे सुद्धा टिकू शकतात. हे मचवे फार पुरातन काळापासून प्रख्यात आहेत व पारंपरिक कौशल्याच्या आधारावर खेडेगावातील हुशार सुतारही ते बनवू शकतात. महाराष्ट्रात असले निरनिराळे मचवे, होड्या, उलांड्या, डोणी, शिपीले धरून एकंदर संख्या सध्या १२४८५ पर्यंत गेली आहे व त्यांपैकी ४५५७ यंत्रसज्ज (यांत्रिकी) अशा आहेत. बाकीच्या ७९२८ पैकी काही मचवे कापडी शिडाच्या जोरावर प्रवास करून मासेमारी करतात तर कित्येक लहान होड्या किनाऱ्याजवळपास कधी मासेमारी तर कधी माशांची ने-आण करण्याची किंवा त्या व्यवसायासबधी इतर कामे करतात.

## जाळी

जाळ्यांचे बाबतीतही महाराष्ट्रातल्या काही पद्धती वैशिष्टयपूर्ण आहेत. थोड्याशा खोल पाण्यात एका माणसाने वापरावयाचे फेकजाळे किनाऱ्यालगत सर्व ठिकाणी, तसेच खाडीत किंवा नदी-तलावातही वापरले जाते. त्याला 'पाग' असेही म्हणतात. लांब पडद्यासारख्या जाळ्याला दोन्ही अरुंद बाजूंना दोन दांड किंवा बांबू बांधून दोन माणसांनी ओढण्याच्या घोलव्यामध्येही थोड्याशा खोल पाण्यात मासे मारले जातात. तसलेच जाळे परंतु जास्त लांब व ५ ते १० माणसांनी ओढण्याच्या जाळ्यास पेरा म्हणतात. पेऱ्यापेक्षा खूपच १ ते १॥ हजार मीटर लांब व ६ मीटर उंच अशा जाळ्यास टापण म्हणतात. असल्या टापणीच्या दोन्ही बाजूच्या दांडांना लांब दोर बांधतात. जाळे वापरण्याच्या वेळी दोराचे एक टोक किनाऱ्यावर ठेवून जाळे 'डोणी' तऱ्हेच्या होडीवर रचून ती होडी समुद्रात नेऊन व जाळे पाण्यात सोडून माशांचा थवा घेरतात व नंतर जाळ्याच्या दुसऱ्या टोकाचा दोर किनाऱ्यावर आणतात. नंतर २०–२० माणसे दोन्ही टोकाचे दोर व नंतर जाळे किनाऱ्यावर ओढतात. जाळे किनाऱ्यावर आल्यावर त्यात सापडलेले मासे गोळा केले जातात. मालवण, वेंगुर्ले, गोवा या भागांत हे जाळे, ज्या वेळी बांगडे, तारली किंवा इतर काही माशांचे थवे किनाऱ्याजवळ येतात त्या वेळी वापरतात. या शिवाय दुसऱ्या एका जाळ्याच्या








प्रकारात मासे पाण्यात वावरत असताना, जाळ्याचे आसामध्ये (छिद्रामध्ये) त्यांची गालफटे अडकून ते पकडले जातात. अशा तऱ्हेची कांडळ, वावरी, वागूर किंवा दालदी जाळीही मोठ्या प्रमाणात वापरली जातात. तीसुद्धा पड्यासारखी परंतु खूपच लांब व विरळ आसाची व बारीक सुताची असतात. त्याना गालफटी जाळी ( गिलनेट ) म्हणता येईल. ( आ. ५ ) जी जाळी पाण्याच्या पृष्ठभागाजवळ तरंगत्या बोयाच्या आधाराने बांधतात त्यांना 'तरती' व जी तळाजवळ लावतात त्याना 'बुडवी' असे म्हणतात व ती सर्व ठिकाणी वापरली जातात. परंतु महाराष्ट्रातल्या उत्तर किनाऱ्यावरचे अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण जाळे म्हणजे डोळ ( आ. ३ अ ).




आ. ३ अ : मेढ्याचे डोळ जाळे
१. मेढा (खांब); २. डोळ जाळे; ३. खोला
आ. ३ ब : सजाचे डोळ जाळे
३. खोला; ४. विंद (बोया); ५. डोळ जाळे;
६. सजाचे दोर; ७. खुंट.

ते नरसाळ्यासारखे तोंडाकडे रुंद, वाटोळे व पुच्छभागाकडे निमुळते अरुंद होणारे असे असते. ते निरनिराळ्या लांबीरुंदीचे असते. त्यांच्या तोंडाचा परीघ ३० मी. पासून १२० मी. पर्यंत असू शकतो व क्रमशः लहान होत शेपटाकडे तो अवघा ½ मी. असतो. तोंडापासून निमुळत्या भागाची लांबी ३० ते ७० मी. असू शकते. लहान परीघाच्या जाळ्याला 'बोकशी' म्हणतात व ती बहुधा खाड्यांत वापरतात. समुद्रात ज्या ठिकाणी भरती-ओहोटीच्या पाण्याचा ओघ जोरदार असतो, त्या ठिकाणी ओघाकडे तोंड करून ही जाळी समुद्राच्या चिखलात खोलवर पुरलेल्या भल्यामोठ्या खांबांना दोन खांबामध्ये एक अशा रीतीने बांधतात. या खांबांना मेढे किंवा कव म्हणतात. जेव्हा भरतीचे पाणी मोठ्या ओघाने जाळ्याच्या तोंडातून जाळ्यांत जाते, तेव्हा पाण्याबरोबर मासेही पुढे पुढे रेटले जातात व मग जाळ्याच्या लांबलचक पण अरुंद पुच्छ भागात, ज्याला खोला म्हणतात, तेथे गेल्यानंतर तेथून त्यांना परत फिरता येत नाही. अशा वेळी जेव्हा भरतीचा ओघ कमी होण्याची वेळ येते तेव्हा तो भाग वर मचव्यांत उचलून घेऊन त्यातले मासे काढले जातात. ही पद्धत महाराष्ट्राच्या उत्तर किनाऱ्यावर व दक्षिणेस हर्णे पर्यंत फार मोठ्या प्रमाणात वापरली जाते. या पद्धतीतले मेढे(खांब) कधी कधी ३० मी. खोल पाण्यातही रोवले जातात. इतक्या खोल पाण्यांत ४० मी. लांबीचे ( जोडलेले ) मेढे रोवण्याची पद्धत नितांत कल्पकतापूर्ण आहे; परंतु स्थलाभावामुळे येथे त्याचे वर्णन देता येत नाही. असल्या जाळ्यात तळापासून वर पृष्ठभागापर्यंत वावरणारे बोंबील, कोलंबी, सरंगे, पाकट इत्यादी सर्व तऱ्हेचे मासे पकडता येतात. या जाळ्यांना लागणारे मेढे ( खांब ) खूपच महाग असल्यामुळे त्या खांबाच्या ऐवजी जाडे दोर वापरतात. हे दोर पूर्वी सुंभाचे ( काथ्याचे ) असून त्यावर डांबर लावींत असत; परंतु त्या ऐवजी आता प्लॅस्टिकचे जाड दोरखंड वापरले जाऊ लागले आहेत. हे दोर पाण्यामध्ये ताठ रहावे म्हणून प्रथम ते समुद्रतळावर रोवलेल्या लहान लाकडी खुंटास बांधतात व त्यांची वरची ठोके पाण्याच्या पृष्ठभागावर लाकडी पिंपे घेऊन त्यांना बांधतात. या शिवाय पिंपांना एकमेकांनी बांधलेले आडवे बारीक दोरही असतात. त्या सर्वांमुळे एक सांगड तयार होते व त्यास डोळ जाळे बांधतात. या प्रकाराला सज असे म्हणतात. (आ. ३ ब) व ते बहुधा एका रांगेत असतात. हे सज कुठे लावता येतील हे मच्छीमारांचा म्होरक्या, ज्याला नाखवा म्हणतात, त्याच्या समुद्र-

प्रवाहाच्या दीर्घ अनुभवावर व कुशाग्रतेवर अवलंबून असते. हेर्णै (पाज), बुरोंडी या भागांतल्या समुद्रात खुंट मारण्याच्या ऐवजी मोठमोठे लोखंडी नांगर समुद्राच्या तळावर बसवितात व त्यांना वरील तन्हेचे दोर व जाळी बांधून मासे पकडतात.

यापूर्वी वर्णन केलेल्या जाळ्याशिवाय सध्या वापरात असलेले सर्वांत महत्त्वाचे जाळे म्हणजे पाश्चात्य देशातले 'ट्रॉल' नावाचे जाळे. हे थोडेफार डोळीसारखेच निमुळते परंतु तोकडे व तोंडाच्या दोन्ही बाजूला पाटे असलेले जाळे (आ. ४). यांत्रिक मचव्यावरील इंजिन व यारी यांच्या साहाय्याने हे जाळे समुद्रतळावर फरफटत असे ओढले जाते व त्यात तळाजवळपास वावरणारी कोलंबी, बोंबील, ढोमी, पाकट यांसारखी मासळी पकडली जाते. कोलंबी तिच्या निर्यातक्षमतेने फार मौल्यवान असल्यामुळे व ती या जाळ्यात प्रामुख्याने पकडली जात असल्यामुळे ही जाळी आता मोठ्या प्रमाणात वापरली जाऊ लागली आहेत.

## यांत्रिकीकरण

पूर्वी, अगोदर वर्णन केलेले मचवे व होड्या कापडाच्या शिडाच्या आधाराने म्हणजे वाऱ्याच्या जोरावर चालत असत. त्यामुळे वारा अनुकूल नसला तर मचवे मासेमारीच्या ठिकाणी फार उशिरा पोचत व वेळेवर बंदरात परतही येऊ शकत नसत. तसेच त्यांचे कार्यक्षेत्रही १५–२० कि. मी. पर्यंतच मर्यादित असे. परंतु १९५१ सालापासून महाराष्ट्र शासनाने प्रचलित तन्हेच्या मजबूत मचव्यांवर मच्छीमारांना कर्ज व अनुदान देऊन इंजिने बसविण्याची योजना सुरू करून या व्यवसायाच्या आधुनिकीकरणाची मुहूर्तमेढ रोविली. त्यामुळे आता हे यांत्रिकी मचवे ४० ते ६० कि. मी. अंतरापर्यंत जाऊ लागले व जास्त आणि मोठमोठी जाळी वापरू लागले. त्यामुळे कोलंबीसारखी मौल्यवान मासळीही मोठ्या प्रमाणात मारता येऊ लागली. या यांत्रिकीकरणाच्या योजनेमुळे दरवर्षी जास्तजास्त मचवे यंत्रसज्ज होऊ लागले व त्यामुळे मत्स्योत्पादनही वाढू लागले. १९६१ साली ज उत्पादन १,७०,०००, टन होते, तेच १९७६–७७ साली ३,९२,१४५ टनावर आले




आ. ४ : ट्रॉल जाळे
१. जाळ्याचा मध्यभाग (बेली); २. पुच्छभाग ( कॉड एंड ); ३. सांदे; ४. फळे ( ऑटर बोर्ड ).





आ. ५ : वरील—बुडचे जाळे; खालील—तरते जाळे



आ. ६ : महाजाल

व १९८२-८३ मध्ये मच्छीमारांचे स्थूल उत्पन्न रु. १३४ कोटीपर्यंत पोहोचले.

## व्यावसायिक जनसंख्या

आता नमूद केलेल्या उत्पादनवाढीचे मुख्य श्रेय या धंद्यातील पिढीजाद जमातींनाच द्यावे लागेल. अशा जमातींत मुंबईच्या परिसरातील सोनकोळी अग्रेसर मानले जातात त्याशिवाय ठाणे तालुक्यातील मांगेला, वैती, वारी, ख्रिश्चन कोळी हेदेखील मोठे कष्टाळू व धारिष्टचवान असतात. रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग जिल्ह्यांतील खारवी, गावीत, भंडारी, दालदी ( मुस्लीम ) इत्यादी जमातींतील लोकांचाही या धंद्याच्या उर्जितावस्थेस चांगलाच हातभार असतो. या सर्व दर्यावर्दी जमाती किनाऱ्यावरच्या २१० लहानमोठ्या गावांत विखुरलेल्या आहेत. त्यांच्या मचव्यांना किनाऱ्यालगत येण्यास आवश्यक अशी बंदरे मात्र अवघी ४९ च असून, ५० वे जे मुंबई बंदर ( ससून डॉक ) त्याच्या सुधारणेची शोकांतिका हृदयद्रावकच आहे.

या सर्व बंदरांतून प्रत्यक्ष मासेमारी करणारांची संख्या दरवर्षी वाढतच असते. १९८२-८३ साली ही संख्या ४७,४४३ इतकी होती. शिवाय, मासे ने-जाण करणे, सुकविणे, विक्री करणे, जाळी विणणे, दुरुस्त करणे इत्यादी या धंद्याच्या आनुषंगिक कामांत गुंतलेले सुमारे ५६,६०० स्त्रीपुरुष धरून एकंदर १,०४,०३० जनसंख्या ( मनुष्यबळ ) या सागरी व्यवसायात गुंतलेली होती. निर्यातीचा धंदा वाढल्यामुळे मासे सुस्थितीत टिकविण्यासाठी लागणाऱ्या बर्फाचे कारखाने, प्रक्रियागृहे व शीतगृहे यांमध्ये काम करणाऱ्यांची संख्याही सारखी वाढत आहे. त्यामुळे हा सागरी धंदा सुमारे सव्वालाख कुटुंबांच्या उपजीविकेचे साधन झाला आहे यात शंका नाही.

## गोड्या पाण्यातील मत्स्यसंपदा

महाराष्ट्राचा प्रदेश पश्चिम समुद्रकिनाऱ्यापासून पूर्वेकडे नांदेड, चंद्रपूर, भंडारा इत्यादी जिल्ह्यांपर्यंत पसरलेला असल्यामुळे, सागरी मत्स्यव्यवसायाबरोबर गोड्या पाण्यातील किंवा भूजलीय मासेमारीलाही महत्त्व आहे व त्या व्यवसायात २५,५६० लोक पूर्णकाल आणि २९,२८० लोक अंशकालपणे गुंतलेले आहेत व तो त्यांच्या चरितार्थाचा व्यवसाय आहे. महाराष्ट्रात जरी ३२०० कि. मी. लांबीच्या नद्या असल्या तरी गोदावरी, कृष्णा, कोयना, पूर्णा, तापी, पंचगंगा यांसारख्या मुख्य नद्यांचे फक्त उगमाकडील भागच महाराष्ट्रात आहेत. त्यामुळे त्यांत नेहमीच पुरते पाणी असते असे नाही. उन्हाळ्यात पुष्कळ नद्या पूर्ण आटलेल्या असल्यामुळे मत्स्योत्पादनाचा मुख्य भर तळी, तलाव व कृत्रिम जलाशय यांच्यावरच असतो. या सर्वांचे एकंदर क्षेत्रफळ २,९३,७३० हेक्टर असून त्यांपैकी २,००,००० हेक्टर जलसंचयात मत्स्यसंवर्धनाचे कार्य चालू आहे. हे सर्व जलाशय राज्यभर विखुरलेले असल्यामुळे निरनिराळ्या मातीच्या स्तरांत त्यांची उत्पादनक्षमता कमीजास्त प्रमाणात आढळून येते. मात्र रब्बी पिकांनाही उन्हाळ्यात पाण्याची गरज असल्यामुळे व त्या उत्पन्नाला प्राधान्य देऊन पाणी दिल्यामुळे लहान तलावांत जेथे माशांचे उत्पन्न चांगले येते तेथेच पाण्याची वानवा उत्पन्न होऊन माशांचे पीक अर्धवटच काढावे लागते व एकंदर उत्पन्न घटते. तरीही १९८२-८३ साली या देशांतर्गत मासेमारीचे उत्पन्न २७,००० टनांपर्यंत गेले आहे व त्याची मच्छीमारांना मिळणारी किंमत साडेतेरा कोटी रुपयांपर्यंत पोहोचली आहे.

नद्यांचे अनुस्रोत भाग ( मुखाजवळील ) महाराष्ट्रात नसल्यामुळे कटला, रोहु, मृगळ यांसारखे मोठे होणारे परंतु भरपूर पाण्याची गरज असणारे व मत्स्यसंवर्धनाकरता आवश्यक असलेले मासे आपल्या भागात मिळत नाहीत. त्यामुळे मत्स्यसंवर्धनासाठी लागणारे त्यांचे मत्स्यबीज मोठ्या प्रमाणात दुसऱ्या प्रांतातून आणावे लागते. तरीही आपल्या नदी-तलावांत मिळणाऱ्या इतर महत्त्वाच्या जाती खाली दिल्या आहेत.

| माशाचे मराठी नाव | शास्त्रीय नाव |
|---|---|
| १. तांबीट | लेबिओ फिंब्रीएटस |
| २. पानगट | पुंटीअस् जेर्डोनी |
| ३. पोटीळ | ,, पलचीलस |
| ४. कोळशी | ,, कोलस |
| ५. दरई खवळी | ,, सराना |
| ६. खडशी (महाशीट) | टोट खद्री |
| ७. मरळ | चाना मरुलीअस |
| ८. वडशिवडा (शिवडा) | व्हलागो आटु |
| ९. शिंगाडा | मिस्टस शिंगाला |








| | |
|---|---|
| १०. वाम | मस्टासीवॅलस आरमेटस |
| ११. फळकुट | नोटोप्टेरस |
| १२. मळचा | गारा मळचा |
| १३. आमळी | चीला क्लुपिऑयडीस |
| १४. मुरी | बोटीया लेपिडोसिफॅलीक्थीस |
| १५. झिंगे | मायक्रो ब्राकीयम |

## मासेमारी-साहित्य

गोड्या पाण्याचे क्षेत्र व त्यातील विभाग सागरी व्यवसायातील क्षेत्रापेक्षा लहान असल्यामुळे तेथे वापरात असलेली जाळी व नावादेखील लहान आकाराच्या असतात. नावा तर लहान-मोठ्या सागरी होड्यांसारख्याच असतात. काही मोठ्या जलाशयांत मात्र आता सागवानी फळ्यांनी तयार केलेल्या यांत्रिकी मचव्यांचाही उपयोग केला जाऊ लागला आहे. मात्र काही टिकाणी अजूनही नुसते लाकडाचे ओंडके किंवा पिपे बांधून व त्यावर गवत अगर फळचा टाकून ' तराफे ' करतात, तर काही पाण्यात सुके भोपळे किंवा बंद डबे दोराने बांधून त्यावर मच्छीमार घोडेस्वारासारखे स्वार होऊन आपली जाळी वापरतात.

जाळयांच्या बाबतीतही अवाढव्यता किंवा विविधता दिसत नाही. उथळ किंवा खळखळत्या पाण्यात, तसेच पाणवेलींनी वेढलेल्या अवघड पाणथळी जागेत मासे पकडण्यासाठी निरनिराळ्या आकाराचे बांबूंच्या काड्यांचे केलेले सापळे वापरले जातात. तसेच काही ठिकाणी भाल्याने व बंदुकीनेही मासे मारले जातात. नदीकिनारी वापरावयाचे फेकजाळे कांडळ व इतर गालफटी ( गिलनेट ) जाळी सागरी पद्धतीचीच असतात. पेऱ्याचा प्रकारही तसाच असतो. परंतु येथे मोठ्या पेऱ्याला महाजाळे म्हणतात ( आ. ६ ) व त्याच्या मधल्या भागात पिशवीसारखा जाळयाचा भाग असतो. त्यांत पुष्कळसे मासे अडकतात. हे जाळे बहुधा नदीच्या पात्रात वापरतात. या शिवाय, एकेरी गळदांडीने तसेच गळांच्या दावणीने मासे पकडतात. अशा दावणीत पुष्कळसे गळ थोडथोड्या अंतरावर एका लांब दोरीला बांधून ती पाण्यात आडवी बांधलेली असते. गळावरील अमीशामुळे काही जातीचे मासे पकडले जातात.

## मत्स्यसंवर्धन

नद्यांचे प्रवाह लहान असल्यामुळे त्यांतील मासेमारी थोड्या प्रमाणातच होत असते. त्यामुळे मत्स्योत्पादनाच्या वाढीचा मुख्य मार्ग म्हणजे तळी, तलावांमध्ये कटला, रोहू, मृगळ, यासारख्या उत्तर हिंदुस्थानातल्या नद्यात त्या जलद वाढणाऱ्या माशांची पिले आणून ती सोडणे व वाढविणे हाच होय. त्यासाठी भरपूर मत्स्यबीजाची आवश्यकता असते; परंतु महाराष्ट्रात त्याचीच उपलब्धता कमी पडते. उपलब्ध असणाऱ्या जलाशयाच्या क्षेत्रफळाच्या दृष्टीने मत्स्यबीजाची एकंदर गरज ३६ कोटीची आहे; परंतु सध्या फक्त सुमारे ९–१० कोटी बीज कलकत्त्याहून दरवर्षी विमानाने आणण्यात येते व ४ कोटी बीज महाराष्ट्रातल्या २६ मत्स्यबीज केंद्रांत उत्पन्न केले जाते. कटला, रोहू, मृगळ हे मासे गंगा व तिच्या उपनद्यांसारख्या मोठ्या नद्यांत वाढणारे असल्यामुळे ते तलावात जरी वाढले, मोठे झाले; तरी तेथे त्यांची विनावळ होत नाही. ती विनावळ कृत्रिम रीतीने करण्यासाठी पिट्युटरी हॉर्मोनची इंजेक्शने देऊन काळजीपूर्वक पैदास करावी लागते. वरील तीन जातींबरोबरच सायप्रीनस, सिल्वर कार्प, ग्रास कार्प या चिनी माशांच्या पैदाशीचाही या मत्स्यकेंद्रात प्रयत्न केला जातो. या सर्व कामातल्या यशस्वितेसाठी उत्कृष्ट कर्तव्यतत्परता व दुर्दम्य निष्ठा आवश्यक असते; आणि आशा आहे की, येत्या काही वर्षांत या केंद्रांतून अपेक्षित मत्स्यबीज उत्पन्न होईल व गोड्या पाण्यातील उत्पन्न दिवसेंदिवस वाढत जाईल. भंडारा व चंद्रपूर जिल्ह्यांत लहान व मध्यम क्षेत्रफळाची तळी पुष्कळ आहेत व त्या भागात या व्यवसायाला भरपूर वाव आहे. इतर ठिकाणच्या तलावांचीही उत्पादनक्षमता वाढू लागली आहे. मात्र या सर्वाला कष्टाळूपणाची व शास्त्रीय दृष्टिकोणाची आवश्यकता आहे.

## मचूळ पाण्यातील मासेमारी

महाराष्ट्रात खाडी विभागातील मचूळ पाण्याचे क्षेत्रही ८०,००० हेक्टर आहे. त्यामध्ये बोय, जिताडा, रेणवी, काळुंदर, नायडा, चरबट तसेच निरनिराळ्या तऱ्हेची कोलंबी, चिंबारी, शिवळ्या इत्यादी मासळीचे प्रकार उपलब्ध असतात व बोकशी, कांडल, बावरी, पाग, बांबूचे सापळे (वगळे)

इत्यादी साधनांनी मत्स्योत्पादन केले जाते. या खाडी विभागात दूरवर भरतीचे पाणी आत फैलावत असल्यामुळे सुमारे १४,४५० हेक्टर भागात मचूळ पाण्यातली मत्स्यशेती लहानमोठे तलाव बांधून करता येईल असे अलीकडच्या अन्वेषणावरून दिसून आले आहे. यात उत्तम तऱ्हेच्या कोलंब्या व बोय, रेणव्या यांसारख्या शाकाहारी माशांची पैदास किफायतशीर रीतीने करता येईल. मात्र यासाठीसुद्धा चांगल्या प्रतीच्या भरपूर मत्स्यबीजाची व कष्टाळूपणाची आवश्यकता आहे. परंतु या कामाला सुरुवातही झालेली नाही, ही खेदाची गोष्ट आहे.

## सहकारीकरण

मत्स्यव्यवसाय हा साधारणपणे समूहानेच करण्याचा व्यवसाय आहे. त्यामुळे सहकार हा या व्यवसायाचा गाभा मानला जातो. मत्स्योत्पादनापर्यंत ते सहज शक्य होते. परंतु साधनांची खरेदी व मासळीची विक्री इत्यादी क्षेत्रांत त्याचा समावेश होणे आवश्यक असते. तसे नियमबद्ध सहकारीकरण १९४४ सालापासून सुरू झाले व १९८३ मध्ये मच्छीमारांच्या एकंदर ८९१ प्राथमिक सहकारी संस्था, ११ जिल्हासंघ व एक राज्यसंघ आज निरनिराळ्या ठिकाणी कार्यरत आहेत. त्यांचे कार्य सर्व ठिकाणी मोठे सुरळीत आहे असे नाही. काही तोट्यातच तर काही कार्यविरहित आहेत. त्यांच्यात सुधारणा आवश्यक आहेत; परंतु समाधानाची गोष्ट इतकीच की, काही संस्था तरी चांगले कार्य करीत आहेत व काही सुधारत आहेत.

## मासळीचे परिरक्षण व निर्यात

मासळी चांगल्या स्थितीत टिकविण्यासाठी सुमारे १३५ बर्फाचे कारखाने आहेत व त्यांमधून दररोज २७०० टन बर्फ बाहेर येतो. त्यापैकी पुष्कळ माशांसाठी उपलब्ध होतो. त्याचप्रमाणे २९ मासे गोठविण्याचे कारखाने व २० मासे खारविण्याची आवारे आहेत. या सर्व सोयींच्या साहाय्याने मासे टिकविणे (परिरक्षण) व त्यांचा नंतर योग्य वेळी उपयोग करणे शक्य होते. या सोईमुळे मासळीच्या निर्यातीलाही मदत होते व अशा निर्यातीची किंमत १९८३ साली ३९.३२ कोटी रुपयांपर्यंत गेली होती.

## मत्स्यव्यवसायातील समस्या

मागे लिहिल्याप्रमाणे १९५१ पासून यांत्रिक मचव्यांत व मत्स्योत्पादनात, काही वर्षांतली थोडीफार चढतातर सोडता, सतत वाढ होत गेलेली दिसून येईल. या बाबतीत समुद्रातील नैसर्गिक परिस्थिती म्हणजे पाण्याचे तपमान, प्रवाह, त्यातील क्षार, त्यापासून उत्पन्न होणारे मत्स्यान्न, माशाचे प्रजनन, पिलांची वाढ इत्यादी गोष्टी थोड्याफार प्रमाणात कारणीभूत होतात यांत शंका नाही. परंतु त्याबरोबरच मासेमारीतील प्रयत्न म्हणजे व्यवसायांतील मनुष्यबळ कमीजास्त झाले किंवा मासेमारीच्या मचव्यांच्या संख्येत जढउतार झाला की काय, याचाही विचार करावा लागतो. या बाबतीत एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे; ती ही की, महाराष्ट्रात यांत्रिकीकरणाची पक्कड इतकी दृढ झाली आहे की, कोणीही नवा मचवा बांधण्याचा विचार केला की, तो यांत्रिकी मचवाच शासनाच्या किंवा बँकेच्या अर्थसाहाय्याच्या जोरावर बांधीत असतो. त्यामुळे मासेमारीच्या प्रयत्नांत वाढ ही यांत्रिकी मचव्यांच्या संख्येतील वाढीवरच प्रत्यक्षपणे अवलंबून असते. याकरिता मत्स्योत्पादनाच्या चढउताराचा विचार करताना खाली दिलेल्या आकड्यांचा विचार करावा लागतो.*

यावरून एक गोष्ट स्पष्ट होते की, गेल्या सात वर्षांत होड्यांच्या संख्येत फारच थोडा फरक म्हणजे

*

| | १९७६–७७ | ७७–७८ | ७८–७९ | ७९–८० | ८०–८१ | ८१–८२ | ८२–८३ |
|---|---|---|---|---|---|---|---|
| एकंदर उत्पन्न (मासळीचे) | ३९२१४६ | २९१९५२ | ३८६२७१ | ३५८३४९ | ३९८७६१ | ३१५५१२ | ३०९२६८ |
| यांत्रिकी मचवे | ३००८ | ३१९२ | ३४५७ | ३७३६ | ३९६७ | ४५३२ | ४५५७ |
| साधे मचवे | ८१९५ | ७९०१ | ८१७६ | ८६३० | ८१२९ | ७८३५ | ७९२८ |
| यांत्रिकी मचव्यांत वाढ | २८२ | १८४ | २६५ | २५९ | २३१ | ५६५ | २५ |
| क्रियाशील मच्छीमारसंख्या | ४२२३७ | | | | | | ४३८८१ |

अनुक्रमणिका

७९०१ ते ८५३० पर्यंतच आहे. परंतु यांत्रिकी मचव्यांची वाढ ३००८ पासून, नादुरुस्त मचवे बाद करून, सुमारे ४५५७ पर्यंत झाली आहे. दर यांत्रिकी मचव्यापाठी सरासरीने आठ मच्छीमारांची व्यवसायात भर पडते असे धरले तर गेल्या सात वर्षांत एकंदर १२,३९२ जास्त मच्छीमार या व्यवसायात आले असे मानता येईल. परंतु उत्पन्नात मात्र मुळीच वाढ झाली नाही. उलट १९८२–८३ साली ते ८३,००० टनांनी कमीच आहे. गेल्या सात वर्षांतल्या उत्पन्नाची सरासरी काढली तर ती ३,५०,३२२ टन येते; परंतु गेल्या दोन वर्षांचे उत्पन्न या सरासरीपेक्षाही कमी आहे. ही परिस्थिती फारच चिंताजनक आहे. यापासून एक अर्थ असा निघतो की, सध्या उपलब्ध असलेली किनाऱ्यापासून ४० कि. मी. अंतरापर्यंतची मत्स्यसंपदा जास्त मच्छीमारांनी, जास्त जाळी किंवा जास्त वेळ वापरली तरीही एकंदर उत्पन्नात वाढ होत नाही व दरडोई उत्पन्न निखालस कमी कमी होऊ लागले आहे. या गंभीर परिस्थितीचा मत्स्यशास्त्रज्ञ, शासकीय अधिकारी, शासनकर्ते व समाजसेवक या सर्वांनी एकत्र येऊन खोलवर विचार करणे अत्यावश्यक आहे.

या शिवाय, या धंद्यास लागणाऱ्या डिझेलतेल, वंगण, इंजिने, सुटे भाग, मचव्यांचे लाकूड, बर्फ यांसारख्या वस्तूंच्या किंमती भरमसाट वाढल्या आहेत. त्यानेदेखील मच्छीमारांचे कंबरडेच मोडले आहे. बंदरातून निघाल्यापासून परत येईपर्यंत डिझेलतेलाचा खप होत असतो व मासे मिळाले नाहीत तर हा सर्व खर्च त्यांच्या अंगावर पडतो. त्यामुळे मासे मिळण्याची खात्री असल्याशिवाय काही लोक समुद्रावर जातच नाहीत. त्यामुळे खर्च कमी कसा करावा याकडे सर्वांचे लक्ष लागलेले असते, आणि त्यामुळेही उत्पादन कमी होत असण्याचा संभव आहे.

गोड्या पाण्याच्या बाबतीतही काही कठिण समस्या आहेत. त्यांपैकी मुख्य म्हणजे मत्स्यबीजाची कमतरता. याशिवाय मत्स्यबीज केंद्रात मत्स्य-जिऱ्यापासून ( स्पॉन ) माशांची पिले होईपर्यंत होणारी मरतूक. तसेच तळ्यात पिले सोडल्यावर तेथील खेकडे, साप, बेडूक किंवा काही पाण-कीटकादी जीवभक्षी प्राण्यांकडून पिलांची होणारी हत्या, याशिवाय, उन्हाळ्यात पाण्याची कमतरता, योग्य मत्स्यखाद्याचा पुरवठा, तळ्याच्या सांडव्यावरून पिले निसटून जाणे व तलावातील माशांची चोरी या अडचणी तर आहेतच. तलाव मच्छीमारांच्या मालकीचे किंवा लांब मुदतीच्या भाडेपट्ट्याचे नसल्यामुळे मच्छीमारांना मत्स्यबीजखरेदी करण्यासाठी, तलावांची दुरुस्ती करण्यासाठी किंवा मत्स्यान्न पुरविण्यासाठी बँकांकडून आर्थिक मदत मिळणे कठिण होणे यादेखील सार्वत्रिक समस्या आहेत.

महाराष्ट्रातील मत्स्यव्यवसाय उदयोन्मुख असून प्रगतिपथावर आहे, यांत शंका नाही. परंतु ही प्रगती, विशेषेकरून मचूळ व गोड्या पाण्यातल्या मासेमारीतील सुधारणा जास्त जोरकस होणे आवश्यक आहे. या सर्व गोष्टींचा सर्व संबधितांनी निरपेक्ष बुद्धीने व शांतपणे खल करून त्यांतून मार्ग काढला तरच समाजातल्या दुर्बल थरांत असणाऱ्या मच्छीमारांचे जीवितमान सुधारेल व देशांतल्या साधारण जनतेला मासळीसारखे पौष्टिक अन्न उपभोगण्यास मिळेल.



# ' महाराष्ट्रविषयक ग्रंथांची सूची ' : परिचय

अनन्त जोशी

एक मे १९६० रोजी भाषावार प्रांतरचनेनुसार मराठी भाषिकांचे महाराष्ट्र राज्य स्थापन झाले. महाराष्ट्राची ऐतिहासिक, धार्मिक, सामाजिक, सांस्कृतिक परंपरा अतिशय समृद्ध आहे. भौगोलिक आकारमानाचा विचार केला, तर महाराष्ट्र भारतातील चौथ्या क्रमांकाचे एक विशाल राज्य आहे. अशा या विशाल प्रदेशाचा क्षेत्रीय अभ्यास (Area study) करायचा झाल्यास आपल्याला मराठी ग्रंथसूची, राष्ट्रीय ग्रंथसूची यांसारखे अनेक संदर्भ-ग्रंथ पाहावे लागतात. मराठीत कै. शंकर गणेश दाते हे आद्य सूचिकार समजले जातात. त्यांनी इ. स. १८०० ते १९५० पर्यंत मराठीतील विविध विषयांवर प्रकाशित झालेल्या एकूण पुस्तकांची सूची – 'मराठी ग्रंथसूची' – दोन भागांत प्रसिद्ध केल्याचे सर्वांना माहीत आहेच. म्हणून मी १९५१ ते १९८० असा तीस वर्षांचा काळ घेऊन त्या काळात मराठी भाषेत प्रसिद्ध झालेल्या महाराष्ट्र-विषयक ग्रंथांची माहिती जमवीत गेलो. महाराष्ट्र-विषयक ग्रंथांच्या सूचीचे कार्य फारसे झालेले नाही. या सूचीसाठी महाराष्ट्रातील १५ प्रमुख ग्रंथालयांतून अशा ग्रंथांचा शोध घेत गेलो. मराठी प्रकाशकांच्या अद्ययावत याद्या मिळवून त्यांतून महाराष्ट्रविषयक ग्रंथ शोधले. या सूचीचे काम करताना मुंबई विद्यापीठाचे ग्रंथपाल प्रा. अ. चिं. टिकेकर यांचा मला आवर्जून उल्लेख करावासा वाटतो. त्यांच्या मार्गदर्शनाखाली हे काम मी पूर्ण केले.

सूची करताना ग्रंथालयशास्त्रातील दशांश वर्गीकरणाचा आधार घेऊन सर्व ग्रंथांचे वर्गीकरण केले. मात्र क्षेत्रीय अभ्यास करण्यासाठी स्थळे, व्यक्ती, घटना यांना महत्त्व असते. ते स्वतंत्र अभ्यास-विषय (Topics) होऊ शकतात हे लक्षात घेऊन वर्गीकरणात आवश्यक ते बदल केले.

पुस्तकांची माहिती जमवीत असतानाच एक गोष्ट ठळकपणाने जाणवली. ती म्हणजे काही विषयांवर मराठीत अद्यापी पुरेशी पुस्तके प्रकाशित झालेली नाहीत. विशेषत: वैज्ञानिक विषयांवर फारशी पुस्तके लिहिली गेली नाहीत. कारणे काहीही असू शकतील, परंतु वस्तुस्थिती अशी आहे. मात्र अभ्यासकांना या सूचीचा उपयोग व्हावा यासाठी निवडक इंग्रजी पुस्तके घेऊन त्यांचे वर्गीकरण केले. इंग्रजी पुस्तके याच काळातील म्हणजे इ. स. १९५१ ते १९८० मधील घेतली आहेत. मराठी व इंग्रजी पुस्तके पाहत असताना काही विषय वगळले जात आहेत हे लक्षात आल्यावर महाराष्ट्रातील विद्यापीठांतून मान्य झालेले याच काळातील पीएच्. डी. चे महाराष्ट्रविषयक प्रबंध एकत्र करून त्यांचे वर्गीकरण केले. या सूचीत एकूण ३१२० नोंदी असून २२५४ मराठी पुस्तके, १५८ इंग्रजी पुस्तके व ७०८ पीएच्. डी. च्या प्रबंधांचा समावेश केला आहे.

या सूचीच्या सुरुवातीस क्षेत्रीय अभ्यास, यापूर्वी मराठी पुस्तकांची सूची करण्याचे झालेले प्रयत्न व त्यांचे गुणदोष यांची सविस्तर चर्चा केलेली आहे. सूचीमधील महत्त्वाच्या विषयांची विषय-उल्लेखसूची ( Subject Index ) शेवटी दिली आहे. त्यापूर्वी मराठी पुस्तकांची विषयवार आकडेवारी दिली आहे. या मराठी पुस्तकांच्या बाबतीत विश्लेषण करून काही महत्त्वाचे निष्कर्ष हाती आले ते परखडपणे नोंदविले आहेत. त्या निष्कर्षांचा गोषवारा येथे देत आहे.

एकूण ३१२० नोंदी केल्यावर माझे सर्वसाधारण असे मत झाले, की मराठी प्रकाशनांमध्ये तोच तोचपणा अधिक आहे. धार्मिक, ऐतिहासिक, चरित्रात्मक प्रकाशने विपुल प्रमाणात, तर विज्ञान-

अनुक्रमणिका

विषयक ग्रंथ अगदीच मर्यादित संख्येने पहायला मिळतात. त्या मानाने इंग्रजीतून महाराष्ट्रविषयक प्रकाशित होणाऱ्या ग्रंथांचे स्वरूप वैविध्यपूर्ण आहे. मराठीतून ग्रंथप्रकाशन अपेक्षित वाचक डोळ्यांपुढे केले जात असावे

या सूचीत एकूण ३० वर्षांत प्रकाशित झालेले ग्रंथ घेतले आहेत. प्रत्येक दशकातील ग्रंथसंख्या खालीलप्रमाणे :

| | |
|---|---|
| १९५१–१९६० | ६०० ग्रंथ |
| १९६१–१९७० | ७५३ ग्रंथ |
| १९७१–१९८० | ९०१ ग्रंथ |

१९६० साली महाराष्ट्र हे भाषिक राज्य झाल्यावर मराठी भाषेला विशेष प्रोत्साहन दिले गेले. त्याचा परिणाम शेवटच्या दोन दशकांतील आकडेवारीवरून लक्षात येतो.

प्रत्येक अभ्यासविषयासंबंधीच्या ग्रंथांसंबंधीही काही निष्कर्ष पाहण्यासारखे आहेत.

## सर्वसाधारण ग्रंथ

महाराष्ट्रविषयक सर्वसाधारण स्वरूपाचे एकूण ७० ग्रंथ प्रकाशित झालेले आहेत. या ग्रंथांचे स्वरूप लक्षात घेता सर्वसाधारण माहिती पुरविणारे हे ग्रंथ आहेत. सविस्तर, सखोल, अभ्यासपूर्ण, वस्तुनिष्ठ असे ग्रंथ संख्येने खूपच कमी आहेत. महाराष्ट्राचे गोडवे गाणारे, महती सांगणारेच ग्रंथ अनेक आहेत. यावर उपाय असा, की विद्यापीठे, शासन यांनी अभ्यासपूर्ण ग्रंथ प्रसिद्ध करून प्रसिद्धी व विक्रीची व्यवस्था करावी.

या ३० वर्षांत मराठीतून–मातृभाषेतून– शिक्षणाची सोय शाळांतून, महाविद्यालयांतून आणि काही विद्यापीठांतून करण्यात आली. या काळात इंग्रजीचे महत्त्व होतेच. त्यामुळे शब्दकोशासारख्या संदर्भग्रंथांची गरज भासू लागली. विविध भाषांवर आधारित ४५ शब्दकोश या काळात प्रसिद्ध झाले. त्यांपैकी १३ मराठी–इंग्रजी व इंग्रजी–मराठी असे शब्दकोश प्रसिद्ध झाले. तरीही जे. टी. मोल्सवर्थ यांच्या शब्दकोशाप्रमाणे शब्दकोश तयार झाला नाही. आणि म्हणूनच की काय, मोल्सवर्थ यांचा शब्दकोश अलीकडेच जसाच्या तसा पुनर्मुद्रित करण्यात आला !

महाराष्ट्र हे बुद्धिवंतांचे राज्य समजले जाते. आपल्याकडे ज्ञानोपासक विद्वानांची परंपराही मोठी आहे. लोकहितवादी, बाळशास्त्री जांभेकर यांच्या काळापासून म्हणजे इंग्रजी विद्येच्या प्रचार–प्रसाराच्या अगदी आरंभीच्या वर्षापासून स्वतंत्र प्रज्ञेचे बुद्धिवंत आपल्या प्रदेशात बहुसंख्येने झाले. एखादे स्वतंत्र काम घेऊन ते पूर्ण केल्याची अनेक उदाहरणे दिसतात. कै. डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांनी सुमारे ५० वर्षांपूर्वी 'महाराष्ट्रीय ज्ञानकोश' तयार केला. त्यानंतरही काही महत्त्वाचे ज्ञानकोश प्रकाशित झाले. पं. महादेवशास्त्री जोशी यांचा १० खंडांतील 'भारतीय संस्कृतिकोश', प्रा. दे. द. वाडेकर यांचा ३ खंडांतील 'मराठी तत्त्वज्ञान महाकोश', पं. चित्रावशास्त्री यांचा 'भारतवर्षीय चरित्रकोश' आणि तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या प्रमुख संपादकत्वाने २० खंडांत प्रसिद्ध होणारा 'मराठी विश्वकोश' ही त्यांपैकी काही ठळक उदाहरणे आहेत. १९५१ ते ८० या काळात एकूण २० ज्ञानकोश प्रकाशित झाले. परंतु हे सर्व ज्ञानकोश पाहिल्यावर एक गोष्ट लक्षात येते, की एकीकडे आपली आर्थिक, सामाजिक, शास्त्रीय प्रगती होत आहे, औद्योगिकीकरण मोठ्या प्रमाणावर महाराष्ट्रात होत आहे असे असताना विज्ञानावर मराठीतून एखादा ज्ञानकोश प्रसिद्ध झाल्याचे उदाहरण नाही. येथे विज्ञान हा शब्द वापरताना Science, Technology, Agriculture, Industry, Commerce हे विषय अभिप्रेत आहेत.

## धर्म आणि तत्त्वज्ञान

या विषयात महाराष्ट्रविषयक ४०३ पुस्तके प्रकाशित झाली. संतांची चरित्रे याच विभागात समाविष्ट केलेली आहेत. २८२ ग्रंथ महाराष्ट्रातील संतचरित्रावरील आहेत. तर संप्रदायावर आधारित असलेले ग्रंथ केवळ ३२ आहेत. एखाद्या संप्रदायाचा सर्वांगीण, सखोल अभ्यास करण्याचा प्रयत्न अलीकडे डॉ. वि. भि. कोलते, पं. रा. मोकाशी, डॉ. रा. चिं. ढेरे यांच्यासारखे अभ्यासक करीत आहेत. परंतु १९५१ ते ८० या काळात एखाद्या संप्रदायाचा साकल्याने अभ्यास केलेले ग्रंथ संख्येने मात्र खूपच कमी आढळतात. त्याशिवाय महाराष्ट्रात

जैन, बौद्ध, मुस्लिम, शीख, ख्रिश्चन अशा इतर धर्मांचे लोक राहत आहेत. त्यांच्या विषयीचे ग्रंथ मराठीतून फारसे पहायला मिळाले नाहीत.

## सामाजिक शास्त्रे

या विभागात १९५१ ते ८० या काळात प्रकाशित झालेल्या ग्रंथांची संख्या आहे २४२. यापैकी १/३ ग्रंथ सामाजिक शास्त्रावरील आहेत. समाजशास्त्रीय पाहणीवर आधारलेले ग्रंथ यामध्ये बरेच आहेत. महाराष्ट्रातील जाती, जमाती यांवर ३४ ग्रंथ आहेत तर लोकसाहित्यावर ५० ग्रंथ संपन्न झाले आहेत.

महाराष्ट्रविषयक शिक्षणशास्त्रावर ३४ ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. इतर विषयांच्या संदर्भात ही ग्रंथसंख्या उल्लेखनीय आहे. शिक्षणाविषयी नवशिक्षणाच्या आरंभकाळापासूनच महाराष्ट्रात एक प्रकारची विशेष जाणीव आहे असे वाटते. शिक्षणशास्त्रावर जी प्रकाशने आली, ती मुख्यतः प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षणावरील आहेत. त्या मानाने व्यावसायिक शिक्षण, तांत्रिक शिक्षण, दूर शिक्षण यांसारख्या विषयांवर ग्रंथसंपदा जवळ जवळ उपलब्ध नाही.

गेल्या ३० वर्षांत भारतातील काही राज्यांचा आर्थिक विकास झपाट्याने होत आहे. महाराष्ट्र हे अशा राज्यांपैकी एक अग्रगण्य राज्य आहे. येथे औद्योगिकीकरणही मोठ्या प्रमाणावर होत आहे. त्या मानाने या विषयावर प्रकाशित वाङ्मय कमी आहे. केवळ ३५ ग्रंथ प्रकाशित आहेत. त्यांचे स्वरूप पाहिल्यास असे जाणवल्यावाचून राहत नाही, की पंचवार्षिक योजनेच्या संदर्भातीलच चर्चा करण्यात आली आहे. अर्थशास्त्रावरील महाराष्ट्रविषयक अधिक सखोल आणि चिकित्सक ग्रंथ इंग्रजीमध्ये आहेत. राज्यशास्त्रावर फक्त १९ ग्रंथ या काळात प्रसिद्ध झाले.

कायद्याच्या अभ्यासाविषयी महाराष्ट्रीयांमध्ये विशेष आस्था आहे असे आकडेवारीवरून समजते. कायद्यावरील ५७ ग्रंथ सूचीत अंतर्भूत केले आहेत. विक्रीकायदा, कूळकायदा, भाडेकायदा यांसारख्या कायद्यांचे साधार विश्लेषण करणारे ग्रंथ अधिक प्रमाणात आहेत.

## मराठी भाषा आणि मराठी साहित्य

या विभागात मराठी साहित्यिकांची, विचारवंतांची चरित्रे उपविभाग करून दिली आहेत. या विभागातील ग्रंथांची संख्या एकूण नोंदीपैकी $\frac{1}{3}$ आहे. मराठी साहित्याच्या विविध वाङ्मयप्रकारांवरील चिकित्सक, टीकात्मक ग्रंथ समाविष्ट केले आहेत. या विभागाची दशकाप्रमाणे संख्या पाहिल्यास ती वाढताना दिसत आहे. मराठी कथा, कादंबरी कविता, नाटक इत्यादी वाङ्मय प्रकारांमधील टीकात्मक ग्रंथांची संख्या ३०६ आहे. क्षेत्रीय अभ्यास करताना भाषिक अभ्यास महत्त्वाचा असतो याची जाणीव या विषयाच्या अभ्यासकांना झाली असल्याचे एकूण आकडेवारीवरून समजू शकते.

व्यक्तिपूजेला अद्यापि आपल्याकडे अधिक प्राधान्य दिले जाते हे ध्यानात आल्याशिवाय राहत नाही. धर्म आणि तत्त्वज्ञान या विभागातील संतांची चरित्रे आणि साहित्यिक तसेच इतर क्षेत्रांतील महाराष्ट्रीयांची चरित्रे एकत्र केल्यास ही संख्या ७३३ होते. यामध्ये काही ठराविक व्यक्तींची चरित्रे संख्येने अधिक आहेत. इ. स. १९५१ ते ८० या काळात छत्रपती शिवाजी महाराजांवर ९६ चरित्रे लिहिली गेली आहेत. त्यामानाने मराठेशाहीतील अन्य काही प्रसिद्ध व्यक्ती, राजकीय क्षेत्रात कार्य करणाऱ्या व्यक्ती यांची चरित्रे अल्प प्रमाणात पहायला मिळतात. शास्त्रज्ञ, उद्योगपती, तंत्रज्ञ यांच्या चरित्रग्रंथांची संख्या हातावर मोजण्याइतकी आहे. संतांची चरित्रे सर्वाधिक आहेत. त्यावरून आमची संतांविषयीची भक्ती दिसून येते.

## विज्ञान आणि तंत्रज्ञान

महाराष्ट्राशी संबंधित असलेल्या विज्ञानविषयक ग्रंथांची संख्या केवळ ३६ आहे. शेतीविषयक ग्रंथ याच विभागात घेतले आहेत. मात्र उद्योगधंदे आणि तंत्रज्ञानावरील ग्रंथ आपल्याला पहायलाच मिळत नाहीत. ही स्थिती काही फारशी समाधानकारक आहे असे नाही. वस्तुतः वैज्ञानिक प्रगतीची कल्पना सर्वसामान्यांना करवून देण्यासाठी मराठीतून– मातृभाषेतून त्यांना साहित्य उपलब्ध करवून देणे अत्यावश्यक आहे.

## ललित कला

महाराष्ट्राशी निगडित असलेल्या विविध कलांचा तसेच अनेक प्रकारच्या खेळांवरील ग्रंथांसाठी एक स्वतंत्र विभाग केला. परंतु विविध कलांवरील केवळ ११ ग्रंथ या काळात प्रकाशित झाले.

## इतिहास आणि भूगोल

१९५१ ते १९८० या काळात इतिहास आणि भूगोलविषयक एकूण ३२० ग्रंथ प्रकाशित झाले. त्यांपैकी फक्त ४३ ग्रंथ महाराष्ट्राच्या भूगोलावरील आहेत. या विभागातील उरलेले ग्रंथ महाराष्ट्रातील किल्ले, ऐतिहासिक स्थळे यांवर आहेत. ऐतिहासिक ग्रंथांमध्येही प्राचीन आणि मध्ययुगीन महाराष्ट्रावर फारच थोडे ग्रंथ प्रकाशित झाले. त्या मानाने मराठ्यांचा इतिहास, शिवकाल आणि पेशवेकाल यांवर विपुल प्रमाणात लेखन झाल्याचे दिसते. महाराष्ट्राच्या आधुनिक इतिहासावर तर जवळजवळ ग्रंथलेखन झालेच नाही असे म्हणायला हरकत नाही इतकी या ग्रंथांची संख्या मर्यादित आहे. तसेच महाराष्ट्राच्या १९ व्या शतकातील संक्रमणावस्था या विषयावर ग्रंथसंख्या अत्यल्प आहे. प्रा. गं. बा. सरदार, प्रा. दी. के. बेडेकर, प्रा. न. र. फाटक, प्रा. जी. डी. पारीख यांसारख्या विचारवंतांनी या संदर्भात केलेल्या लेखनाचा आवर्जून उल्लेख केला पाहिजे.

भूगोल हा विषय नैसर्गिक शास्त्रात येणारा. या विषयाचा अभ्यास करताना शास्त्रीय बैठक आवश्यक आहे. नैसर्गिक, सामाजिक अशा सर्वच शास्त्रांना स्पर्श करणारा हा विषय आहे. कदाचित त्यामुळेच महाराष्ट्राचा भूगोल या विषयावर फारसे लेखन झाले नसावे. १९५१ ते ८० या काळात फक्त ४३ नोंदी मिळतात.

## संयुक्त महाराष्ट्राची चळवळ

अलीकडच्या काळात महाराष्ट्राच्या जीवनात संयुक्त महाराष्ट्राची चळवळ ही विशेष संस्मरणीय अशी चळवळ होऊन गेली. त्या दिवसांत या चळवळीचे पडसाद महाराष्ट्रातील घराघरांतून, लहानापासून थोरांपर्यंत उमटत होते. त्याचाच परिणाम साहित्यावर आणि लेखनावर पडत होता. त्यामुळे संयुक्त महाराष्ट्र या चळवळीवर काव्य, चर्चा, इतिहास इत्यादी स्वरूपांत बरेच लेखन झाले. जवळजवळ ३० ग्रंथ केवळ मराठीतून प्रकाशित झाल्याचे दिसते.

जातिनिर्मूलन करायचे प्रयत्न कितीही होत असले, तरी लोक तत्त्व मान्य करून प्रत्यक्षात आपली जात सोडीत नाहीत. आपल्या जातीचे महत्त्व रहावे असा प्रयत्न लेखनातून दिसतो. महाराष्ट्रातील जाति-उपजातींवर एकूण ३० ग्रंथ आपल्याला पहायला मिळतात.

## शासकीय प्रकाशने

महाराष्ट्र शासनाने अलीकडच्या काळात मराठीतून अनेक विषयांना प्रसिद्धी दिली आहे. या सूचीत शासकीय प्रकाशनांसाठी वेगळा, स्वतंत्र विभाग केला. या विभागात एकूण २४३ ग्रंथांची नोंद केली आहे. महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने प्रकाशित केलेले ग्रंथ संबंधित विषयात समाविष्ट केले आहेत. शासनाचे वेगवेगळे नियम, अधिनियम, कायदे, यांचा या विभागात अंतर्भाव केला आहे. पंचवार्षिक योजनांची माहिती सर्वसामान्यांना व्हावी या उद्देशाने महाराष्ट्राच्या योजनांवरील स्वतंत्र ग्रंथ पहायला मिळतात. शासकीय प्रकाशनांच्या बाबतीत एक नेहमीची अडचण येते. ती म्हणजे ही प्रकाशने मिळवायची कशी ? सूचीच्या संदर्भात हीच अडचण आली होती. परंतु १५ ग्रंथालये, शासनाच्या विविध खात्यांची ग्रंथालये आणि शासकीय ग्रंथभांडारे पाहिल्यावर बऱ्याच प्रमाणात हे साहित्य जमा करता आले.

शासकीय प्रकाशने बहुतेक करून इंग्रजीत असतात. सर्वच प्रकाशनांचे मराठीकरण होतेच असे नाही. शिवाय एकदा प्रकाशन होऊन गेले, की पुनर्मुद्रणाची फारशी शक्यता नसते. या प्रकाराला काही तांत्रिक कारणे असू शकतील. परंतु सर्व शासकीय प्रकाशने कोठे तरी एकत्रित पहायला मिळण्याची व्यवस्था असली पाहिजे, हे या निमित्ताने सुचवावेसे वाटते.

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचे प्रकाशनकार्य लक्षणीय आहे. मंडळातर्फे अनेक चांगले ग्रंथ प्रकाशित होत आहेत. यांमध्ये मराठी विश्वकोशाचा विशेष उल्लेख करायला हवा. अशा चांगल्या उपक्रमांबरोबर मंडळाने महाराष्ट्राशी संबंधित असलेल्या वैज्ञानिक, तांत्रिक, औद्योगिक इ.

विषयांवरील लेखनाला प्रोत्साहन द्यावे, जेणेकरून महाराष्ट्राचा सर्वस्पर्शी अभ्यास होईल.

एकूण मुद्रण आणि प्रकाशन यांचा जर विचार केला, तर ती एक फार मोठी आर्थिक उलाढाल आहे असे दिसते. त्यामुळे अशी आर्थिक उलाढाल करणाऱ्यांचा एक नेहमीच प्रयत्न असतो, की एक-वेळ त्यातून फायदा नाही झाला तरी चालेल, पण तोटा होता कामा नये. म्हणून खाजगी प्रकाशक या व्यवहाराकडे व्यावहारिक डोळसपणा ठेवतात आणि म्हणून 'जे खपेल ते विका' असा दृष्टिकोन स्वीकारला जातो. महाराष्ट्रातील हाताच्या बोटां-वर मोजता येतील इतकेच खाजगी प्रकाशक वाचकांना काही वेगळे साहित्य पुरवावे अशा विचाराने प्रयत्न करताना दिसतात.

महाराष्ट्रातील मराठी ग्रंथांच्या निमित्ताने काही निष्कर्ष काढता आले. परंतु इंग्रजी ग्रंथांचा विचार केल्यास एकूण निष्कर्षामध्ये थोडाफार बदल होईल. कारण इंग्रजीतील लेखन विविध विषयांवरील आहे. अर्थात इंग्रजीतील लेखन विविध विषयांवर असण्याची काही कारणे म्हणजे मराठीच्या मानाने विस्तृत बाजारपेठ आणि त्या ग्रंथांना राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय पातळीवर प्रसिद्धी मिळू शकते.

भारतातील गुजरात, केरळ, उत्तरप्रदेश, तामिळ-नाडू अशा बहुतेक राज्यांच्या स्वतंत्र ग्रंथसूची पहायला मिळतात. महाराष्ट्रावरची अशी सूची पहायला मिळत नाही. अल्पस्वल्प मतीप्रमाणे याबाबत पहिलाच प्रयत्न केलेला आहे. त्यामुळे आता या विषयास चालना मिळेल अशी अपेक्षा करावयास हरकत नाही.

⊙ ⊙ ⊙








# महाराष्ट्रातील संस्थात्मक जीवन : एक मुलाखत

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी । मे. पुं. रेगे

रेगे : शास्त्रीजी, सांस्कृतिक संस्थांविषयी काही चर्चा आज आपल्याला करायची आहे. सांस्कृतिक संस्था म्हणजे माझ्या डोळ्यांपुढे मुख्यत: प्राज्ञपाठशाळा मंडळ. भारत इतिहास संशोधन संस्था, धुळ्याची समर्थ वाग्देवता मंदिर, राजवाडे संशोधन मंदिर अशा संस्था आहेत. स्वातंत्र्य-पूर्व काळात काही खाजगी व्यक्तींनी पुढाकार घेऊन ह्या काढल्या होत्या. त्या सरकारी अनुदानावर अवलंबून नव्हत्या. ते एक सोडा; परंतु काही एक विशिष्ट ध्येय डोळ्यांसमोर ठेवून, अनेक माणसांनी एकत्र येऊन त्या चालवल्या होत्या आणि त्यांनी चांगले कामही केले. गांधीजी असे म्हणत, की असा प्रकारच्या संस्था ह्या महाराष्ट्राचं एक वैशिष्ट्च आहे. आज त्यांची स्थिती फारशी स्पृहणीय नाही, असं एकंदरीत दिसतं. इतर संस्थांविषयी बोलणं थोडंसं अप्रशस्त ठरेल; पण आपण प्राज्ञपाठशाळा मंडळाविषयी मोकळेपणाने बोलू शकू. पण हे म्हणजे एक उदाहरण म्हणूनच त्यासंबंधी आपण बोलणार आहोत. ह्या विशिष्ट संस्थेच्या काही समस्या आहेत व त्यासंबंधी आपण बोलणार असं नाही. तर एकंदरीत अशा संस्थांची जी पीछेहाट झालेली दिसते, त्याची काय कारणं असतील ?

शास्त्रीजी : ह्या ज्या खाजगी रीतीनं चालविलेल्या स्वातंत्र्यपूर्व काळातल्या संस्था दिसतात, त्या सुरू होताना परंपरागत, सांस्कृतिक अशी व्यवस्था होती. तिच्यामध्ये काही बदल करायचा आणि देशकालपरिस्थितीप्रमाणे नव्या परिस्थितीचा अर्थ समजून घेऊन त्या परंपरागत संस्कृतीच्या परिस्थितीला नवा आकार देणं किंवा उजळा देणं ह्या तऱ्हेची प्रेरणा प्राज्ञपाठशाळा मंडळाच्या कार्यकर्त्यांपुढे होती. उदा., हिंदू धर्माचा प्रचार ह्या देशामध्ये करणाऱ्या कीर्तनकार, पुराणिक इत्यादी संस्था होत्या; पाठशाळा होत्या; धर्मशास्त्रज्ञ तयार होत असत; परंतु देशकालपरिस्थिती ओळखून नवी उमेद आणि स्फूर्ती निर्माण करणं, म्हणजे राष्ट्रवादाचा त्याच्यावर संस्कार करणं. हे हवं होतं. त्याकरिता इतिहाससंशोधनसुद्धा महत्त्वाचं मानलं जात होतं. धर्माचा इतिहास पाहिला पाहिजे, धर्म बदलत असतो; आपल्या इतिहासात काय काय चांगल्या गोष्टी घडल्या, काय अयोग्य घडल्या, हे पहायला पाहिजे; इतिहासाकडे पाहण्याचा राष्ट्रवादी दृष्टिकोण हवा. त्याप्रमाणे राजवाडे हे संशोधनाचे मोठे अग्रेसर मानले जात होते. ते वस्तुवादी इतिहाससंशोधन करीत असत. पण कित्येक वेळा त्यांच्या संशोधनामध्ये राष्ट्रवादाचा अभिमान फार जोरदार असे. त्या तऱ्हेच्या प्रेरणा स्वातंत्र्योत्तर काळात मंदावल्या. तसेच प्राज्ञपाठशाळेसारख्या संस्थेला काही नवे विद्यार्थी तयार करायचे होते. राष्ट्राच्या स्वातंत्र्यासाठी लढणारे पण संस्कृतीची प्रेरणा घेतलेले असे. ही जी सगळी नवी ध्येये होती ती स्वातंत्र्योत्तर काळात क्षीण होऊन गेली. त्यामुळे अशा सांस्कृतिक संस्थांना एक तऱ्हेचं यांत्रिक स्वरूप आलं किंवा उतरती कळा लागली. उदाहरणार्थ पहा, की गांधींच्या पुढे कोण होण होते ? राष्ट्रीय पाठशाळा किंवा इतिहाससंशोधन मंडळ वगैरे संस्था नव्हत्या. समर्थ वाग्देवता मंदिर त्यांच्यापुढे नव्हते. त्यांच्यापुढे डेक्कन एज्युकेशन सोसायटीसारख्या संस्था होत्या; कारण त्यांचे गुरू गोखले टिळक, विष्णुशास्त्री चिपळूणकर वगैरे मंडळी तिचे संस्थापक. तर शिक्षण आधुनिक झालं पाहिजे व त्यातून पश्चिमी देशामध्ये ज्या तऱ्हेने एक ताकद आलेली आहे तशी विशिष्ट ताकद आलेली पिढी तयार








केली पाहिजे ही त्यांच्यापुढे प्रेरणा होती. त्यामुळे फर्ग्युसन कॉलेजचे प्राचार्य आजच्या मुख्यमंत्र्यांपेक्षाही श्रेष्ठ मानले जात. कारण मुख्यमंत्र्याच्या हातात सत्ता आहे. त्यांच्या हातात सत्ता नव्हती. पण वरच्या दर्जाचं शैक्षणिक, आधुनिक शिक्षणाचं ते कार्य करीत होते. आणि त्या ठिकाणी सुद्धा संस्कृतचं अध्ययन होत होतं. संस्कृतला त्या काळात एक नवा अर्थ आला होता. ऐतिहासिक दृष्टीनं त्यांच्या अध्ययनाला पश्चिमी लोकांनी महत्त्व दिलं होतं. माक्सम्यूलर वगैरेची नावे येथे गाजत होती. भाऊ दाजींपासूनची मंडळी संस्कृतची संशोधक होती. त्यामुळे संस्कृतला खूप महत्त्व होतं. किंबहुना विद्वान म्हणजे संस्कृत शिकलेला, असा अर्थ होत होता. म्हणजे एक नवं वातावरण निर्माण होत होतं. नव्या पिढ्या तयार होत होत्या. त्यांच्यामध्ये एक प्रकारचा ताजेपणा दिसत होता. म्हणजे समाजामध्ये ते वेगळे दिसत होते. पुढे हे सर्व यांत्रिक झाले. नव्या उद्देशांच्या प्रेरणा नव्या राहिल्या नाहीत. आणि ज्या संस्था राहिल्या– उदा., डे. ए. सोसायटी किंवा आंतरराष्ट्रीय कीर्ती मिळवलेली भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिर ही संस्था– त्यांनी महाभारताचं संशोधन केलं. आता महाभारताचं आकर्षण जगातले प्राचीन संस्कृतीचे जे सगळे पंडित, त्यांना फार. उदा, महाभारताच्या अनेक आवृत्त्या आहेत. त्यांतली खरी कोणती अशा प्रश्नांबद्दल त्यांना कुतूहल. म्हणजे हे एक नवं जागतिक सांस्कृतिक वातावरण तयार होत होतं. साऱ्या जगाची एक अशी मानवी संस्कृती असून तिला निरनिराळे इतिहास आहेत आणि ते सगळे इतिहास पाहिले पाहिजेत, अशी दृष्टी आली. तर ह्याचाही परिणाम भारताच्या एकंदर विद्याभ्यासाच्या संस्थांवर झालेला आहे, असं मला वाटतं. कारण मी त्या वातावरणातून गेलेलो आहे.

रेगे : शास्त्रीजी, हे बरोबर आहे. तुमच्या बोलण्याचा मी असा अर्थ करतो, की आपला जो सांस्कृतिक वारसा आहे, तो जतन केला पाहिजे. त्याच्याविषयी अभिमान बाळगला पाहिजे; पण त्याची एक चिकित्साही केली पाहिजे. त्याला योग्य असं नवं वळण दिलं पाहिजे. ह्या प्रेरणेतून ह्या संस्था सुरू झाल्या आणि हे काम आपण स्वत: केलं पाहिजे. म्हणजे मराठी जुनं काव्य आहे, मराठ्यांचा इतिहास आहे, किंवा भारताचा सांस्कृतिक इतिहास आहे; ह्या सर्व गोष्टींकडे आपण आत्मीयतेने व आपला स्वत:चा वारसा म्हणून पाहिलं पाहिजे. त्यांचं संशोधन केलं पाहिजे. ही आपली जबाबदारी आहे, तिच्यात आपली अस्मिता आहे, अशी एक भावना होती. स्वातंत्र्यानंतर तुमचं असं म्हणणं की, काही जुनी उद्दिष्टे यांत्रिकपणे चालू राहिली. तुम्ही डेक्कन एज्युकेशन सोसायटीचं उदाहरण दिलं. पूर्वी तिच्या मागचा उद्देश असा होता की, आधुनिक पाश्चात्त्य विचारांचे संस्कार झालेले असे तरुण निर्माण करायचे; मग ते समाजात आपापली स्थाने असतील त्या प्रकारे सामाजिक जीवनाला नवीन वळण देतील. केवळ अभ्यासक्रम शिकवायचा हा ह्या संस्थेचा उद्देश नव्हता. एक नवीन संस्कृती इथे घडवायची असा उद्देश होता. आणि म्हणूनच कॉलेजच्या प्राचार्यांचं किंवा प्राध्यापकांचं विशिष्ट सामाजिक स्थान आहे, अशी सर्वांची कल्पना होती; त्यांचीही होती. म्हणून त्या कामाला एक महत्त्व होतं. पुढं हे महत्त्व स्वातंत्र्यानंतर काहीसं कमी झालं. ह्याचं कारण आता फक्त वेगवेगळ्या विषयांचं 'ट्रेनिंग' ज्यांना दिलेलं आहे, असे विद्यार्थी तयार करणं एवढंच उद्दिष्ट आहे. आता मला जो प्रश्न विचारायचा आहे, तो असा, की स्वातंत्र्यानंतरच्या काळात ह्या उद्दिष्टांना एक वेगळं पण अधिक व्यापक असं स्वरूप कदाचित मिळालं असतं. उदा., इतिहाससंशोधन. आता स्वतंत्र झाल्यामुळे आपले परराष्ट्र धोरण आपण ठरवू शकतो. म्हणून केवळ महाराष्ट्राच्या किंवा भारताच्या इतिहासाचं संशोधन नव्हे तर आशियातल्या वेगवेगळ्या देशांच्या इतिहासाचं संशोधन आपण केलं पाहिजे. ज्या आशियाई देशांचा आता आपला जवळचा संबंध येणार...

शास्त्रीजी : पूर्वीही तो आला होता–

रेगे : हो. तर त्या देशांचा इतिहास काय हे पहावे, त्याचं संशोधन करावं, त्याचे निष्कर्ष लोकांपुढे ठेवावेत असा प्रकारची प्रेरणा नवीन स्वरूपात का निर्माण झाली नाही ? हे सारं यांत्रिकच का झालं ?

शास्त्रीजी : याच्यात एक गोष्ट अशी आहे की, ह्या संस्थांचं पुनरुज्जीवन करण्याची जबाबदारी नव्या सरकारवर होती आणि नव्या सरकारने परंपरागत अशा ज्या काही सरकारी शिक्षणसंस्था होत्या त्यांना महत्त्व दिले. ह्या स्वतंत्र रीतीनं चालणाऱ्या ज्या संस्था आहेत, त्यांना फक्त अनुदान द्यायचे, बाकी त्या लोकांनी स्वतःच त्या चालवायच्या अशी सरकारची दृष्टी होती. त्यामुळे ह्या संस्थाचं आर्थिक बळ फार खाली गेलं. उदा., समर्थ वाग्देवता मंदिर व राजवाडे संशोधन मंदिर, प्राज्ञपाठशाळा, भारत इतिहास संशोधन मंडळ वगैरे. त्यांना स्वतःच्या पायावर उभं राहता येईल ह्यासाठी निधीही निर्माण झाले नाहीत. तसेच पहिल्या प्रेरणा देणारी मंडळीही उरली नाहीत. असं का झालं, हे सांगता येणार नाही. पण स्वराज्य आल्यावर दुसऱ्या काही प्रेरणा निर्माण झाल्या. उदा., राजकीय पक्षोपपक्ष तयार झाले आणि निरनिराळ्या प्रकारची आकर्षणेही निर्माण झाली. म्हणजे आदर्शवाद बाजूला पडला. विषयांतर होतंय, पण सबंध देशातलं वातावरण आदर्शवादी राहिलं नाही. एक उतरती कळा लागली. आणि हे गांधींनाही वाटायला लागलं. म्हणजे राजकीय पक्षोपपक्ष हे शेवटी विकृत होत असतात; त्यांचे आदर्श हे मलीन होत जातात, हे लक्षात घेऊन निराळे आदर्श व्यवस्थित जपायचे अन् वाढवायचे असं पाहणाऱ्या नव्या संघटना निर्माण झालेल्या नाहीत. गेल्या पस्तीस वर्षांत.

रेगे : हे मान्य करू या. पण आता आपले प्राज्ञपाठशाळा मंडळ घेऊ. सु. १९३५ सालापासून आपल्याकडे पाठशाळेत शिकायला येणारे विद्यार्थी काही राहिले नाहीत.

शास्त्रीजी : नाहीत. ते कमी होत गेले.

रेगे : ह्याचा अर्थ ज्या प्रकारची जीवनवृत्ती या पाठशाळेतून बाहेर पडल्यानंतर विद्यार्थ्यांना उपलब्ध व्हावयाची, ती राहिली नाही. म्हणजेच त्यांना इंग्रजी वळणाच्या शिक्षणाकडे गेलेच पाहिजे अशी परिस्थिती निर्माण झाली हे मान्य. पण धर्मकोशाचं काम पहा. तुम्ही असं म्हणालात, की हिंदू धर्माचा इतिहास पाहून राष्ट्रवादाची प्रेरणा त्याच्यामध्ये प्रविष्ट करायची, नवीन काळाला अनुसरून ज्या चालीरीती, जे आचार कालबाह्य ठरले होते ते बदलायचे व धर्मात सुधारणा करायची ही प्रेरणा धर्मकोशामागे होती. पण त्याबरोबरच आपला सर्वच सांस्कृतिक इतिहासातला एक प्रवाह समजून घ्यावा, असे एक बौद्धिक उद्दिष्ट होतं की नाही ?

शास्त्रीजी : परिवर्तनवादी उद्दिष्ट होतं, पण स्वातंत्र्योत्तर काळात ही उद्दिष्टे स्वातंत्र्यपूर्व काळात होती तितकी प्रखर राहिली नाहीत.

रेगे : का ? त्यांची आवश्यकता राहिली नाही का ?

शास्त्रीजी : नाही. ती आवश्यक आजही आहेतच. आज सामाजिक परिवर्तन जे पाहिजे आहे, ते हिंदू समाजाच्या रचनेमध्येच पाहिजे आहे. तर त्या तऱ्हेच्या प्रेरणेचे हिंदू धर्माचे प्रचारक, शास्त्री-पंडित, कीर्तनकार ह्यांची परंपराच राहिली नाही. त्याच उद्देशाने प्राज्ञपाठशाळा मंडळ स्थापन झाले होते. एकाच संस्थेबाबत मी म्हणत नाही. एकूण महाराष्ट्रातल्या संस्थांना एक यांत्रिक रूप आलं. टिळक विद्यापीठाचं असंच झालं आहे. राष्ट्राचे सुशिक्षित सेवक तयार करणे हा खरा त्या चळवळीचा हेतू होता, तसं आज तिथं होत नाही. स्वातंत्र्याच्या चळवळीत अशा ज्या संस्था उभ्या राहिल्या, त्या अपकर्षाला गेल्या आहेत.








रेगे : म्हणजे केवळ आर्थिक दुबळेपणामुळं हे घडलं नाही. मुख्य कारण मला असं दिसतंय, की सामाजिक महत्त्व असलेला एक नवीन उद्देश असा ह्या संस्थांपाशी राहिला असे दिसत नाही. म्हणजे एक तर काय करावं, हे त्यांना कळत नसेल...

शास्त्रीजी : म्हणजे ज्याला मी उच्च अर्थाने ध्येयवादी, धार्मिक वा नैतिक प्रेरणा म्हणतो त्या असाव्या लागतात. सरकारच्या बाहेर आणि राजकीय व्यवहारांच्या बाहेर अशा ज्या लोकशिक्षण देणाऱ्या व लोकशिक्षक तयार करणाऱ्या संस्था असतात त्या निर्माण व्हाव्या लागतात. आता उदा, आमट्यांची आनंदवन ही संस्था– अशा काही राहिलेल्या आहेत.

रेगे : पण बौद्धिक प्रकारचं कार्य करणाऱ्या संस्था व इतर प्रकारे सामाजिक सेवा करणाऱ्या संस्था असा एक फरक मी करतो. आता स्वातंत्र्यानंतर शिक्षणाच्या सर्व क्षेत्रांत विकास झाला; म्हणजे निदान असं दिसतं...

शास्त्रीजी : नाही. मी तुम्हास दुसरं एक सांगतो. महात्माजींनी जो आश्रम तयार केला त्याबद्दल. सत्याग्रह आश्रम हे त्याचं नाव. केवळ स्वातंत्र्याच्या लढ्यासाठी हा आश्रम निर्माण झालेला नव्हता. देशाला कायम उच्च दर्जाचं नैतिक जीवन आणि अंत्योदयी आर्थिक जीवन, स्वावलंबन प्राप्त करण्यासाठी परित्यागी वृत्तीने जगणाऱ्या व्यक्तींचे संघ गांधींना तयार करावयाचे होते. तो उच्च हेतू शून्य झाला.

रेगे : कोणत्या आश्रमाविषयी तुम्ही बोलता आहा ?

शास्त्रीजी : साबरमतीच्या. नंतर तो वर्ध्याला गेला. सेवाग्राममध्ये. सेवा ह्या शब्दाचा अर्थ लोकसेवक, त्यागी सेवक. सामाजिक सेवक. हे सेवक देशभर पसरावेत व त्यांनी ग्रामराज्य निर्माण करावे अशी दृष्टी होती. म्हणजे आपल्या देशात अशी प्रेरणा आली, की एक नव्या तऱ्हेचे समाजसुधारक, धर्मप्रचारक तयार व्हावेत. सर्व धर्मांच्या लोकांना त्यात समाविष्ट करून घ्यावे. ही अशी थोर संस्था गांधींसारख्या जागतिक कीर्तीच्या व्यक्तीने काढलेली; पण आज ती कुठे आहे ? ह्याचं कारण सर्व उच्च आदर्श आता मंदावले आहेत; थिजले आहेत.

रेगे : चक्रनेमिक्रमाप्रमाणे समाज कधी उत्साही असतो, कधी अवनत दशेला असतो असं तुम्हाला म्हणायचं आहे का ?

शास्त्रीजी : पण गांधींच्या मनात असे होते, की आता देश स्वतंत्र होणार; जग बदलणार; ह्या स्वतंत्र जगात माणसं ही केवळ ऐहिक स्वार्थाच्या करता झटणारी आणि या आपल्या सामाजिक जीवनाच्या जबाबदाऱ्या न ओळखणारी फार होणार. त्यांना नवं वळण देणारी माणसं पाहिजे आहेत. हे जे गांधींचं दर्शन किंवा दृष्टी होती, ती फार महत्त्वाची होती. तसेच एकंदर ३०० वर्षांत जगात ज्या चळवळी झाल्या, त्या मानवी समाजात न्याय आला पाहिजे, नवजीवन आलं पाहिजे, ह्या परंपरा ज्या आहेत, त्यांच्यात अन्याय झालेला आहे अशा दृष्टिकोणातून आल्या. हा जो दृष्टिकोण होता, तो गांधींपाशी होता. असे आदर्श तेव्हा होते. केवलानंदस्वामी म्हणायचे, 'नित्य दारिद्र्यात रममाण होणारे कार्यकर्ते व धर्मसेवक हवेत.'

रेगे : असं स्वामीजी म्हणावयाचे ?

शास्त्रीजी : हो. गांधींचा हाच आदर्श होता. तोच नारायणस्वामींनी दिला. त्यांचे प्राज्ञपाठशाळा मंडळाचे जर तुम्ही मागचे अहवाल पाहिलेत, तर त्यांत अशीच भाषा आढळते. 'नित्य दारिद्र्यात राहून सेवा करणारे' वगैरे. जावडेकरांच्या भाषेत सांगावयाचे तर यतिधर्मी लोक तयार व्हायला पाहिजेत. तर यतिधर्मी लोक तयार करणे हा हेतू होता. बरे, सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीचा काय हेतू होता ? गांधींना आकर्षण वाटलं ते गोखल्यांच्या पक्षाचं; टिळकांच्या पक्षाचं नव्हे. कारण शांत, मानवतावादी वृत्तीनं काम करणारी

अनुक्रमणिका

चांगली माणसं त्यांना सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीत दिसत होती. गोखल्यांना काही तुम्ही कोणत्याही संकुचित क्षेत्रात घालू शकत नाही. ते मानवतावादीच होते, रानडे ह्यांचीही हीच गोष्ट आहे. ह्याच्यांकडे जी दिव्य उद्दिष्टे होती, ती फार मोठी. हे जुने जग काही बरोबर नाही, हे मागं पडलं पाहिजे असं त्यांना वाटे. कामामागे ह्या अशा फार व्यापक प्रेरणा होत्या आणि ह्या जागतिक प्रेरणा आहेत, असं माझं मत आहे. त्या मंदावत चालल्या आहेत.

रेगे : म्हणजे तुम्हाला असं म्हणावयाचं आहे, की इतर देशांतही त्या मंदावताहेत ?

शास्त्रीजी : हो. सगळीकडेच मंदावताहेत.

रेगे : तरीपण परत माझा एक प्रश्न आहे. बौद्धिक क्षेत्रात काम करण्याच्या ज्या संस्था...

शास्त्रीजी : नाही. पण त्या बौद्धिकतेच्या पाठीमागे ही नैतिकता होती; असली पाहिजे.

रेगे : मान्य आहे. आणि मला वाटतं, असं खोलात शिरून पद्धतशीर रीतीने जी बौद्धिक कामं केली जातात, त्यांच्यामागे नैतिकता असतेच.

शास्त्रीजी : अहो, सत्याचा शोध हा नैतिकच असतो.

रेगे : मी एवढंच म्हणत नाही. ह्या सत्याचा शोध आपल्याला का महत्त्वाचा वाटतो, तर त्याला नेहमीच एक सामाजिक संदर्भ असतो.

शास्त्रीजी : हो.

रेगे : पण तसा एक नवीन सामाजिक संदर्भ मिळाला होता. मघाशी मी म्हटलं तसं. आता आपण जर राष्ट्रीय जीवनाच्या सर्व क्षेत्रांत स्वावलंबी, स्वायत्त होणार, तर वेगवेगळ्या प्रकारचं ज्ञान आपण चांगल्या रीतीनं, त्याचा वापर व्यवहारात व्यवस्थित करता येईल अशा प्रकारे कमावलं पाहिजे. मग ज्यांचा आपण विचार व अभ्यास करू, ते अर्थशास्त्रातील प्रश्न असतील, इतिहासातले प्रश्न असतील, भाषाशास्त्रातले प्रश्न असतील.

शास्त्रीजी : हो ना. ज्ञानाची सर्वच क्षेत्रं ही सामाजिक जीवनाला प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे पूरकच असतात.

रेगे : पण मग तसं असताना, हे बौद्धिक जीवन का क्षीण झालं ? ते जर तसं झालं नसतं, तर ह्या संस्था वेगळ्या स्वरूपात भरभराटीस आल्या असत्या. आता भारत इतिहास संशोधन संस्था, उदाहरणार्थ...

शास्त्रीजी : ती हल्ली सगळ्यांत क्षीण झालेली संस्था आहे.

रेगे : ते ठीक आहे. पण तशी ती झाली नसती, तर तिथे केवळ महाराष्ट्राच्या इतिहासाचा अभ्यास झाला नसता. इतर अनेक देशांच्या इतिहासांचा झाला असता. महाराष्ट्राच्या आर्थिक इतिहासाचं संशोधन झालं असतं.

शास्त्रीजी : तशा संस्था स्थापन झाल्या आहेत. उदा., धनंजयराव गाडगिळांनी काढलेली गोखले इन्स्टिट्यूट ही एक संस्था. ती फार महत्त्वाची संस्था आहे.

रेगे : नाही; पण ज्या संस्था अगोदरपासून काम करीत होत्या, त्यांच्यात एक सातत्य राहणं, त्यातून एक बौद्धिक परंपरा निर्माण होणं हे व्हायला हवं होतं ना ?

शास्त्रीजी : हो. ह्या संस्था काम करताहेत; परंतु पूर्वी जे तेज होतं, ते आता दिसत नाही. किंवा हल्ली गरजा मोठ्या झाल्यामुळे त्यांनी ज्या प्रकारे काम चालविले आहे, ते आता अपुरं पडतं. अधिक मोठ्या प्रश्नांचा उलगडा व्हायचाय. त्यांच्या मागे लागण्याइतका त्यांचा विकास झाला नाही. धनंजयरावांच्या संस्थेमागील प्रेरणाही मोठ्याच होत्या. आज महाराष्ट्राच्या ग्रामीण विभागात जे नवं आर्थिक नेतृत्व उभं आहे, त्याच्या पाठीमागे हे पुण्यातले पंडित धनंजयराव उभे होते, हे विसरून चालणार नाही.

अनुक्रमणिका

रेगे : म्हणजे काही प्रमाणात नव्या परिस्थितीस अनुरूप अशा संस्था निर्माण झाल्या.

शास्त्रीजी : पण त्यांना आता अधिक उजळा मिळेनासा झाला. उभारी राहिली नाही. त्यांची उच्च उद्दिष्टे, त्यांची उच्च नैतिकता हळूहळू नाहीशी होत चालली. उच्च नैतिकतेचे रंग फिके पडत चालले.

रेगे : पण ह्या परिस्थितीतून तुम्हाला काही मार्ग दिसतो का ?

शास्त्रीजी : उच्च दर्जाची उद्दिष्टे आणि त्यांच्यासाठी काम करणारी माणसं हवीत. पण ज्या परिस्थितीत सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटी स्थापन झाली, राष्ट्रीय शिक्षणसंस्था तयार झाल्या; त्या परिस्थितीहून वेगळ्या प्रकारची परिस्थिती आज आहे. म्हणून आज विचारसुद्धा फार व्यापक पाहिजेत. त्या वेळी राष्ट्रीयता ही एक उच्च प्रेरणा होती. आता ह्या राष्ट्रीयतेत एक उच्च दर्जाचा असा मानवतावादी सूर आला पाहिजे. ही राष्ट्रीयता म्हणजे मानवतेचा एक भाग आहे, अशा तऱ्हेने इथं कार्य व्हायला पाहिजे. बौद्धिक उपासनानिष्ठा निर्माण होण्याची गरज आहे.

रेगे : ती निर्माणं कशी होईल ? ह्या विषयी काही स्पष्ट मार्ग नाही ?

शास्त्रीजी : नाही. कार्यक्रम आखावे, संस्था काढाव्या. काही संस्थांना मुळं फुटतात. निसर्गात असं चालतं. धडपड चालू ठेवावी. पण मला कार्यक्रम देता येणार नाही.

रेगे : म्हणजे मला वाईट कशाचं वाटतं, इंग्लंडसारखा देश आहे, तिथं शेकडो वर्षं टिकलेल्या संस्था आहेत. उदा., रॉयल सोसायटी. ती दुसऱ्या चार्ल्सच्या कारकीर्दीत निर्माण झाली. तिची मुळं तशी अनौपचारिक होती. म्हणजे ऑक्सफर्डचे काही तत्त्ववेत्ते, वैज्ञानिक हे जमत; चर्चा करीत. त्यातून ती संस्था पुढे औपचारिकपणे स्थापन झाली व आजही सातत्याने टिकून आहे.

शास्त्रीजी : त्यासाठी असणारी चिकाटी आपल्याकडे पश्चिमी संस्कृतीपेक्षा कमी आहे. त्या संस्कृतीस स्वतःची अशी एक उमेद आलेली आहे. ह्याउलट, आपली संस्कृती अजून परावलंबी व अनुकरणशाली आहे. आपण आपली उमेद अजून उभारलेली नाही. म्हणजे आपलं स्वतःचं असं नवं अनुदान जगाला, जगाच्या प्रगतीला आपण दिलेलं नाही. ते आपण देऊ शकलो, तर आपल्या ठिकाणी आत्मविश्वास येईल. आज आपल्यापाशी आत्मविश्वासाने निर्माण होणारी आत्मशक्ती नाही. म्हणजे नव्या संस्था आल्या, नवी संस्कृती आली; पण नवा आत्मविश्वास आला नाही. त्यामुळे आपल्या संस्थांत यांत्रिकता आहे, अनुकरण आहे. पण पश्चिमी संस्कृतीही कदाचित विनाशाकडे जाईल अशी आज जागतिक संस्कृतीची स्थिती वाटते.

रेगे : तुम्ही जे म्हणालात, की दारिद्र्यात रमणारे कार्यकर्ते हवेत. तसे कार्यकर्ते आज महाराष्ट्रात तरुण पिढीत नाहीत, असं नाही. म्हणजे ते राजकीय पक्षोपपक्षांत काम करतात असं नाही. पण त्याबाहेर सामाजिक– विशेषतः वेगवेगळ्या गरीब थरांत काम करणारे, त्यांना संघटित करणारे, तरुण आहेत.

शास्त्रीजी : जर असे आहे, तर ह्या मंडळांचं सर्वेक्षण करून त्यांना एकमेकांशी अनुसंधान बांधता येईल असे प्रयत्न केले पाहिजेत.

रेगे : तसेही प्रयत्न चालू आहेत.

शास्त्रीजी : अशा मंडळींची संख्या वाढली तर नवी गुणात्मकता येईल.

रेगे : हं. पण मग जसं हे त्या क्षेत्रात दिसतं, तसं बौद्धिक क्षेत्रात का दिसत नाही ?

शास्त्रीजी : नाही. बौद्धिक क्षेत्रातही तशी उदाहरणं आहेत. उदा., हे अनिल अवचट आहेत. त्यांचं क्षेत्र बौद्धिकच आहे, असं मला वाटतं. वैद्यकीय व्यवसाय बाजूला ठेवून ते आज सामाजिक निरीक्षणाच्या क्षेत्रात आहेत. अनुभव गोळा करून ते निष्कर्ष काढतात. अशी अनेक मंडळी निर्माण

व्हायला हवीत. त्यांच्यात दळणवळण व्हायला हवे. आणि मोठ्या संस्थेत जे प्रतिष्ठित आहेत, त्यांनी त्यांच्यावर दबाव न आणता त्यांना महत्त्व दिलं पाहिजे.

रेगे : आणि असं झालं तर ह्याचे पडसाद बौद्धिक क्षेत्रातही आपोआप उमटतील असे तुम्हाला सुचवायचं आहे? पण आता तुम्हाला एक अडचणीत टाकणारा प्रश्न विचारतो. प्राज्ञपाठशाळा मंडळ ही संस्था घ्या. ३०/४० वर्षांपूर्वी ह्या संस्थेने अशी कार्यकर्ती मंडळी तयार केली. आज काही अशी मंडळी दिसत नाहीत व जी आहेत, ती वृद्ध आहेत.

शास्त्रीजी : आणि जे काही बौद्धिक कार्य चालतं आहे, ते चाललं आहे.

रेगे : तर आता ह्याला जर अधिक जोमदार स्वरूप यायचं असेल, आणि जे ह्या संस्थेच्या कार्य-क्षेत्रात स्वाभाविकपणे बसेल, असं जर काही महत्त्वाचं काम सुरू करायचं असेल, तर ते कोणतं आणि त्यासाठी कोणत्या प्रकारची माणसं तुम्हाला लागतील ?

शास्त्रीजी : त्याचा शोध केला पाहिजे. आता चटकन सांगता येण्यासारखं नाही.

रेगे : मला एक मात्र वाटतं, साधारणपणे सर्वजण कुंठित झाल्यासारखे दिसतात.

शास्त्रीजी : मी तर फारच कुंठित आहे. मला तर काही मार्गच दिसत नाही.

रेगे : आता असं पहा, प्राज्ञपाठशाळेला भारतीय तत्त्वज्ञानाच्या संशोधनाचं कार्य करता येण्यासारखं आहे. त्या संस्थेचे हे स्वाभाविक काम आहे. अशा कामाला पैसा अपुरा आहे, असंही नाही. अनेक प्रकारच्या यंत्रणा ह्या कामासाठी मदत करू शकतात.

शास्त्रीजी : पण तशा तऱ्हेची जोमदार...

रेगे : माणसं आढळत नाहीत ! आणि जी काही चार-पाच माणसं असतात, त्यांच्यांवर मग एवढे वेगवेगळ्या प्रकारचे 'क्लेम्स' येतात की त्यांची धांदल उडते.

शास्त्रीजी : हो.

रेगे : शिवाय एखाद्या संस्थेत राहून त्या संस्थेच्या कामाला वाहून घेणं, ते काम म्हणजेच आपलं जीवनक्षेत्र समजणं ही पूर्वीची प्रवृत्ती आता कमी झाली आहे असे तुम्हाला वाटतं का ?

शास्त्रीजी : हो. ह्याच खऱ्या अडचणी आहेत. पण मला त्यातून मार्ग दिसत नाही.



## साभार पोच

* **उलटलेली पाने**– य. द. लोकुरकर; श्रीविद्या प्रकाशन, २५० शनिवार पेठ, पुणे– ४११०३०; १९८४; पृ. १८९; किं. रु. ३७·५०
* **अकस्मात** (काव्यसंग्रह)– केशव मेश्राम; सुरेश एजन्सी, २०५ शुक्रवार पेठ, पुणे ४११००२; १९८४; पृ. ९१; किं. २० रुपये.
* **महासागर** (कथासंग्रह)– अविनाश डोळस; अस्तित्व प्रकाशन, वर्मा बिल्डिंग, खडकेश्वर, औरंगाबाद; १९८३; पृ. ६०; किं. २५ रुपये.
* **कृतार्थ** (श्री. महामूदमियाँ दारूवाले गौरव ग्रंथ) – संपा. श्री. वसंतराव बोराटे, प्रा. श्याम जोशी, प्रा. विजयकुमार फरांदे; प्रका. श्री. महामूदमियाँ दारूवाले अमृतमहोत्सव सत्कार समिती, वाई; १९८४; पृ. १३८.
* **प्रिय बाबा**– पद्मनाथ धोंडीराम चित्ते; ग्रंथाली प्रकाशन, ३४।९०२, नेहरूनगर, कुर्ला, मुंबई ४०००२४; १९८४; पृ. १०७; किं. १५ रुपये.
* **रथ** (कादंबरी)– रंगनाथ पाठारे; ग्रंथाली प्रकाशन, मुंबई– २४; १९८४; पृ. १४२; किं. १८ रुपये.
* **मुलगी झाली हो** (नाटक)– ज्योति म्हापसेकर; ग्रंथाली प्रकाशन, मुंबई– २४, १९८४; पृ. ४०; किं. ८ रुपये.



अनुक्रमणिका

## लेखक-परिचय

■ **भास्कर लक्ष्मण भोळे** : प्राध्यापक, राज्यशास्त्र विभाग, नागपूर विद्यापीठ, नागपूर; निवास : १६ ब, विद्याविहार, प्रतापनगर, नागपूर ४४० ०२२. ■ **देवदत्त दाभोलकर** : माजी कुलगुरू, पुणे विद्यापीठ, भूतपूर्व संचालक, इंडियन इन्स्टिटयूट ऑफ एज्यूकेशन, १२८/२, कर्वे रोड, कोथरूड, पुणे ४११ ०२९; निवास : समन्वय, क्षिप्रा सहकारी वसाहत, २५-५-८ कर्वेनगर, पुणे ४११ ०२९. ■ **पन्नालाल सुराणा** : समाजवादी विचारवंत; १२५-२६ औद्योगिक वसाहत, सोलापूर. ■ **भा. र. साबडे** : कार्यवाह, मराठा चेंबर ऑफ कॉमर्स अँण्ड इंडस्ट्रीज, टिळकरोड, पुणे- २. **अर्जुन डांगळे** : सुप्रसिद्ध दलित कवी; सदस्य, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई; निवास : जयविक्रांत, ७/१३४ सहकारनगर क्र. ५, चेंबूर, मुंबई ४०० ०७१. ■ **श्री. अ. दाभोलकर** : कृषी-संशोधक, प्रयोग परिवार, १०३ साळुंखेनगर, कोल्हापूर ४१६ ००७. ■ **अनुराधा चौधरी** : संशोधक कार्यकर्त्या, कॅस्टफोर्ड; द्वारा इंडियन इन्स्टिटयूट ऑफ एज्यूकेशन, १२८/२ कर्वे रोड, कोथरूड, पुणे ४११ ०२९. ■ **रामचंद्र द. हणबर** : संशोधक कार्यकर्ते, कॅस्टफोर्ड, द्वारा इंडियन इन्स्टिटयूट ऑफ एज्यूकेशन, १२८/२ कर्वे रोड, कोथरूड, पुणे ४११ ०२९, ■ **बाळ द. टिळक** : संचालक, कॅस्टफोर्ड; द्वारा इंडियन इन्स्टिटयूट ऑफ एज्यूकेशन, १२८/२ कर्वे रोड, कोथरूड, पुणे ४११ ०२९. ■ **सुनिल शंकरराव आडगांवकर** : प्राध्यापक, नेताजी सुभाषचंद्र कॉलेज, नांदेड ४३१ ६०१. ■ **चं. वि. कुळकर्णी** : सेवानिवृत्त संचालक, मत्स्योद्योग, महाराष्ट्र राज्य, बी-४, शारदाश्रम, भवानी शंकर रोड, दादर, मुंबई ४०० ०२८. ■ **अनन्त जोशी** : ग्रंथालयशास्त्रप्रमुख आणि ग्रंथपाल, आबासाहेब गरवारे महाविद्यालय, पुणे ४११ ००४.

⊙ ⊙ ⊙














अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नवभारत । मे–जून १९८४
Registered No. SAT - 29 and Licenced to post without pre-payment–Licence No. 6



हे मासिक श्री. ग. दीक्षित यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१९ गंगापुरी, वाई येथे छापून मे. पुं. रेगे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका